# साने गुरुजी

## व्यक्ति आणि वाङ्मय

संग्राहक

शारदा मंदिर, धुळें

महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई

# साने गुरुजी—व्यक्ति आणि वाङ्मय


ग. मा. पाठक,
बी. ए., एस्. टी. सी.

य. ए. नांदेडकर,
एम्. ए., बी. टी.

बाबुराव तरटे,
एम्. ए., बी. टी.

पु. वि. कुळकर्णी,
एम्. ए., बी. टी.

बबन जो[illegible]

न. वा. शिदोरे,
एम्. ए., बी. टी.

श्री. द. दर्प,
एम्. ए., बी. टी.

कु. विमल घासकडबी,
बी. ए. ( ऑनर्स )

डॉ. ना. के. महाजन




किंमत ५ रुपये


जून १९४६

मुखपृष्ठ—दीनानाथ दलाल





प्रकाशक—शंकर वामन कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४

मुद्रक—रा. का. तटणीस, श्रीलक्ष्मी-नारायण प्रेस, मुंबई २

- श्रीराम -

मी जीवनाचा एक नम्र उपासक आहे. सभोवतालचा सारा संसार सुखी नि समृद्ध व्हावा, ज्ञानविज्ञानसंपन्न नि कला-मय व्हावा, सामर्थ्यसंपन्न नि प्रेममय व्हावा हीच एक सदा तळमळ आहे. माझें लिहिणें वा बोलणें, माझे विचार वा माझी प्रार्थना या एकाच ध्येयासाठी असतात.

साने गुरुजी

१८ ११/४५

# प्रस्तावना

साने गुरुजींच्या साहित्याचे समालोचन करणाऱ्या या ग्रंथाला प्रस्तावना लिहितांना मला आनंद वाटत आहे. 'धुळें येथील 'शारदा मंदिरा'च्या वतीनें हा ग्रंथ प्रसिद्ध होत असून शारदा-मदिराच्या सदस्यांनींच याची निर्मिति केली आहे. यातील बहुतेक लेखक उच्च पदव्या धारण करणारे असून शिक्षणक्षेत्रांत कार्य करणारे आहेत. व्यक्तिशः या लेखकांशीं माझा मुळींच परिचय नाहीं. खानदेश हे साने-गुरुजींचें खास कार्यक्षेत्र असल्यामुळें त्या भागांतीलच तरुण पदवीधरानीं साने गुरुजींच्या साहित्यावर या प्रकारचा ग्रंथ निर्माण करावा, यांत एक विशेष प्रकारचें औचित्य आहे, यांत शंका नाही.

साने गुरुजी हे एक अलौकिक पुरुष असून आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासात त्यानी आपणासाटीं स्वतंत्र स्थान निर्माण केलें आहे. त्याच्या व्यक्तिमत्त्वाला विविध पैलु असून त्या सर्वांमधून त्यांच्या असामान्य जीवनाची दिव्य प्रभा सतत प्रकट होत आली आहे. त्याचें जीवनकार्य संपलेलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्याच्या जीवनदिनाचा अद्यापि मध्याह्नहि झालेला नाहीं. अद्यापि त्याच्या सामर्थ्याचा जोमदार विकास होत राहिला असून त्याच्या कार्याचा अधिकाधिक आविष्कार व्हावयाचा आहे. यामुळे त्यांच्या जीवनाचें आणि कार्याचें मूल्यमापन करण्याचा हा काळ नव्हे. तें काम पुढल्या पिढीला कदाचित् करिता येईल. आज सानेगुरुजींच्या जीवनासंबंधीं महाराष्ट्राला जो थोडाफार प्रत्यय आला आहे, आणि त्यामुळें त्याच्याविषयीं

ज्या आशाआकांक्षा निर्माण झाल्या आहेत, त्याबद्दल थोडें विवेचन करतां येण्यासारखें आहे.

१९२४ मध्यें अंमळनेर येथील हायस्कुलांत शिक्षकाचें काम सुरू केल्यापासून त्यांच्या सार्वजनिक सेवेच्या कार्याला प्रारंभ झाला असें म्हणतां येईल. तेव्हांपासून आतांपर्यंतच्या जवळजवळ दोन तपाच्या कालांत त्यांच्या सार्वजनिक सेवेला सतत वाढतें वैभव लाभत आलेलें दिसते. शाळेच्या चिमण्या जगांत त्यानीं फक्त सहाच वर्षें काम केलें. आणि तेथून त्यांनी जनतेच्या विशाल सागरांत उडी टाकली. सामान्य जनतेच्या जीवनाशीं ते अगदीं तन्मय होऊन गेले आहेत. आज साऱ्या महाराष्ट्रामध्यें त्यांच्या नांवाची जितकी मोहिनी आहे, तेवढी दुसऱ्या कोणाहि कार्यकर्त्याच्या नांवाला नाहीं हें उघडपणें मान्य केलें पाहिजे. विद्यार्थी-विद्यार्थिनी, शेतकरी-कामकरी आणि महाराष्ट्रांतील मध्यमवर्गीय कुटुंबांतील सर्वसामान्य स्त्री-पुरुष या सर्वांचीं हृदयें सानेगुरुजींच्यासाठीं इतकीं उचंबळून कां येतात ? या सर्वांच्या हृदयाला वेड लावण्यासारखें त्यांच्यांत काय अलौकिकत्व आहे ? साने गुरुजींच्यापेक्षां एकेका विशिष्ट क्षेत्रांत अधिक बुद्धिमान, अधिक कर्तृत्वसंपन्न आणि संघटनाकुशल लोक महाराष्ट्रांत नाहींत असें नाहीं. व्यक्तिगत चारित्र्याच्या दृष्टीनें त्यांच्याइतकी शुद्धता संपादिलेले लोकहि महाराष्ट्रांत आढळतील. त्यांच्यापेक्षां अधिक स्वार्थत्याग केलेलीं माणसेंहि सध्यांच्या महाराष्ट्रांत अगदींच दुर्मिळ आहेत असें नाहीं. असें असूनहि या सर्वांपेक्षां साने गुरुजींच्या चारित्र्याचा प्रभाव जनमनांवर अधिक कां आहे ? साने गुरुजींची ही लोकप्रियता, म्हणजे एक तात्पुरतें खूळ आहे असें म्हणून या प्रश्नाची बोळवण करणें मला शक्य वाटत नाहीं. कारण हें खूळ भासलें तरी त्याच्या पाठीमागें कांहींएक सत्य वावरत आहे—असें मला दिसत आहे. या प्रस्तावनेच्या प्रसंगानें तें व्यक्त करण्याचा मी प्रयत्न करणार आहें.

मनुष्याच्या जीवनांत सामान्यतः स्वतःसंबंधाचें प्रेम केंद्रस्थानीं असतें. आपल्यासाठीं सुख मिळवावें, आपलें वैभव वाढवावें, इतरांवर आपलें प्रभुत्व प्रस्थापित करावें अशी सामान्य माणसाची स्वाभाविक प्रवृत्ति असते, त्यासाठीं तो आपल्या सर्व शक्तींचा विनियोग करीत असतो. असें

करीत असतांना त्याला अनेक शक्तींचा आणि व्यक्तींचा सहकार अपरिहार्य होत असल्यामुळें अगदीं संकुचित अथवा निरतिशय स्वार्थी बनून भागत नाही. इतरांच्या सुखाचाहि आपल्या सुखात समावेश करण्याइतकी त्याला आपली मनोवृत्ति उदार बनवावी लागते. यामुळें सर्वसाधारण माणसें थोडया उदारपणानें आपल्या विकासाचा मार्ग आक्रमीत असतात. त्यांना भौतिक सुखाची एका विशिष्ट मर्यादेपर्यंत आवश्यकता असते व त्यासाठीं त्यांना भौतिक जगाशीं झगडा करावा लागतो. या झगडयांतून नाना शास्त्रें, नाना कला आणि विविध प्रकारच्या संघटना निर्माण होतात. सामान्य जनतेंतील सर्वच व्यक्ति समान बुद्धिमत्तेच्या आणि समान कर्तृत्वाच्वा असत नाहींत. काहीं काहीं व्यक्तीमध्यें तर असामान्य बुद्धि, असामान्य कर्तृत्व हीं उदयास येतात. अशा असामान्य पुरुषामधून सामाजिक संस्कृतीची पातळी उच्चतेला नेण्यास कारणीभूत होणारे लोक पुढे येतात. या लोकांचें व्यक्तिमत्त्व सामान्य जनतेपेक्षां अधिक उच्च बनलेलें असतें. तथापि अशा लोकांचा आपल्या व्यक्तिमत्त्वाचा अहंकारहि प्रबळ झालेला असतो. त्यामुळें या लोकांबद्दल सामान्य जनतेला आदर वाटत असला, तरी त्यांत भीतीचाहि अंश असतो. यामुळें समाजात वर्गभेद निर्माण होतो. उच्च वर्गाच्या हातीं स्वाभाविकच सत्ता, संपत्ति, आणि सुख यांचें केंद्रीकरण होत जातें. सामान्य जनतेचा जीवनाचा आधार या उच्च वर्गाच्या कर्तृत्वावर असल्यामुळें सामान्य जनतेंत एक प्रकारची दास्यभावना पसरत जाते. हळूहळू उच्चवर्गीयाचे अहंकार अधिकाधिक संकुचित, उद्दाम आणि ओंगळ बनूं लागतात. अशा वेळीं या उच्चवर्गीयांमधून कांहीं असामान्य भावनाशक्तीच्या व्यक्ति पैदा होतात. आणि आपल्या उच्चवर्गीय अहंकाराचें कवच फोडून त्याचें जीवन सामान्य जनतेच्या जीवनाशीं एकरूप होतें. सामाजिक जीवनाच्या विकासांत ही प्रक्रिया वरचेवर घडत आलेली आहे. या प्रक्रियेमुळें समाजांत समतेचे नवीन आदर्श निर्माण होतात. या नव्या आदर्शाच्या सिद्धीसाठीं समाजांतून पुन्हां नवे बुद्धिवान् आणि कर्तृत्ववान् वीर नव्या आदर्शाच्या अस्मितेनें रंगून जाऊन कार्यप्रवण होतात. आणि साऱ्या समाजाला संस्कृतीच्या नव्या उच्च पातळीवर घेऊन जातात. समाजाच्या नव्या आदर्शाच्या निर्मितीसाठीं भावनावादी आणि बुद्धिवादी असे

दोन प्रकारचे नवे वीर निर्माण झाले, तरी त्या दोघांकडे पाहण्याची सामान्य जनतेची दृष्टि वेगवेगळी असते. बुद्धिवादी आणि कर्तृत्वसंपन्न अशा संघटनावीराची सामान्य जनता पूजा करील तथापि त्याच्याविषयीं तिला एक प्रकारचा वचकहि भासेल. पण शुद्ध भावनेच्या उत्कटतेनें जनता-हृदयाशीं एकरूप झालेल्या भाव-वीराबद्दल असा वचक वाटण्याचे कारणच असत नाहीं. कारण भावना ही समाजांतील सर्व व्यक्तींना ओळखतां येण्यासारखी वस्तु आहे. भावनेच्या पातळीवर सर्वांची समानता होऊं शकते. तेथें सर्वांना तद्रूपतेची जाणीव लाभते. हृदयीच्या प्रेमरसायनानें विषमतेच्या साऱ्या खाड्या भरून जातात. म्हणून क्रांतिकाळांतहि बुद्धिवीरापेक्षा भाववीर अधिक प्रभावी होतात. आजच्या महाराष्ट्रीय समाजांत साने गुरुजी हे या प्रकारचे अलौकिक भाव-वीर आहेत, हें कोणालाहि कबूल करावें लागेल.

साने गुरुजींची मनःप्रकृति संतप्रवृत्तीची आहे. त्यांना स्वतःच्या शरीर सुखाचा मुळींच हव्यास नाहीं. पहिल्या प्रतीची बुद्धिमत्ता असतांहि पांडित्याच्या निर्मितींत त्यांच्या बुद्धीला रस वाटत नाही. मानवतेचे प्रेम त्यांच्या हृदयांत तुडुंब भरून राहिलेलें आहे. दुःखाच्या दर्शनाने काय पण केवळ कल्पनेनें देखील विव्हल होण्याइतकी कोमलता त्यांच्या ठायीं आहे. यामुळें बाल-बालिका आणि खेड्यापाड्यांतील स्त्री-पुरुष यांच्याशी ते चटकन् एकरूप होऊं शकतात. त्या वेळीं त्याची बुद्धि, त्यांची विद्वत्ता अथवा त्याचें कर्तृत्व हृदयांतील प्रेमांत बुडून जाऊन संपूर्णपणें विलीन होतात. आपल्या प्रचंड भाव-शक्तीच्या साहाय्यानें भोंवतालच्या भावनाशील भाबड्या समाजाशीं तन्मय होऊन गेल्यामुळें त्या समाजाची संपूर्ण जीवनशक्ति ते हादरून सोडतात. ही प्रेमाची अद्भुत किमया हे साने गुरुजींच्या अलौकिकतेचें एकमेव रहस्य आहे, अशी माझी खात्री झालेली आहे. त्यांची प्रेमवृत्ति स्वतःसिद्ध आहे, त्यानीं ती प्रयत्नानें अथवा अनुकरणानें मिळविलेली नाहीं. ती व्यक्त करण्यांत लौकिक अथवा अलौकिक कोणताहि हेतु असत नाहीं. वर्षणें हा मेघाचा, वाहणें हा नदीचा, पसरणें हा वाऱ्याचा, जसा स्वभाव आहे; त्याप्रमाणें प्रेम करणें हा साने गुरुजींचा स्वभाव आहे. तें प्रेम इतकें उदंड आहे कीं, ठराविक

व्यक्तींभोंवतीं ते फिरत राहात नाहीं. ते इतकें आधळे आहे कीं, त्याला समोरचा दोष दिसूं शकत नाहीं. या प्रेमानें त्याना स्वतःच्या शारीरिक आसक्तीपासून मुक्त केलें आहे. त्याना विश्वकुटुंबी बनविलें आहे. सत्तेचा, संपत्तीचा अथवा क्षुद्र स्वार्थाचा त्यांना कधीहि स्पर्श झालेला नाहीं. राजकारणातील त्याचे कट्टे प्रतिस्पर्धी देखील ही गोष्ट मुक्तकंठाने कबूल करितात.

मूळच्या संत प्रकृतीला देशसेवेच्या आधुनिक सामाजिक ध्येयवादाची जोड मिळाल्यामुळें साने गुरुजींच्या या प्रेमशक्तीला सामाजिक दृष्ट्या विशेष प्रकारचें महत्त्व आले आहे. त्याची प्रेमशक्ति ही कोठल्याहि विषमतेचा आणि अन्यायाचा स्वीकार करू शकत नसल्यामुळे तिला सर्वांगीण क्रांतिवादाचें स्वरूप लाभले आहे. भारतीय सताचा आध्यात्मिक प्रेममार्ग असाच होता. फक्त आधुनिक काळाला अनुसरून साने गुरुजीच्या जीवनात त्याला ऐहिक स्वरूप लाभले आहे. महात्मा गाधींचा अहिसात्मक क्रातिवाद आणि रवींद्रनाथ ठाकूर याचा सास्कृतिक आदर्श हे आधुनिक भारतातील दोन्ही ध्येयवाद तत्त्वत: याच स्वरूपाचे असल्यामुळे साने गुरुजींच्या जीवनावर त्याचा विलक्षण परिणाम झाला असल्यास त्यात काहीच आश्चर्य नाही. याच कारणामुळे अलीकडे कित्येक वर्षे त्याच्यावर 'समाजवादा'चा वाढता परिणाम होत असलेला दिसून येत आहे. याप्रमाणें साने गुरुजीच्या द्वारा महाराष्ट्रीय जनमनावर होत असणारे सस्कार हे वैचारिक दृष्ट्याहि पुरोगामी आणि शुभपरिणामी ठरत आहेत.

साने गुरुजींच्या कार्याचा प्रारंभ खानदेशांत झाला, ही गोष्ट देखील लक्षात ठेवण्यासारखी आहे. खानदेशाची भूमि साने गुरुजींसारख्या प्रेममूर्तीला सर्वस्वी अनुरूप अशीच आहे. बौद्धिक दृष्ट्या खानदेश इतर महाराष्ट्राच्या मानाने बराच मागसलेला आहे. निदान पंचवीस वर्षांपूर्वी तरी होता असें म्हणता येईल. तेथल्या सुपीक भूमीवर वाढलेली जनता शरीरानें धडधाकट आणि मनानें दिलदार अशी आहे. तेथील कोंवळ्या तरुणांना साने गुरुजींसारखा प्रेमळ शिक्षक लाभल्याबरोबर त्याच्या जीवनांत अननुभूत उत्साह आणि आशा याचा संचार झाला. साने गुरुजींनीं अंमळनेरला शिक्षणक्षेत्रांत प्रवेश केला, त्या वेळीं त्याचे वडील नुकतेच निवर्तले होते. त्याची मातु:श्री जाऊन पांच सहा वर्षें लोटलीं होतीं यामुळें त्यांचेवर

विशेष बंधन उरलें नव्हतें. लग्नाच्या बंधनांत पडण्याची त्यांना उत्सुकता नव्हती. यामुळें विद्यार्थ्यांच्या जीवनांत ते संपूर्णपणे मिसळून गेले. आपली सारी बुद्धि, सारी संपत्ति त्यांनीं मुक्त हस्तानें विद्यार्थ्यांच्या विकासासाठीं वेंचलीं. विद्यार्थी हेंच त्यांचे कुटुंब बनले. आणि या विद्यार्थ्यांच्या द्वारांच त्यांनीं खानदेशच्या जनतेंत प्रवेश केला. १९३० च्या सत्याग्रह संग्रामामध्यें त्यांनीं आपल्या स्फूर्तिदायक वक्तृत्वानें अखिल खानदेश जागृत करून सोडला. याच सुमारास त्याची कवित्वशक्ति जागी झाली. देवप्रेमाच्या व देशप्रेमाच्या असंख्य गीताना तिने जन्म दिला. तुरुंगवासांत अनेक प्रकारच्या आपत्ति भोगीत असताहि त्याच्या साहित्यनिर्मितीला खंड पडला नाहीं. १९३२–३४ च्या दुसऱ्या लढ्यांतहि त्याचें लोकजागृतीचें आणि साहित्यनिर्मितीचें कार्य चालूच राहिलें. नंतरच्या सनदशीर राजकारणाच्या काळातहि त्यांचें लोकाभिमुखत्व मंद झालें नाहीं. उलट कॉंग्रेस नांवाचें साप्ताहिक पत्र काढून जनतेच्या विचाराला सुशिक्षित करण्याचें काम त्यानीं चालविले. या वेळीं कॉंग्रेसमधील अधिकारी मंडळीशीं त्यांचे खटके उडूं लागले. जहाल गटांशीं आणि कम्युनिस्टांशीं त्यांचे सहकार्य वाढूं लागलें. तथापि त्यांच्या जीवनांत कसल्याहि प्रकारचा स्वार्थ नसल्यामुळें त्याची कॉंग्रेस–निष्ठा शुद्धच राहिली. या काळात महाराष्ट्राच्या इतर जिल्ह्यांतहि त्यांचा प्रवेश झाला आणि ४२ च्या आदोलनामध्ये त्यांनीं साऱ्या महाराष्ट्रातील विद्यार्थी, कामकरी आणि शेतकरी याची मनें आकर्षून घेतलीं. त्यांच्या प्रभावाचा हा वाढता विकास पाहिला म्हणजे त्याची लोकप्रियता केवळ आगंतुक आहे असें म्हणतां येणार नाहीं. आपल्या अविरत उद्योगानें आणि अखंड तपश्चर्येनें त्यांना जनमनांत स्थान प्राप्त झालें आहे. देशाभिमानाच्या भावनेनें तरुणांचीं मनें भारून टाकण्याच्या कामीं त्यांचा हातखंडा आहे. ध्येयवादाच्या, त्यागाच्या, सेवेच्या कल्पना त्यांच्या सान्निध्यांत आलेल्या कोणाहि मनुष्याच्या हृदयांत सहज प्रादुर्भूत होतात. रुक्ष आणि पंडित भासणाऱ्या हृदयांतहि भावनेचा ओलावा निर्माण करण्याचें त्यांचें सामर्थ्य मोठें अजब आहे. या त्यांच्या कामगिरीमुळें त्यानीं महाराष्ट्रांत एक नवें युग सुरू केलें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

महाराष्ट्राच्या वाङ्मयीन जीवनांतहि त्यांनीं विलक्षण क्रांति घडवून आणली आहे. लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रांत जें विचारांचें अराजक सुरू झालें त्यांत महाराष्ट्रसाहित्याचें ध्येयवादित्व लोपून त्याला उथळ कलाविलासाचें क्षुद्र स्वरूप प्राप्त झालें. भावनेला तुच्छ लेखून केवळ बुद्धीचा बडिवार माजविणारा एक प्रतिष्ठित संप्रदाय निर्माण झाला. लोकमान्य टिळकांच्या मृत्यूपर्यंत साहित्याचे दोन संप्रदाय महाराष्ट्रांत वावरत होते. एका संप्रदायांत पाश्चात्य संस्कृतींतील बुद्धिवाद, व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक समता. लोकशाही इत्यादि सांस्कृतिक मूल्यांचा जोमदार पुरस्कार होत असे. आणि दुसऱ्या संप्रदायात भारतीय संस्कृतीचे श्रेष्ठत्व, राजकीय स्वातंत्र्य, आध्यात्मिक ध्येयवाद इत्यादि गोष्टींवरील निष्ठा घोषित होई. खरोखर या दोनहि संप्रदायाचें मीलन करून दाखविण्याची कामगिरी महाराष्ट्रांतील बुद्धिवंतानी आणि साहित्यिकांनी करून दाखविणें अगत्याचें होतें. पण हें करावयाचें म्हटलें, तर त्यासाठीं एक उच्च जीवन-निष्ठा निर्माण करावी लागली असती. अशी जीवन–निष्ठा निर्माण करण्याची शक्यता टिळकांच्या मृत्यूच्यावेळीं महाराष्ट्रांतील बुद्धिमंतांत आढळून आली नाहीं. सुधारणावादी आणि स्वातंत्र्यवादी दोन्ही संप्रदायांतील बहुतेक जुने लोक थकून भागून निराश झाले होते. त्यांच्या स्वतःच्या पूर्वीच्या निष्ठाहि आता दुर्बळ झाल्या होत्या. मग नवीन निष्ठा निर्माण करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत कोठून असणार ? युरोपांतील पहिलें महायुद्ध संपल्यानंतर पाश्चात्य संस्कृतीची रशियामध्यें एक नवीन आवृत्ति निघाली. त्यामुळें पाश्चात्य संस्कृतीच्या येथील पूजकांत विलक्षण गोंधळ उडाला. भांडवलदारी संस्कृति ही पुरोगामी कीं समाजवादी संस्कृति पुरोगामी याचा तंटा सुरू झाला. महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं हिंदुस्थानांत असहकारयुगाचें जें विराट आविष्करण झालें, त्यानें महाराष्ट्रांतील दुर्बळ बुद्धिवादि संपूर्णपणें भांबावून गेले. दुर्दैवानें त्यावेळच्या महाराष्ट्रांतील बहुतेक बुद्धिवंतांना या दोनहि घटनांचा उलगडा होऊं शकला नाहीं. रशियांतील क्रांति आणि हिंदुस्थानांतील क्रांति या दोहोंचें मर्म ध्यानीं न आल्यामुळें महाराष्ट्रांतील विचार कित्येक वर्षेपर्यंत अडखळून राहिला आणि त्याचा परिणाम म्हणून महाराष्ट्रांतील साहित्य ध्येयहीन, भावहीन झालें. जीवनांतील जोमदार स्पर्श

अदृश्य झाल्यामुळें निष्प्राण झालेलें साहित्य तंत्रवादाच्या आश्रयानें तजेलदार करण्याचे प्रयत्न सुरू झाले. आणि शैली ही साहित्याची कसोटी बनली. जीवनांतील सारे उच्च ध्येयवाद लोपल्यामुळे इंद्रियविलासालाच गौरविण्याचे प्रयत्न वाढूं लागले. परंतु विलासाची तरी शक्यता कोठें आहे ? महाराष्ट्र आधींच दरिद्री आणि त्यांतहि साऱ्या हिंदुस्थानबरोबर साम्राज्यशाहीच्या पाशांनी जखडून टाकलेला. यामुळे इंद्रियविलासाचीं शब्दचित्रें रंगविणें एवढेच हातीं उरलें. अशीं शब्दचित्रे काढून देणाऱ्याना थोर कलावंत म्हणून मिरविण्याचा एक तुटका संप्रदाय तयार झाला. या संप्रदायाचें आयुष्य आतां संपलेले दिसते. गेल्या पंचवीस वर्षांच्या महाराष्ट्रीय चळवळीचा निष्कर्ष म्हणून आज विश्वासपूर्वक असे सागता येईल की, महाराष्ट्रातील हें अराजक आतां संपूर्णपणें मोडलेलें आहे. महाराष्ट्रातील अखिल जनता आतां जागृत झाली आहे. तिचे नेतृत्व करणारे खंदे वीर आता पुढे आलेले आहेत. सांस्कृतिक विचारांचें घुसळण होऊन नव्या मूल्याच्या स्पष्ट कल्पना निर्माण झाल्या आहेत. नवा बुद्धिवंताचा वर्ग हळूहळू आपले साम्राज्य स्थिर करूं लागला आहे. जीवनाची नवी निष्ठा निर्माण होऊन तिनें आपलें आसन स्थिर केले आहे. या सर्वांचा परिपाक म्हणून साहित्यातहि नवी निष्ठा व्यक्त होत आहे. १९३५ च्या राष्ट्रीय आठवड्यांत साने गुरुजींच्या काव्यांचा संग्रह ‘ पत्री ’ या नांवानें प्रसिद्ध झाला. त्यांतील कवितांनीं खानदेशांतील सामान्य जनतेचें हृदय हलविलें असलें, तरी महाराष्ट्रीय साहित्यिकांच्या बुद्धीला त्याचे मुळींच आकर्षण भासले नाहीं. त्यानंतर ‘ श्यामची आई ’, ‘ श्याम ’, ‘ जीवनकलह ’, ‘ विश्राम ’, ‘सोन्या मारुति’ आणि ‘ भारतीय संस्कृति ’ अशीं पुस्तकें दोन अडीच वर्षांच्या काळांत प्रसिद्ध झालीं. त्यांची ‘ श्यामची आई ’ प्रसिद्ध झाल्याबरोबर महाराष्ट्रांत जणूं एक चमत्कारच झाला. त्या पुस्तकाची महाराष्ट्रात मोठमोठ्या साहित्यिकांनींहि मुक्तकंठानें स्तुति केली. आणि विद्यार्थि-विद्यार्थिनींना तर ह्या पुस्तकानें अक्षरशः वेड लावलें. त्या पुस्तकाच्या आतांपर्यंत आठ आवृत्त्या निघाल्या आहेत. ‘ भारतीय संस्कृती ’च्या तीन आवृत्त्या झाल्या. आणि आतांपर्यंत त्या पुस्तकाच्या सहा हजारांवर प्रति खपल्या. ‘भारतीय संस्कृति’-नंतर गेल्या सात आठ वर्षांत त्यांचीं लहानमोठीं २५-३० पुस्तकें

प्रसिद्ध झालीं आहेत. आज महाराष्ट्रात साने गुरुजींच्या साहित्याचा खप पहिल्या प्रतीचा आहे ही गोष्ट सर्वांना माहित आहे. यामुळें साने गुरुजींच्या साहित्याने महाराष्ट्राच्या वाङ्‌मयीन जगात एक नवीन युग निर्मिले आहे, ही गोष्ट कोणासहि नाकबूल करिता येणार नाही.

साने गुरुजीचे साहित्य त्याच्या असामान्य व्यक्तित्वाच्या वैशिष्ट्यानें संपूर्णपणे रंगलेले आहे. त्याचें जीवन ज्याप्रमाणें स्वाभाविक आणि अकृत्रिम भावनेचा आविष्कार आहे, त्याचप्रमाणे त्याच्या साहित्यांतही स्वाभाविक भावनांची अकृत्रिमता व्यक्त झालेली आहे. निसर्गाच्या आविर्भावात जशी धडपड, झटापट आणि अबोधपूर्ण अहैतुकता आढळून येते, तशीच त्याच्या जीवनाची आणि साहित्याची अवस्था आहे. यामुळे निसर्गाच्या जिवंतपणाबरोबरच निसर्गाचा आधळेपणाहि त्यात आढळतो. उद्दाम प्रेमभावना ही त्याच्या जीवनातील स्थायी वृत्ति असल्यामुळे जनतेच्या सुखदु:खाशी ते विलक्षण रीतीने एकरूप होऊन सामाजिक अन्याय आणि विषमता याच्याशी झुंज घेण्याला ते नेहमीं प्रवृत्त असतात. यासाठी कोणत्याहि त्यागाला ते कमी पडणार नाहीत. तथापि सामाजिक क्रांतीसाठी व्यवहारनिष्ठ बुद्धीने संघटना बांधण्याचें काम त्यांचे हातून होणार नाही. जनतेमध्ये आपल्या शुद्ध चारित्र्याने ते असामान्य जागृति निर्माण करूं शकतील; पण जागृत झालेल्या भावनेला दैनंदिन कार्यक्रमात गुंतवून अखंड कार्यक्षम बनविण्याचें कार्य त्याना साधणार नाहीं. क्रांतीसाठी ते जनताहृदयाला विशिष्ट वेळीं आवेशानें उद्युक्त करतील; पण क्रांतीचा प्रत्यक्ष कार्यक्रम ते बांधून देऊं शकणार नाहींत. त्यासाटी लागणारी तटस्थ वृत्ति, भावनाचा आवेग विशिष्ट वेळीं विशिष्ट मर्यादित राखण्याचा संयम, ध्येयवादाच्या सिद्धतेसाठीं अवश्य असणारा बुद्धिवाद आणि प्रत्यक्ष क्रांतिकार्यात अवश्य असणारी शिस्तीची कठोर वृत्ति या गोष्टी त्यांच्या आत्यंतिक भावशक्तीमुळें त्याना वापरतां येत नाहींत. या गोष्टीची गरज न समजण्याइतके ते बुद्धिहीन नाहीत;पण त्यांचा स्वभावच निराळा बनलेला आहे. याची त्यांना जाणीव असल्यामुळें ते आपणाला पुढारी समजत नाहींत आणि पुढारी होण्याचा अहकारहि त्याच्या वृत्तीत कधीं आढळून येत नाहीं. निसर्गातील प्रत्येक शक्तीला एक मर्यादाहि असते. तिची शक्ति हीच तिची मर्यादा

होते. प्रेमभावना ही एक थोर निसर्गशक्ति आहे. मानवी जीवनांत तिचें सर्वोत श्रेष्ठ स्थान आहे. प्रेमाची भावना जागृत झाल्यानंतर खऱ्या बुद्धीचे डोळे उघडतात. आणि ती प्रेमाला व्यावहारिक यशस्विता आणून देण्याच्या मार्गोचें संशोधन करूं लागते. प्रेमाच्या कह्यात चालणारी बुद्धि ही मानवाची थोर संपत्ति आहे. बुद्धिवादाच्या नांवाखालीं स्वार्थसाधनाची अखंड धडपड समाजांत सतत आढळते. पण ती या थोर संपत्तीची विकृति होय म्हणून समाजाच्या इतिहासांत या विकृत बुद्धिवादाच्या विरुद्ध प्रेम-शक्तीचा गौरव करणारे अनेक जीवन–वीर निर्माण होत असलेले आढळ-तात. धार्मिक वाङ्मयांमध्यें जिला श्रद्धा हें नांव देण्यात आलेलें आहे ती हीच वस्तु होय. बुद्धीचा स्वभाव द्वैत निर्माण करण्याचा असल्या-मुळें ती अद्वैताचा अनुभव घेण्यास नेहमींच अपुरी पडते. त्या अनु-भवासाठीं बुद्धीच्या पलीकडच्या शक्तीची गरज असते. ही शक्ति माणसाला हृदयाच्याद्वारा प्रतीत होत असल्यामुळें तार्किक ज्ञानापेक्षां हृदयाची श्रद्धा श्रेष्ठ मानण्यात आलेली आहे. सामाजिक क्रांतीसाठीं देखील या श्रद्धेचाच मुख्य उपयोग होत असतो. ही श्रद्धा जोंपर्यंत जागृत झाली नाहीं, तोंपर्यंत क्रांतीचे बोबडे बुद्धिवाद व्यर्थ आहेत. अशी जिवंत श्रद्धा ज्या पुरुषाच्या जीवनात व्यक्त होत असेल, तो पुरुष समाजांत नव-युगाचा प्रारंभ करतो. साने गुरुजींनीं महाराष्ट्राच्या सामान्य जनतेंत असें नवीन युग सुरूं केल्याचें दिसत आहे. हिंदुस्थानांत महात्मा गांधींनीं अशा प्रकारच्या नव–युगाला जन्म दिला असून त्याच्या निर्मितीची सिद्धि करण्याचें कार्य कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं अत्यंत जोमानें चालले आहे. साने गुरुजींनीं आमच्या जीवनांत कॉंग्रेस हेंच परम दैवत बनविलें आहे आणि आपली सारी भावशक्ति त्या दैवताच्या पायीं वाहण्याचा संकल्प केला आहे. यामुळें त्यांच्या भाव-सामर्थ्याचा महाराष्ट्राला अपार फायदा मिळेल. महाराष्ट्रांतील थोर पुढाऱ्यांनीं साने गुरुजींच्या या प्रचंड भावशक्तीचें प्रत्यक्ष संघटनेंत परिवर्तन करून घेण्याची दक्षता बाळगिली पाहिजे. आपल्या साहित्यानें हीच गोष्ट साने गुरुजी सिद्ध करून दाखवीत आहेत. साहित्यानें जीवनाचें हृदय जागृत झालें पाहिजे. हृदयांतील आशा आणि श्रद्धा प्रफुल्लित झाल्या पाहिजेत. सत्य, साधुत्व आणि सौन्दर्य यांचें अपार आकर्षण वाटूं लागलें

पाहिजे. असत्याची चीड, अन्यायाचा निरोध, क्षुद्रपणाचा तिरस्कार, दैन्य आणि दारिद्य यांचे विरुद्ध संताप, दुष्टपणा आणि कुरूपता यांचेंविषयीं क्रोध जीवनांत निर्माण व्हावयास पाहिजे. वैयक्तिक सुखलालसांपेक्षा सामाजिक विकासाच्या चळवळींचा हव्यास अधिक मोहक वाटला पाहिजे. साहित्याचें समाजजीवनांतील हेच महनीय प्रयोजन आहे. साने गुरुजींचें साहित्य याच कळकळीनें निर्माण झालेले आहे. त्यांत तंत्रबद्धता नसेल, जागोजाग पुनरुक्ति, पाल्हाळ, कलानिर्मितीच्या सहेतुक जाणीवेचा अभाव इत्यादि पुष्कळ दोष बुद्धिवादी टीकाकाराला सहज सांपडतील. मीं ते कधीं नाकारले नाहींत. तथापि साने गुरुजींच्या साहित्यांत हृदयाची पकड घेणारें अलौकिक सामर्थ्य आहे हें कोणालाहि नाकारतां येणार नाहीं. ‘पत्री’ची प्रस्तावना लिहिण्यापूर्वी त्यांचें विपुल वाङ्मय मी हस्त–लिखित रूपांत वाचलें होतें. त्यांच्या प्रत्यक्ष सहवासात मीं बराच काळ काढला होता. त्यामुळें मला त्यांच्या जीवनाचें व साहित्याचें जें वैशिष्टय वाटलें, तें त्या प्रस्तावनेंत मोकळेपणानें महाराष्ट्राला निवेदन केलें होतें. आज दहा वर्षांनंतर ही प्रस्तावना लिहीत असतांना माझ्या त्यावेळच्या मतांत बदल करण्याची आवश्यकता आहे, असें मला भासत नाहीं. त्यांचें साहित्य लोकहृदयाची पकड घेईल अशी माझी पक्की खात्री होती. गेल्या दहा वर्षांच्या अनुभवानें ती गोष्ट आतां पूर्णपणें सिद्ध झाली आहे. साने गुरुजींच्या साहित्यानें महाराष्ट्राच्या विद्यार्थीवर्गात आणि सामान्य जनतेंत जी अभिरुचीची क्रांति घडवून आणली आहे, त्याबद्दल महाराष्ट्रानें त्यांचें सदैव ऋणी राहिलें पाहिजे.

साने गुरुजींच्या साहित्याचें स्वरूप साधेभोळें, भाबडें भासलें, तरी त्याच्यामध्यें हृदयाचें सौंदर्य जागोजाग ओसंडून येत असलेलें आढळतें. त्यांत कला आहे, पण ती हृदयाची स्वाभाविक कला आहे. कलेच्या जाणीवेनें बुद्धीचें चातुर्य वापरून तिला सफाई आणण्याचा कोठेंहि प्रयत्न केलेला आढळून येणार नाहीं. त्यांच्या साहित्यांत सौंदर्य आहे. पण तें हृदयाचें सहजसौंदर्य आहे. बुद्धीला दिपवून टाकणारी सौंदर्याची आतषबाजी त्यांत कोठें आढळणार नाहीं. याचें कारण तें साहित्य केवळ हृदयाच्या तळमळीनें निर्माण झालें आहे. मानवप्रेम हाच त्याचा एकमेव स्थायीभाव आहे.

आजच्या यांत्रिक जगामध्यें, बुद्धिविकासाच्या या काळामध्यें, माणसांचीं हृदयें शुष्क होत चाललीं आहेत. मानवप्रेमाचा झरा आटून गेला आहे. ही अत्यंत भयानक घटना आहे. मनुष्यसमाजाला जर जगायचें असेल, तर त्याचें हृदय पुन्हा जागृत केलें पाहिजे. प्रेमाचा झरा पुन्हां उसळूं लागला पाहिजे. बुद्धीच्या कृत्रिमतेची आपली आसक्ति कमी झाल्याशिवाय हे कार्य होणार नाहीं. सानेगुरुजी बुद्धीला विसरण्यांत एक आनंद अनुभवूं शकतात, तोच आनंद त्याचें साहित्य वाचतांनाहि वाचकाला अनुभवितां येतो. त्यांचें साहित्य वाचकाच्या बुद्धीला दिपवूं पाहत नाही, तर हृदयाला भुलवूं पाहतें; आणि ज्या समाजाला उद्देशून तें साहित्य निर्माण करण्यात आलेलें आहे, तो समाजहि अजून बुद्धिवादी बनलेला नाहीं. हृदयाने हृदयाशीं बोलावें, जीवाने जिवात मिसळून जावे, आत्म्याने आत्म्यांत प्रवेश करावा, अशा थाटाचे ते साहित्य आहे. त्यांतील घरगुतीपणा, त्यातील भावनांचा गोडवा, त्यांतील भाषेचे सहजत्व यामुळें त्या साहित्याला एक अलौकिक मनोहारित्व लाभलेलें आहे. यामुळे त्या वाङ्मयाला अवीट गोडी प्राप्त झाली आहे. सहस्रावधि हृदयांचा हा अनुभव खोटा म्हणता येईल काय? त्या साहित्याच्या वाचनाने सहस्रावधि जीवनात जी भावशुद्धि घडून येत आहे, तिची सामाजिक दृष्ट्या उपेक्षा करणे शक्य आहे काय? साने गुरुजीच्या टीकाकारांनीं या गोष्टींकडे अवश्य लक्ष पुरविले पाहिजे. साने गुरुजींचे साहित्य हा एक साहित्याचा संपूर्ण आदर्श आहे, असे मीं केव्हांहि म्हटलें नाहीं. पण त्या आदर्श साहित्याकडे त्याने तोंड वळविलें आहे. ही गोष्ट कोणीं नाकारूं शकणार नाहीं. साने गुरुजींच्या लेखन पद्धतीचें अनुकरण करून सर्वांनीं तसेंच लिहावें असेंहि माझें मत नाहीं. पण ज्या कोणाला साहित्यकार व्हावयाचें असेल, त्याच्याजवळ हृदयाचा जिवंत-पणा आधीं असला पाहिजे; मानवप्रेम हृदयांत जागृत झाल्याशिवाय श्रेष्ठ साहित्य कधींहि निर्माण होणार नाहीं, असा माझा दृढ विश्वास आहे.

सानेगुरुजी हे बहुजनसमाजाच्या हृदयांची पकड घेणारे आधुनिक महाराष्ट्रांतील पहिलेच साहित्यकार आहेत असें माझें मत आहे. आपल्या साहित्यांतील सर्व चळवळी सुशिक्षित लोकांपुरत्या मर्यादित राहतात. साहि-त्याचीं कांहीं क्षेत्रें विशेष बुद्धिवंतापुरतीं मर्यादित राहणे अपरिहार्य असलें,

तरी सामान्य जनतेचें हृदय हातीं घेणारें साहित्य निर्माण करण्याची खास आवश्यकता आहे. असें साहित्य निर्माण झाल्याखेरीज आपलें सामाजिक जीवन समृद्ध होणार नाहीं. साहित्याचा व्याप सामान्य जनतेच्या दैनंदिन जीवनापर्यंत पोंचला पाहिजे. ललित साहित्याचें स्वरूप केवळ निरुद्योगी श्रीमंताची करमणूक करणारें अथवा मूठभर मध्यमवर्गीय बुद्धिवंताना कलात्मक आनंद देणारे असे संकुचित असून चालणार नाहीं. कारण ललित साहित्याच्या सौंदर्यांत हृदय जागृत करण्याची शक्ति असते. या शक्तीचा साहित्यिकाला प्रत्यय आला पाहिजे. ज्या साहित्यकाराला सौंदर्याच्या या शक्तीचा प्रत्यय येतो, तो साहित्यकार आपल्या साहित्याचे प्रयोजन केवळ सौंदर्यनिर्मिति आहे हे मानूं शकत नाही. सौंदर्याच्या द्वारा आत्म्याची संपूर्ण जागृति करणे हें त्याचे प्रयोजन बनते. साऱ्या समाजाची आत्मजागृति घडवून आणण्याच्या कामीं ललित साहित्याचा अपार उपयोग होण्यासारखा आहे. साने गुरुजींनीं या कार्याला प्रारंभ केला असल्यामुळे साहित्याचे वतीनें मी त्यांना धन्यवाद देतों. महाराष्ट्राचे तरुण साहित्यिक याच मार्गानें पुढे जाऊन साने गुरुजींच्या साहित्यापेक्षांहि अधिक उज्ज्वल, अधिक सुंदर, आणि अधिक तेजस्वी वाङ्मय निर्माण करून महाराष्ट्रीय जीवन समृद्ध करतील, अशी मला आशा आहे.

**स. ज. भागवत**



## निवेदन

'शारदा मंदिर' धुळें या संस्थेचें वय उणेंपुरें दोन वर्षांचें आहे. ३१–७–१९४४ रोजीं धुळे येथें डॉ. ना. के. महाजन यांच्या दवाखान्यांतील दिवाणखान्यांत धुळ्यांतील व साहित्यसंमेलनाप्रीत्यर्थ विचार करण्यासाठीं जमलेल्या जिल्ह्यांतील कांहीं लेखकांची सहज रीतीनें सभा झाली. सारेच लेखक उदयोन्मुख. आपल्या हातून कांहीं तरी साहित्यसेवा घडावी अशी प्रत्येकाची इच्छा. इच्छा असल्यावर मार्ग सुचावयास विलंब लागला

नाहीं. प्रथम बैठकीला प्रि. वि. म. घुले, न्याहाळोदचे कवि बा. के. पुराणिक ऊर्फ केशवतनय, डॉ. महाजन, श्री. दर्प, श्री. बाबुराव तरटे, श्री. कुसुमकांत भाटे, श्री. कांतिलाल गुजराथी, श्री. वाखारकर, श्री. नांदेडकर, श्री. पु. वि कुळकर्णी इत्यादि सभासद हजर होते व नंतर सौ. गंगूताई वैद्य, सौ. शान्तादेवी तडवी, श्री. ल. नी. छापेकर, श्री. का. प्र. पुराणिक, श्री. आर. के. कुळकर्णी, कु. घासकडबी, श्री. शिदोरे, श्री. जोग, श्री. माळी, श्री. पाठक, श्री. पटवर्धन, डॉ. भागवत व इतर असे सभासद येऊन मिळाले. यांत कांहीं लेखक त्या दिवसापर्यंत मराठी साहित्यांत प्रामुख्यानें वावरलेले होते व काहीं तसा प्रयत्न करीत होते. हेतु हा कीं, जे प्रत्यक्ष लेखक आहेत त्यांचा परस्पर परिचय व्हावा, त्यांनीं एकत्र जमावें, आपलें लिखाण आपापसांत दाखवावें, सूचना द्याव्यात व घ्याव्यात आणि जेणें करून साहित्यनिर्मिति निर्दोष व्हावी व नवीन निर्मितीसाठीं स्फूर्ति मिळावी.

ज्या हेतूनें मंदिराचे सभासद एकत्र आले, तो हेतु हळूहळू सफल होईलच. सुरवातीस डॉ. महाजनांच्या ' झुंज ' या कादंबरीवर चर्चा झाली. श्री. ना. ह. आपटे यांचें ' स्वभावरेखन ' या विषयावर व्याख्यान झालें. प्रो. वि. बा. आंबेकर यांचें तांबेदिनानिमित्त व्याख्यान झालें. श्री. विनोबाजी भावे यांचें ' महात्मा गांधींचें साहित्य ' या विषयावर प्रवचन झालें. हे कार्यक्रम हळूं-हळू होत असतांना प्रत्यक्ष वाङमयनिर्मिति व तीहि सहकारी तत्त्वांवर करणें हें ध्येय सदस्यांनीं दृष्टीआड केलें नाहीं. आज वाचकांच्या हातांत देण्यांत आलेलें हें पुस्तक म्हणजे त्याच तत्त्वाचें फल होय.

पश्चिम खान्देशला महाराष्ट्रांत मागासलेला जिल्हा असें मानण्यांत येतें. पश्चिम खानदेश म्हटला म्हणजे भिल्लांची वस्ती अशीच जवळजवळ सर्वत्र समजूत आहे. परंतु आम्ही ह्या जिल्ह्यांतले लोक अजून बालकवि व विनायकांचीं नांवें विसरणार नाहींत. आधुनिक मराठी काव्याचा खरा पाया खान्देशांत घातला गेला, हें मराठी काव्याचा अभ्यास करणारा कोण-ताहि अभ्यासी मनुष्य विसरणार नाहीं. ठोंबरे–विनायकांच्या परंपरेचा आम्हांला कां बरें अभिमान वाटूं नये ! येथेंच नाथ निफाडकरांचें नांव घ्यावयास पाहिजे. मराठी वाङ्मय व इतिहासविषयक संशोधनाचें फार

मोठें महत्त्वाचें क्षेत्र श्रीसमर्थ वाग्देवतामंदिर व राजवाडे संशोधनमंदिर यांच्या स्वरूपांत आमच्यासमोर आहे. कार्य अफाट आहे. कार्य करणारे मात्र पुढें सरसावले पाहिजेत. आपापले नित्योद्योग सांभाळून फावल्या वेळांत हृदयाला पटणाऱ्या गोष्टी सांगून मोकळे होणें, जमल्यास दुसऱ्यास सांगणें, व शक्य झाल्यास त्यांना पुस्तकी स्वरूप देणें एवढें कार्य जरी मंदिराच्या सदस्यांनीं केले, तरी त्यांत आम्हाला समाधान आहे.

प्रस्तुत सान्यांच्या जीवन–वाङ्मयावरील पुस्तकाची कल्पना मंदिराच्या सदस्याना अतिशय आवडली व त्यांनीं निरनिराळे विभाग पाडून त्यावर त्यांच्या मतीनें लिहावयाचा अल्पसा प्रयत्न केला आहे. सान्याच्या जीवन–वाङ्मयावर लिहिण्याला खरोखरच अधिकारी व्यक्ति हव्यात; तसा सदर पुस्तकांतील प्रस्तावनाकार सोडून कोणालाच अधिकार नाहीं. सान्यांचें जीवन समजणें म्हणजे सोपी गोष्ट नाही. त्याच्या जीवनाशीं तद्रूप झाल्या-शिवाय त्याचें खरें दर्शन कोणाला होणार ? बरें, अजून सान्यांचें कार्यक्षेत्र अधिक व्यापक होणार आहे, त्यांचा कीर्तिसूर्य अजूनहि तेजस्वी होणार आहे. असें जरी असलें, तरी वेळींच असे पुढें महान् थोर व्यक्ति होणारे, आज त्यांच्यांत ते सर्व गुण असले तरी सौजन्यानें तळपणारे साने गुरुजी व त्याचें वाङ्मय यांबद्दल सर्वांनाच विशेष आकर्षण वाटल्यामुळें त्यांच्याच जीवन–वाङ्मयाचा अभ्यास करून या पुस्तकातील लेख लिहिण्यांत आले आहेत. हे लेख कसे उतरले आहेत याचा न्याय मराठी वाचकवर्ग देईल. त्यातील गुण घेऊन दोष पदरांत घेण्यांत येतील, अशी आशा आहे.

मंदिराच्या सदस्यांनीं अंगीकारलेलें हें अभ्यासाचें कार्य आचार्य भागवत यांनीं उदारपणें साहाय्य केलें नसतें तर कदाचित् अपुरेंच राहिलें असतें. सर्व हस्तलिखित प्रत त्यांनीं स्वतः वाचिली व अत्यंत उपयुक्त सूचना केल्या व त्या आम्ही तंतोतंत अमलांत आणल्या. एवढेंच नव्हे, तर आम्हीं विनंति केल्यावरून आपल्या अत्यंत गडबडीच्या नित्याच्या कार्यांतील बहुमोल वेळ खर्च करून आचार्यांनीं सदर पुस्तकासाठीं अत्यंत विद्वत्तापूर्ण अशी अमोलिक प्रस्तावना लिहून आमच्या या कार्यास आशीर्वाद दिला, याबद्दल कोणत्या शब्दांत त्यांचे आभार मानावेत ?

तुरुंगांतील सुटकेनंतर साने गुरुजींनीं खान्देशात जो तुफानी दौरा काढला, त्याचा लाभ ७ सप्टेंबर १९४५ रोजीं धुळ्यास मिळाला. त्यांच्या येण्यानें मंदिरावर अत्यंत उपकार झाले. त्यांच्या निरहंकारी स्वभावामुळें आम्हांला संकोच वाटत होता, तरी पण आम्ही अत्यंत चिकाटीनें त्याचा लेख (व्याख्यानाचा साराश) व संदेश मिळविला. आमच्या विनंतीला मान देऊन ते आमच्या सदस्याबरोबर दोन घांस जेवलेहि. आम्हाला किती कृतार्थ वाटलें असेल त्या वेळीं ! मायभूमीसाठीं पायपीट करणारा .हा महाभाग आमच्या घरच्या कण्यावर संतुष्ट झाला. आम्ही अंतःकरणात भक्तिपूर्वक त्यांची पूजा बाधिली म्हणूनच आम्हांला ते भाग्य लाभले. आमच्या, त्याचें अद्ययावत् छायाचित्र काढावयाच्या हट्टालाहि त्यांनीं होकार दिला. ते आम्हाला प्रसन्न झाले, का आमच्या भक्तीला ?

ज्या ज्या सदस्यांनी ह्या पुस्तकांत लेख लिहिले त्यांचेहि आभार मानणें हें शारदा मदिराचा अध्यक्ष या नात्यानें माझें कर्तव्य ठरते. डॉ. महाजनांचे मित्र व " महाराष्ट्रग्रंथभांडार, मुंबई " या प्रकाशन संस्थेचे मालक श्री. शंकरराव कुळकर्णी यानीं मुद्रण व प्रकाशनाचें महत्त्वाचें कार्य जर स्वतःकडे मोठ्या आपुलकीनें घेतले नसतें, तर हें पुस्तक वाचकवर्गापुढें आलेंच नसतें. त्यांनीं स्वतः एकदां धुळ्यांस येऊन या पुस्तकाबाबत विशेष चालना दिली व मंदिराच्या सदस्याकडून हे कार्य जवळ जवळ करवून घेतलें याबद्दल त्यांचें अंतःकरणपूर्वक आभार मानणें जरूर आहे. शारदामंदिराला मराठी वाचक आशीर्वाद देवोत, हीच इच्छा.

आपला,

**डॉ. मा. ल. सावजी**

अध्यक्ष-शारदामंदिर, धुळें



## सानेगुरुजी–व्यक्ति–परिचय

पैसा, पाश आणि प्रसिद्धि यांच्याकडे पाठ फिरवून, आपल्या ध्येयाची कष्टमय वाट चालणारे सानेगुरुजी आज मराठी वाङ्मयांत निराळ्या वाटा चालत आहेत. ते जातीनें वाड्मयसेवक नाहींत. ते नुसते: सेवक आहेत. सेवा हा त्यांच्या जीवनाचा आत्मा असून तळमळ हा त्यांच्या साहित्योगमाचा प्राण होय. ठेंगणीशी मूर्ति, नम्र स्वभाव व निरलस उत्साह यांमुळें साने हे कार्यशक्तीचे मूर्तिमंत अवतार असल्यासारखे वाटतात. पहांटेपासून मध्यरात्रीं झोंपेपर्यंत त्यांच्या चर्येवर आलस्याची छटा दिसावयाची नाहीं; निराशेनें, स्थगिततेनें त्यांचे डोळे पाणरतील, परंतु त्यांच्या ठिकाणीं अगतिकत्व कधींहि दिसून येत नाहीं. साने हे वाङ्मयसेवक म्हणून महाराष्ट्राला माहित असले, तरी त्यांचा मान पुढारी-सेवक म्हणूनच आहे. त्या व्यतिरिक्त अंमळनेरच्या प्रताप हायस्कुलातील जातिवंत व कळकळीचे शिक्षक म्हणूनहि त्यांना ओळखणारे कित्येक विद्यार्थी अखिल महाराष्ट्रांत पसरलेले आहेत.

साने यांचें घराणें मूळचें कोंकणातलें. ते रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली तालुक्यांतील पालगडचे राहणारे. त्यांचा जन्म २४ डिसेंबर १८९९ रोजीं पालगड येथेंच झाला. कोंकणांतील जीवन, हवापाणी चांगलें असलें तरी, एकूण कष्टमयच. परंतु कष्टमय जीवनाची कमतरता तेजस्वी बुद्धीनें भरून

निघालेली असते, याचीं उदाहरणें कोंकणांतील गांव सोडून, देशावर येऊन आपल्या कर्तृत्वाची साक्ष देणाऱ्या कित्येक पुरुषाच्या चरित्रांवरून स्पष्ट होतात. चिपळूणकर, भांडारकर, परांजपे, टिळक, आगरकर, कर्वे, सावरकर, चापेकर प्रभृति सारे कोकणातीलच. साने याचे वडील चिपळूण तालुक्यातील वडवली या गांवचे खोत होते. गावचा सारा वसूल करून तो सरकारांत जमा करणें व या कामाबद्दल साऱ्याच्या एक-चतुर्थांश रक्कम घेणें हें काम खोताचें असतें आणि ही खोती वंशपरंपरेने चालत असते.

बाळपणांत सान्यांच्या घरांतील संपन्नता त्यांना हवी तशी चाखावयास मिळाली नाहीं. दैवाचे फेरे फिरले आणि सान्याना अखेर आपल्या मातापितरांबरोबर झोपडींत जाऊन राहावे लागले. दारिद्र्याच्या झळा कशा असतात, गरिबांच्या झोंपडींतील सुख कोणत्या प्रकारचें असते, याची जाणीव त्यांना लहानपणींच झाली. त्या वेळीं भोगलेले कष्ट व यातना याचा ठसा त्यांच्या बालमनावर जो एकदां ठसला, तो कायमचाच. लक्ष्मीनें त्याच्याकडे पाठ फिरविली हे खरें; परंतु सरस्वतीनें मात्र त्याची पाठ पुरविली हें तितकेंच खरें. त्यांच्या वडिलांचें नांव भाऊराव. त्याचें शिक्षण तसें कांहीं फारसें झालेलें नव्हते. अर्थात् त्यांची गणना विद्वानांत करतां येणार नाहीं. खोतीच्या कामावर असलेला मनुष्य विद्येची सेवा कोठे आणि किती वेळ करणार? परंतु त्या काळी पुराणश्रवण, संस्कृत सुभाषितें व स्तोत्रें यांचें अध्ययन सर्वसामान्य ब्राह्मण मनुष्याचें असे; थोडें लेखन, वाचन व हिशेब ठेवणे ही तर जीवनांतील आवश्यक बाब. एवढ्याच ज्ञानाचा विचार केला तर भाऊराव हे नुसते खोत नव्हते. आपल्या मुलांबाळांना आपल्याजवळ असलेलें ज्ञान शक्यतोंवर पोंहोंचतें करण्याचें हिताचें कार्य त्यानीं चोख बजाविलें. बालमनावर होणारा पवित्र परिणाम व्हावयाचा तोच झाला. आणि संस्कृत स्तोत्रें, त्रिसुपर्ण, पुरुषसूक्त इत्यादिकांचें पठण लहान मुलांचें त्या काळीं जें होत असे, तें साने यांचेंहि झालें.

बालकाचें मन बनविण्याचें कार्य पित्यापेक्षां मातेच्या हातांत जास्त असतें याची साक्ष साने यांच्या जीवनाकडे दृष्टिक्षेप टाकल्यास पटते. साने यांना वाटणारें शीलाचें महत्त्व व त्यांच्या अंगीं बाणलेली सच्छीलता, त्यांचा

विनम्रशील स्वभाव हे सारे गुण त्याना त्याच्या मातेच्या शिकवणुकींतून मिळालेले आहेत! 'श्यामची आई' या पुस्तकांत आईचें वर्णन करून साने यांनीं आपल्या आईला कृतज्ञतापूर्वक अजरामर करून ठेवलें आहे. महाराष्ट्र साने यांना जरी भविष्यकाळात कधीं विसरला, तरी 'श्यामची आई' हा त्यांचा ग्रंथ त्याच्या स्मरणपटलावरून कधींच पुसला जाणार नाहीं. त्याची माता सुशिक्षित नव्हती हें खरें. संस्कृत, इंग्रजी किंवा इतर भाषांतील ग्रंथांचें वाचन करून ती पंडिता झालेली नव्हती; तर त्यात सामावलेलें सार तिच्या स्वभावांत, आचारात, विचारांत व उच्चारात सूत्ररूपानें एकत्रित झालेलें असल्याकारणानें, तेंच अमृत तिने आपल्या बालकाना पाजिलें. मुलांचे सगोपन करणे या गोष्टीस स्त्रीने संस्कृत अगर इंग्रजी ग्रंथ वाचावयास पाहिजे असें नाही; ते ती ज्या वातावरणात लहानाची मोठी झाली असेल त्यांतून तिला मिळून वाढीला लागत असतें. मुलांना चांगल्या संवयी लावणें, त्याच्या अंगी शौर्य, धैर्यादि सद्गुणांचें बीजारोपण करणें, त्याना खऱ्या प्रेमाची महति शिकवणें, म्हणजेच जीवाजीवावर खरे प्रेम करावयास शिकवणें–' आत्मवत् सर्व भूतानि' या दिव्य तत्त्वाचे शिक्षण देणें कोणतीही प्रेमळ माता करीलच. साने याच्या मातेनेहि तेच केलें. 'झाडामाडावर, गाय–गो–ह्यावर प्रेम कसें करावे हें आईजवळून शिकावे' असें गुरुजी मोठ्या कळवळ्यानें नेहमीं सांगत असतात. तिची मोरी गाय ज्या दिवशीं मेली, त्या दिवशीं त्यांची आई जेवली नाहीं. फुले विकसण्यापूर्वी त्यांच्या कळ्या तोडल्या हें पाहून आई बाल सान्यावर रागावली होती. या व अशाच लहान सहान कृत्यांचा परिणाम सान्यांच्या शीलावर झालेला आहे. 'गाईची करुण कहाणी' या त्याच्या करुणरसपूर्ण कवितेंत जीवाजीवावर प्रेम करण्याची त्याची दृष्टि स्पष्टपणें दिसून येते. अंमळनेरच्या स्टेशनजवळ एका गाभण गायीवर आलेला हा दुर्धर प्राणांतिक प्रसंग होय. तो चितारतांना आगगाडीचा गदारोळ व गरीब गायीची असहाय्यता यांचे त्यांनीं ज्या तन्मयतेनें वर्णन केलें आहे त्यांत सर्व प्राण्यांबद्दल त्यांना वाटणारें असीम प्रेमच दिसून येतें. अंमळनेर छात्रालयांत आजारी पडून तेथेच मृत्यु आलेला गोपाळ, एक साधा छात्रालयाचा गडी–ज्याला नेहमींच्या व्यवहारांत दोनचार शिव्यांचाच अहेर मिळालेला आढळावयाचा,–त्याच गोपाळ गड्यावर गुरुजींचें किती तरी प्रेम होतें!

तेथील विद्यार्थ्यांना प्रेमाचे धडे गुरुजींनीं गोपाळच्या उदाहरणावरून द्यावे. छात्रालयाच्या विहिरींतून पाणी काढण्यासाठी एक रेडा होता. अतिशय रगेल व मस्त असा तो रेडा. त्याच्यापुढे जाण्याची कोणाचीहि छाती होईना. परंतु तो रेडा गोपाळकडे कधीहि रागावून पाहत नसे; उलट त्याच्या रस्त्याकडे सारखी दृष्टि ठेवून गोपाळची वाट बघावयाचा. गुरुजीनी त्याच्या त्या उदाहरणावरून नेहमीं म्हणावे; "अरे, मुक्या प्राण्याला देखील प्रेम करतां येतं ! मग तुम्ही–आम्ही तर परमेश्वराची लाडकीं लेकरें !" सारीं मुले गोपाळ-कडे आपला म्हणून बघूं लागलीं. तोच गोपाळ विषमज्वरानें आजारी पडला. त्याची छात्रालयातील जेवणाच्या वेळची अनुपस्थिति गुरुजींना जाणवूं लागली. तेच सर्वांचें होऊं लागले. गुरुजींनीं त्याची कल्पनातीत सेवा केली. परमेश्वराची इच्छा निराळीच होती. यश आले नाहीं. गोपाळ गेला. अद्याप गुरुजीनीं केलेल्या गोपाळच्या सेवेची छात्रालयातील त्या काळीं असलेल्या विद्यार्थ्यांना आठवण होते. हे सारें कशामुळे ? तर लहानपणींच त्याच्या आईनें त्यांचें जें शील बनविलें, त्यामुळेच नव्हे काय ?

साने कोंकणात ज्या गावीं राहत होते, तेथें इंग्रजी शिक्षणाची सोय नसल्यानें त्यांना आपल्या मामांकडे राहणे भाग पडले. लहनपणापासूनच त्याना शिक्षणासाठीं नाना प्रकारचे हाल सोसावे लागले. कित्येक ठिकाणाहून तरी त्रास असह्य होऊन पळून जावे लागलें. अशी स्थित्यंतरे त्याना कैक गांवां-हून करावीं लागलीं. त्यात त्याना कधीं माधुकरीवर, कधीं एकवेळच्याच जेवणावर तर कधीं कधीं उपासतापासावरहि राहून विद्यार्जन करावें लागले. कधीं पालघरला तर कधीं पुण्याला, कधीं मुंबईला तर कधीं औंधला तर कांहीं वर्षें दापोलीला, जेथें जमेल तेथें, जेथे सोय लागेल तेथें, याप्रमाणें त्यांचें इंग्रजी शिक्षण पुरें झालें आहे. ते स्वतः अत्यंत भावनाशील असल्यानें त्यांना हरघडी सहन कराव्या लागणाऱ्या मानापमानाच्या प्रसंगांमुळें अधिकच दुःख होई आणि याच कारणामुळें ते अत्यंत हळव्या मनाचे झाले आहेत. दुसऱ्याला दुःखांत पाहून त्याना दुःख होतें, ते त्याच्या दुःखांत समरस होतात व त्याचें दुःख तें स्वतःचेंच दुःख समजून कष्टी होतात. आतां, ही अतिरेकी भावनावशता आहे असें म्हटलें तरी चालेल. ती वाङ्मयांत कदा-चित् दोषास्पद ठरूं शकेल, परंतु मुळांत टीकास्पद नव्हे. त्यांचा पिंडच तसा

बनला आहे. त्यांना बालपणांतच आलेल्या नानाविध अनुभवांमुळें तो तसा झाला आहे. त्यांचें मन व त्यांची बुद्धि बऱ्याचशा बऱ्यावाईट प्रसंगांनीं विकसित होत आलेली आहे.

लहानपणापासूनच साऱ्यांच्या भोंवतीं त्यांच्या मित्रांचा मेळावा फार. आपल्या मनामध्यें उत्पन्न झालेल्या प्रक्षुब्ध व धारदार भावनांचें व्यक्तीकरण ते आपल्या मित्रांशीं करीत. वेद व पुराणांतील गोष्टी सांगत. आईची महति सागत व उच्च गुणांचें गान करीत. त्यामुळें त्यांच्या मित्रपरिवारांत त्याच्याबद्दल नेहमीच एक प्रकारचें आकर्षण वाटत असे. ज्ञान मिळवावयाची त्याची पद्धतहि मोठ्या हव्यासाची. केवळ विद्येच्या हव्यासानें वाचन, मनन व लेखन करणारे विद्यार्थी विरळा. साऱ्यांना लहानपणापासूनच विद्येचा हव्यास फार. ते तिला धन मानीत व तिची पूजा करीत. अभ्यासाव्यतिरिक्त सुद्धां ते पुस्तकें विकत घेऊन वाचीत व तीं आत्मसात् करीत. लहानपणींच व्हाइटमनच्या Leaves of Grass या काव्यग्रंथाच्या नावाचा 'तृणपर्णें' असा अनुवाद करून, पुढेंमागें जर आपलें एकादें कवितेचे पुस्तक प्रसिद्ध झालें, तर त्याला तेच नाव द्यावयाचें असें त्यांनीं ठरविलें होतें. त्यानीं मोठेपणीं ज्या ज्या महान् ग्रंथाचे अनुवाद केले, किंवा ज्या थोर व्यक्तींचीं चरित्रें चितारलीं, किंवा अनुवादिलीं, त्याची सारी पूर्वतयारी त्यानीं आपल्या विद्यर्थीदशेंतच पूर्णपणें करून ठेविली होती हें विशेष लक्षात ठेवण्यासारखें आहे. ज्ञानाचें संकलन करून आपली ज्ञानपिपासा भागविण्याची आवड त्यांना लहानपणापासूनच लागलेली होती. स्वत: साने म्हणजे त्यांच्या लहानपणींच्या ध्येयाचें मूर्तिमंत स्वरूपच होतें. त्यांनीं आपल्या विद्यालयीन अध्ययनांतहि अवांतर वाचनाचा त्याग केला नाहीं, तर आपल्यांत असलेल्या ज्ञानाची कसोटी परीक्षावरच न लावतां ती व्यवहारांतील निरनिराळ्या आवश्यक ज्ञानाच्या निकषांवर घासली. बी. ए. च्या परीक्षेत त्यांनीं उच्चाक मिळविला आणि तोहि इतिहास व अर्थशास्त्रासारख्या विषयांत. घरचा कोणत्याहि प्रकारचा आधार नाहीं, आणि मित्रांच्या व हितचिंतकांच्या केवळ सदिच्छेवरहि ज्या वेळीं भागत नाहीं अशा कटुतर परिस्थितींत त्यांनीं आपला एम. ए. पर्यंतचा अभ्यासक्रम कोणकोणत्या अडचणींना तोंड देऊन पुरा केला असेल, याची कल्पनाच केलेली बरी.

एम्. ए. झाल्यानंतर अंमळनेरच्या 'तत्त्वज्ञान मंदिरां'त ते प्रविष्ट झाले. गरीब, हुशार व अभ्यासू विद्यार्थ्यांची परिस्थितीच्या अडचणीमुळें कुचंबणा होऊं नये व त्यांच्यांत असलेल्या सुप्त शक्ति जागृत होऊन त्या नवीन नवीन संशोधन करावयास व ज्ञानाच्या प्रत्येक भागावर प्रकाश पाडावयास समर्थ व्हाव्यात म्हणून अंमळनेर येथील श्रीमंत दानशूर प्रतापशेट यांनीं तत्त्वज्ञान-मंदिराची स्थापना केली. ज्यांच्या विकसित ज्ञानामुळें नवा प्रकाश मिळावा असे कित्येक अभ्यासू विद्यार्थी परिस्थितीच्या गदारोळांत रगडले जाऊन जगरहाटीनुसार सामान्य जीवन जगत असतात. त्याच्याजवळ असलेल्या मानसिक शक्तीचा राष्ट्राला नवा प्रकाश देण्यास उपयोग होत नाहीं. याकरितां अभ्यासू विद्यार्थ्याला अध्ययनाची सर्व व्यवस्था करून देणें, मानसिक भुकेबरोबरच त्याच्या पोटपूजेची काळजी घेणें, व नवीन संशोधनकार्यात त्याला अनुरूप चालना देऊन मार्गदर्शन करणे, इत्यादि सारी सोय या तत्त्वज्ञान मंदिरांत अतिशय उदारतेनें करण्यात आली आहे. अशा ज्ञानसत्राकडे सान्यांसारखे चिकित्सक बुद्धीचे जिज्ञासू व कष्टाळू विद्यार्थी आकर्षिले गेले नाहींत, तरच नवल आपल्या ठिकाणीं असलेल्या निरलस अभ्यासू वृत्तीमुळें, निरभिमानी स्वभावानें व चिकाटीनें साने लवकरच तेथील साऱ्या वातावरणात एक आकर्षण--केंद्र होऊन बसले. अशा प्रकारचा कष्टाळू विद्वान आपल्या संस्थेंत असल्यास संस्थेस तो भूषणभूतच होईल या भावनेनें अंमळनेरच्या प्रताप हायस्कुलातील संचालक साहजिकपणेंच साने यांच्याकडे पाहूं लागले.

अंमळनेरचें 'प्रताप हायस्कूल' म्हणजे खानदेशचें त्यावेळचें 'न्यू इंग्लिश स्कूलच.' ज्या उदात्त भावनेनें व स्वार्थत्यागानें टिळक, आगरकर व चिपळूणकर यांनीं पुण्याला 'न्यू इंग्लिश स्कूल' स्थापिलें व महाराष्ट्रांत शिक्षण क्षेत्रांतील एक नवा इतिहास निर्माण केला, त्याचप्रमाणें जांभेकर, गोखले व गुणे या त्रयींनीं खान्देशात अंमळनेर येथें 'खान्देश एज्युकेशन सोसायटी' चें हायस्कूल स्थापून तोच पायंडा पाडला. पुण्याला फर्ग्युसन कॉलेज निघालें, तसेंच अंमळनेर येथेंहि 'राष्ट्रीय विद्यालय' स्थापावयाचा प्रयत्न झाला; परंतु त्यावेळच्या राजकीय परिस्थितींत त्या विद्यालयाला बळी पडावें लागलें.

ह्या संस्थेंत जमलेली सारी शिक्षकमंडळी आपापल्या ज्ञानांत निष्णात, अध्यापनाची जन्मजात गोडी असलेली, निःस्पृह व भारतमातेला स्वातंत्र्य मिळवून देण्याची इच्छा मनांत असलेली व शिक्षणद्वारां तशी नवी पिढी निर्माण करावयाची मनीषा असलेली अशी होती. राष्ट्राभिमान त्यांच्या रोमरोमात भिनला होता, व त्याचेच रोपटे नव्या पिढीच्या मानसक्षेत्रांत रोवून आपल्या अभ्यासू वृत्तीचे, निःस्पृहतेचे, त्यागाचें व बुद्धीचे खतपाणी घालून, त्याला वाढीला लावून, त्याचा परिपोष करावयाचा हेंच त्याचे जीवितध्येय ठरले होतें. गणपतराव जाभेकर या मंडळीचे मूळ सूत्रचालक. विविध शाखांतील ज्ञानी माणसाची त्यानीं संस्थेला जोड दिली, आणि सद्गुणी, बुद्धिमान व विद्वान मंडळी तर हां हा म्हणतां एकत्र जमविली. निरनिराळया विषयावरील ग्रंथांचा संग्रह केला व तडफदार, तेजस्वी व उत्साही शिक्षकावर विश्वास टाकला. त्याच्यावर जबाबदारीची कामे सोपवून त्याचे सहकार्य मिळविलें. याचें मुख्य उदाहरण म्हटले म्हणजे श्री. जांभेकर यांनीं हायस्कूलचें मुख्याध्यापकत्व श्री. गोखले, एम्. ए. बी. एस् सी. याचेकडे सोंपविले. श्री. ज. गो. गोखले याची कामाची तडफ अजब व टापटीपहि विलक्षण. त्यांनीं आपलें सारें आयुष्य शाळेच्या सर्वस्वास अर्पण केलें. ज्या गोखल्याचा विचार म्हणजे स्वातंत्र्य, आचार म्हणजे सत्यासाटीं जरूर असलेल्या सर्वस्वाचा त्याग व उच्चार म्हणजे राष्ट्रप्रेम व स्वातंत्र्याचे गायन, ज्यांच्या साऱ्या जीवनाचा दृष्टिकोन म्हणजे राष्ट्र व त्याचे पुनरुज्जीवन, मग तेथे साहित्य असो, सगीत असो, नृत्य असो, स्थापत्य असो किंवा अन्य काहीहि असो, त्याना ज्या गोष्टीचा निरंतर ध्यास होता, ज्या गोष्टीमुळे समाजाचे जीवन सुखावह होणार होते त्याचा, म्हणजेच राष्ट्रीय स्वातंत्र्याचाच ते अहर्निश विचार करीत. कोणताहि कलाविलास राष्ट्रीय स्वातंत्र्य जवळ आणीत आहे कीं नाहीं याचा ते प्रथम विचार करीत. तो देशास पुढें नेत आहे का अगतिक अशा निराशारूपी गर्तेंत लोटून देत असून एक प्रकारचें बेजबाबदार शैथिल्य आणीत आहे याचा ते छडा घेत. साने याना जें प्रत्यंतर आलें व ज्या प्रत्यंतरामुळें साऱ्यांच्या वाङ्मयीन जीवनाला नवीन वळण लागलें, तें श्री. साने यांनींच सांगितलेल्या आठवणींवरून पाहणें अत्यंत आवश्यक ठरतें. ७ सप्टेंबर १९४५ रोजीं त्यांच्या धुळें येथील दौऱ्यांत 'शारदा मंदिरा' नें त्यांच्या केलेल्या सत्कार समारंभाच्या

वेळीं केलेल्या भाषणात कै. गोखलेगुरुजी यांचा त्यांनीं जो सन्मानपूर्वक उल्लेख केला, त्यावरून गोखल्यापासून सान्यांनी जो वाङ्मयीन संदेश मिळविला तो त्यांनीं आचरणात आणला आहे.–सान्यानी लिहिलेलें पहिलेंवहिलें 'नामदार गोखल्याचें चरित्र'. कोणाला वाटत नाहीं आपलें कौतुक व्हावें म्हणून ? पहिल्या पुत्ररत्नाचा होणार नाहीं इतका आनद नवशिक्या लेखकाला आपल्या पहिल्या वाङ्मयापत्याचा होत असतो. त्याचें कोडकौतुक व्हावें, सान्यांनीं त्यावर स्तुतिसुमनें उधळावीत, निदान काही न केलें तरी सहानभूति दाखवून आपल्याला पुढील वाङ्मयनिर्मितींत प्रोत्साहन द्यावे, असें प्रत्येक लेखकाला वाटते. सान्यांनाहि तसेच वाटलें. खरोखरच, त्यानीं परिश्रमपूर्वक अभ्यासून व विशिष्ट धाटणी नटवून लिहिलेले असें तें चरित्र होतें. त्याचा विषय सुद्धां अत्यंत अनुरूप असाच घेतलेला. स्वतः सान्याचे तरी तात्पुरतें समाधान झालेले होतें. आपले मोठ्या माणसानीं कौतुक करावे असें सान्याना वाटत होते आणि म्हणूनच त्यानीं गोखलेगुरुजीना आपलें पहिलें पुस्तक दाखविलें. साने गोखलेगुरुजीकडे आशेने पाहत होते. परंतु जीवनधारा देणाऱ्या जलदाकडे आशाळभूतपणे पाहणाऱ्या शेतकऱ्यावर आकाशातून जीवनाऐवजी वीज कोसळलेली पाहण्याचा योग यावा–चंदनाच्या बनांत सुवास लुटण्याला जाणाऱ्याला जिकडे तिकडे विषारी नागाचे फुत्कार ऐकूं यावेत, केवड्यासाठीं पुढे केलेल्या हातात बचनाग यावा, तद्वत् सान्याच्या आशाना जबरदस्त धक्का बसला ! गोखले यांनीं पुस्तक पुरें तर बघितलेंच नाहीं, परंतु आतील व बाहेरील मजकुराकडेहि त्यांनीं लक्ष दिले नाहीं. पुस्तक हातात घेतलें न घेतलें तोच पलीकडच्या कोपऱ्यात ते पुस्तक फेकीत गोखले सान्यांना म्हणाले, "ह्याच्यावर दोनदां चहा होईल. पुस्तकाचीं पानं पुष्कळ आहेत. जाळून टाका त्या पुस्तकाना. पुस्तकं लिहिण्याची आतांशा एक सांथच निघाली आहे. जो उठतो तो पुस्तक लिहितो. जरा आजूबाजूला बघा. आपल्या छात्रालयांत जा. तेथील घाण आवरा. मुलांना स्वच्छतेचे धडे द्या. त्यांना आपण कोण आहोंत हें समजावून सांगा. त्यांना आपलं चरित्र बनवूं द्या. ही स्वच्छता आधीं करा–" साने सारें मुकाट्यानें ऐकत बसले. त्यांना त्या वेळीं एक नवीनच दृष्टि मिळाली. सान्यांनी एव्हांपासूनच मुलांच्या खोल्यांतून, विद्यार्थ्यांच्या जीवनांतून क्रांति घडविण्याचा, त्यांचीं मनें व

वृत्ति एका विशिष्ट साच्यांतून घडविण्याचा उपक्रम सुरू केला, कै. गोखले गुरुजींपासून अशा एका दुसऱ्या प्रसंगीं आश्चर्याचा धक्का बसला आणि सान्याच्या मुखातून शब्द बाहेर पडले, “ केवढीं मोठीं माणसें हीं ! ”

तो प्रसंग असा. साने या वेळीं हायस्कुलात व विद्यार्थीजीवनांत अतिशय समरस झालेले होते. ‘ विद्यार्थी ’ पत्रक दररोज नियमितपणें प्रसिद्ध होत असे. त्यांतील एकूण एक ओळीवर व शब्दावर नजर गेली नाही असा विद्यार्थी विरळा. सायकाळीं विद्यार्थी सानेगुरुजीकडे कांहीं तरी नावीन्याचा लाभ घेण्याकरितां जमत असत. अंमळनेरच्या एका छात्रालयाच्या विभागाला ‘अंदमान’ असें नाव आहे. त्याचे आपल्या अमृततुल्य वाणीनें आणि सालस व प्रेमळ राहणीनें साने यानीं ‘आनंदभुवन’ बनविलें होते. साने शाळेंत व विद्यार्थ्यांत इतके प्रिय झालेले पाहिल्यावर गोखल्याना साहजिकच आनंदाने भरतें येई. शाळेच्या इतर भागांवरील करडी नजर यत्किंचितहि ढळूं न देणारे व अव्याहत चागला व धीराचा सल्ला देणारे व मार्ग दाखविणारे हरिभाऊ मोहोनी हे होतेच. गोखल्यांना तर समाज–व्यवहारात नेहमीं होणाऱ्या अन्याय, अनीति वगैरे गोष्टींचा मनस्वी संताप येई. विशेषतः प्राथमिक शिक्षकांच्या बाबतींत तर त्याचे मन अतिशयच हळुवार झालेले होते. प्राथमिक शिक्षकांची दैना त्यांच्यानें बघवेना. त्याच्यासाठी, निदान एक शिक्षक या नात्यानें, काहीं तरी करावे व हल्लीं समाजातील शिक्षकांच्या असलेल्या दुर्दशेला वाचा फोडून त्याना वरचें स्थान प्राप्त करून द्यावें, असे गोखल्यांना वाटत असे. साने व मोहोनी या दोन खंद्या वीरानी शाळेचा भार चोखपणे उचलल्यावर गोखल्यांना बाहेरील वातावरणांत वावरण्यास पूर्ण वाव मिळाला. ते नुकतेच अंमळनेरच्या म्युनिसिपल स्कूलबोर्डांत निवडून आले होते. त्यांना पूर्व-खान्देशांतील प्राथमिक शिक्षकांच्या दृष्टीनें जिल्हा लोकलबोर्डांत काम करावयाचे होते. जिल्हाबोर्डाच्या निवडणुकीची वेळ आली. गोखले उभे राहिले होते. स्वतः त्यांचा प्रयत्न जोरांत चालू होता. त्याना होणारे कष्ट सान्यांना बघवत ना. त्यांनी गोखल्यांना मदत करण्याचें ठरविलें. पण मदत ती कशी करणार ? त्यांनीं विद्यार्थ्यांना एकत्र आणलें. आपण ‘ विद्यार्थी ’ पत्रकांत गोखल्यांच्या कार्याचा उल्लेख करून निवडणूकप्रचाराला चालना दिली. प्रत्येक विद्यार्थ्याला गोखलेगुरुजी निवडून यावेत असें वाटे. सान्यांनीं

विद्यार्थ्यांना युक्ति सांगितली. प्रत्येकानें आपल्या घरीं, नातेवाईकांना, ओळखीपाळखीच्या लोकाना पत्रे पाठविलीं. गोखले गुरुजीना मतें देण्याची विनंति केली. झाले. निवडणूक झाली. निकाल व्हायचा होता. त्या दिवशी गोखले गांवाला गेले होते. गोखले निवडून आल्याची तार आली. हरिभाऊंनी तार वाचली. सान्याना दाखविली. सान्याना आनंद झाला. गोखले रात्री दहाच्या गाडीने येणार होते. त्याचे स्वागत कसे करावे या विचारात साने आणि त्याचा शिष्यवर्ग होता. सर्वांनी स्टेशनवर जाण्याचे ठरविले. सुताचे हार घालण्याचे ठरले. गाडीची वेळ झाली. सगळे स्टेशनवर गोखल्याचे स्वागत करावयास निघाले. गाडी आली. सर्वांना आनंद झाला–पण, पण गोखले कोठे होते ? सारी गाडी तपासली. शेवटी वेळ सपली. गाडी गेली. फलाटावर आलेले लोकच तेवढे राहिले. गोखले भेटले नाहीत. सर्वांची निराशा झाली. सारे छात्रालयाकडे परत फिरले. इतक्यांत हरिभाऊ मोहोनी व गोखले गोष्टी करीत बसल्याचे दिसले. गोखले गाडींतून उतरले ते मागच्या बाजूनें. त्याना हा सत्कार, हे प्रदर्शन व ही प्रसिद्धि नको होती. मनांतून साने अत्यंत लाजले. काय बोलावे समजेना. गोखल्यानी त्याचे आभार मानले, कृतज्ञता दर्शविली, सारे ठीक झाले. परंतु सान्याना साऱ्या रात्रभर चैन पडली नाहीं. तोंडातून शब्द निघत, "केवढीं मोठीं माणसें हीं ?" त्याना सत्कार नको, त्याना प्रसिद्धि नको. चंदन कोठे सांगावयाला जातो, मला वास येतो म्हणून ? विषारी नागही त्याला विळखा घालून बसतो, त्याच्याशी गाढ मैत्री करतो ना ? आपण नको का तसेच करावयाला ? गोखल्यानीं तसेच नाहीं का केले ? खरोखर प्रसिद्धि हवी कशाकरतां ? आपलें कार्य हीच प्रसिद्धि. स्वतःचें समाधान व जनसेवा हाच खरा धर्म. कोणी जाहीर करो न करो. प्रसिद्धिविमुखता हा महान् गुण त्यांनीं बहुतेक गोखल्यांच्या ह्या उदाहरणावरूनच उचलला. त्यांच्या व्याख्यानाचा सारांश प्रसिद्ध करण्यासाठीं 'शारदा मंदिरा'नें ता. ७ सप्टेंबर १९४५ रोजीं परवानगी मागितली तेव्हां त्यांनीं उत्तर केलें, "कशाला प्रसिद्धि देतां ? शक्यतोंवर प्रसिद्धि, उत्तरें व टीका हीं नकोतच. कालापव्यय होतो. त्यापेक्षां काय करावयाचें तें प्रथम करा."

'लोकशिक्षण'कार जांभेकर व लोणावळ्याच्या कैवल्यधामाचे श्री. गुणे

ऊर्फ कुवलयानंद हेहि अंमळनेर हायस्कूलच्या संस्थापकांत होते व गोखले व मोहोनी यांचे साहाध्यापक होते. ही गोष्ट लक्षांत घेतां अंमळनेरला जमलेली ही मंडळी कोणत्या एका राष्ट्रीय ध्येयानें प्रेरित झालेली होती व त्यांनीं उभय खान्देशांत कोणत्या राष्ट्रीय कार्याचा पाया घातला, हें लक्षांत आल्या-शिवाय राहणार नाहीं. त्यांतच साने येऊन मिळाले.

ठेंगणीशी मूर्ति, साधा पोषाख, लाजाळू स्वभाव, पराकोटीचा नम्रपणा धारण करणारा शिक्षक, चोरट्या पावलांनीं भिंतीच्या बाजूनें जपून, हळूच येऊन खुर्चीच्या पाठीला न टेकतां, हातावर न रेलतां, वर्गात जर येऊन बसला, तर आजकालचीं चोखंदळ पोरे त्याची कितपत मुर्वत ठेवणार! सुरु-वातीस सान्याना असाच अनुभव आला. सहकारी मित्रांनीं व त्यांच्या विद्या-र्थ्यांनी त्याच्या ह्या साधेपणाची चर्चा आरंभिली. त्यातील कांहीं प्रवाद सान्याच्या कानावर येत नसत असें नव्हे. परंतु गरुडाच्या झेपेची कल्पना त्याच्या उड्डाणातच दिसून येते. त्याला जवळून पाहणाऱ्यास कसला आनंद ? त्याकरिता त्याची भरारीच पाहिली पाहिजे. कावळ्यांत वाढलेल्या कोकिळेचें गान-सामर्थ्य तिच्या रंगावरून अगर वेशावरून कसें समजणार ? वसंता-गमानंतर त्याकरिता तिचें मधुर संगीतच ऐकलें पाहिजे. स्वतः मुख्याध्याप-कानाहि साने किनपत यशस्वी शिक्षक होतील याबद्दल मोठी शंकाच होती. परंतु त्याचें सामर्थ्य सर्वांना थोड्याच अवधींत कळून आलें. त्यांच्या विशाल हृदयाची साक्ष त्याना त्यांच्या वाणींतून व प्रेमळ मनोवृत्तींतूनच पटली ! त्यांचे कर्तृत्व त्यांच्या मुख्याध्यापकांना त्याच्या कार्यातून प्रतीत झालें. हां हां म्हणतां त्यांच्या वाक्सामर्थ्याची मोहिनी त्याच्या विद्यार्थ्यांवर पडून ते विद्यार्थ्यांचे झाले. चर्चा, वादविवाद यांची रंगत त्यांच्या खोलीवर झडूं लागली. स्वतः छात्रालयाच्या ओटीवर, तर कधी जिन्याखालच्या टीचभर खोलींत राहून ज्या सान्यांनीं 'अंदमान'चें 'आनंदभुवन' बनविलें त्यांच्या गोड गोष्टींचे फवारे मुलांचा आनंद द्विगुणित करूं लागले. मुलांना त्यांच्या-वांचून व त्यांना मुलांवांचून करमेनासें झालें. त्यांच्या खोलींत मुलांचे कधीं पांच पांच तर कधीं दहा दहा असे फड पडूं लागले. स्वतः साने हे सारखे बोलत न राहतां विद्यार्थ्यांनाहि ते बोलावयास वाव देत व त्यामुळें तेथें एक प्रकारचें खेळकर वातावरण पसरे व सर्वत्र प्रसन्नता राज्य करी.

एवढें असूनहि वर्गात मुलांकडून अभ्यास करवून घेण्यांत कधींहि ते कसूर करीत नसत. ठराविक अभ्यासक्रम तर पुरा झालाच पाहिजे हा त्यांचा कटाक्ष; परंतु त्याव्यतिरिक्त नाना विषयांबाबत मुलांना ज्ञान देऊन त्यांचें जीवन समृद्ध कसें होईल याची त्यांना अहर्निश चिंता असे, आणि त्याकरतां ते मुलांना मधून मधून उपयुक्त पुस्तके वाचावयास सांगत. तीं त्याना उपलब्ध करून देत. मोठमोठ्या पुस्तकातील ज्ञान स्वत: उपलब्ध करून घेणें सर्वच मुलांना केव्हांहि शक्य नसतें, तेव्हां नाना विषयांवरील महान् ग्रंथांत सांठवून ठेवलेल्या ज्ञानगंगेतील अमृत मुलांना हवे तेवढें पुरविण्याचें कार्य त्यांनीं स्वत:कडे घेतलें. दररोजचीं सारीं वर्तमानपत्रें येत. त्यातील साराच उपयुक्त मजकूर मुलांना वाचणें अशक्य, तेव्हां तो ते स्वत: वाचीत व कडेला तांबड्या शाईनें खुणा करून ठेवीत. अर्थात् तेवढाच मजकूर विद्यार्थ्यांना वाचणें सोपें जाई. एवढेंहि करून साने थांबले नाहींत. निरनिराळ्या ठिकाणीं पसरलेल्या ज्ञानाचे घांस स्वतः दर्शवून ते विद्यार्थ्यांनीं टिपून घेण्यापेक्षां आपण होऊनच त्यांनीं त्यांच्यापुढें एका हस्तलिखित दैनिकाच्या सहाय्यानें ठेवण्याचें ठरविलें. त्या दैनिकांत सान्यांच्या हस्ताक्षरांत अग्रलेख, स्फुट सूचना, वर्तमानसार वगैरे सर्व कांहीं असे. हें झालें दररोजच्या जागृतीचें कार्य; त्याशिवाय राजकीय किंवा सामाजिक उत्सव आले कीं सान्यांच्या व विद्यार्थ्यांच्या कार्यशक्तीला बहर येई. त्यांचा उत्साह ओसंडे. हें सारें चैतन्य कोणी ओतलें ! सूटबूट घालून व गळ्याला 'टाय' बांधून बुटांचे कर्र कर्र आवाज करीत वर्गात घुसणाऱ्या अद्ययावत् पद्धतीच्या शिक्षकाचें चित्र कोठें व चोरपावलांनीं, शालीनतेनें वर्गात जाऊन मुलांमध्यें नवचैतन्य उत्पन्न करणाऱ्या भोळसर मूर्ति परंतु महान् कीर्तीच्या कर्तृत्ववान साने यांचें चित्र कोठें ? साहित्याचार्य न. चिं. केळकरांनीं म्हटल्याप्रमाणें अलीकडील विद्वानांचें ज्ञान सर्व प्रकारचें व विपुल असतें; परंतु त्याची खोली मात्र थोडी. त्याउलट जुन्या विद्वानांचें ज्ञान चौफेर नसेल; परंतु त्याची खोली मात्र फार. साने यांच्यांत या दोनहि प्रकारचें ज्ञान एकत्र झालेलें आहे. तें जितकें चौफेर तितकें खोलहि पण आहे; ज्ञानी माणसानें नीटनेटका पोषाख करूनच आलें पाहिजे, अगर बावळ्या पोषाखांतील माणसाचें ज्ञान सामान्य होय, असें समीकरण मांडणें साने

यांच्याकडे पाहिल्यास चुकीचेंच ठरणार नाहीं काय ? पोषाखावरून भोळसर दिसणारे साने त्यांच्या हृदयस्थ विशाल शक्तीनें विद्यार्थ्यांना त्या काळीं तेजस्वी व आदरणीयच दिसूं लागले. मोठेपणा हा ज्ञान व कर्तृत्वावर अवलंबून असतो, पोषाखावर नव्हे, हेंच खरें.

सान्यांना शाळेचें आवार त्यांच्या कार्यशक्तीच्या विस्तारामुळें नेहमींच अपुरें पडलें. ते प्रताप हायस्कुलांत असेपर्यंत कधींच विमनस्क बसले नाहींत. त्यांनीं शाळेंत नवचैतन्य उत्पन्न केलें. निरनिराळ्या उपक्रमांत त्यांनीं मांडलेला 'विद्यार्थी' या मासिकाचा उपक्रम चालकवर्गाला अत्यंत नावीन्यपूर्ण वाटला. सान्याचा उत्साह व त्यांची कार्यक्षमता याची चालकवर्गाला पूर्ण जाणीव असल्यामुळे त्याना त्यांच्या उपक्रमास सक्रिय व हार्दिक सहानुभूति मिळाली. दैनिक पत्र काढण्याच्या कार्यानंतर 'विद्यार्थी' मासिक आलें. साऱ्या कार्याचा बोजा अर्थात् साने याच्यावरच पडला. याच वेळीं बाहेर स्वातंत्र्याच्या लढ्याचे नगारे वाजूं लागले होते; त्याचे ध्वनि-प्रतिध्वनि या मासिकांत उमटणें अपरिहार्य होते. 'विद्यार्थी' मासिकांत साने, इतर शिक्षक व विद्यार्थी याचे लेख येत. त्याचा गावोगाव प्रसार करण्याचा प्रयत्न करण्यात आला. खेड्यापाड्यांतून त्याचा प्रचारात्मक उपयोग करून विद्यार्थीजगात नवचैतन्य निर्माण करण्याची साने यांची मनीषा होती. राष्ट्राभिमान, वीरवृत्ति, त्यागपूजा, धैर्यपूजा व गुणगौरव इत्यादि कार्यें करण्याच्या 'विद्यार्थी' मासिकाच्या तडफदार कामगिरीला लवकरच सरकारी धोरणाचें जें ग्रहण लागलें, तें कायमचेंच ! तें पुन्हां सुटलें नाहीं. सरकारी रोषाच्या भक्ष्यस्थानीं पडलेल्या 'विद्यार्थी' मासिकाचा उल्लेख झाल्यास अजूनहि सान्यांना त्याबद्दल पूर्ण अभिमान वाटतो. साने यानी विद्यार्थ्यांसाठीं शिक्षकाला काय काय करतां येतें याचा आदर्श महाराष्ट्रीय शिक्षकांपुढें ठेविला आहे. त्यांच्या पावलावर पाऊल टाकून जाणारा शिक्षक विरळा. इतकी त्यागवृत्ति, इतकी सालसता, इतकी सहनशीलता, इतकी शालीनता, इतका निगर्वीपणा, इतका सोज्ज्वलपणा अन्यत्र आढळणे क्वचित्. हें सारें चारित्र्य त्यांनीं स्वतः कमावलें आहे. स्वत: भोजनालयांत खाडे सांगून, अर्धपोटीं राहून विद्यार्थ्यांच्या विद्यालयीन शिक्षणाकरितां बचत करून मदत पाठविणारा शिक्षक कोठें सांपडला तर तो अपवादच म्हटला पाहिजे. साने स्वतः अर्धपोटीं राहून हें

सारें करतात हें कळल्यावर मुख्याध्यापक गोखले याचे अंतःकरण भरून आले. त्यांचा कंठ सद्गदित झाला. ते सान्याच्या त्यागानें दिपले. परंतु साने यानीं उपाशी राहणे त्याना पसंत पडले नाहीं. त्याना घास गोड वाटेना. जेवण जाईना. सान्यांना त्यानी आपल्याकडेच नेहमीं जेवावयास सागितले. त्यामुळे सान्यांना विद्यार्थ्यांस आणखी मदत करता आली, तें निराळेच.

३१ डिसेंबर १९२९ ला कॉंग्रेसने संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पसार केला. झाले. सान्या राष्ट्रात नवचैतन्य स्फुरूं लागले. सुप्रसिद्ध ‘दांडी मोर्चा’ वर्तमानपत्रातून गाजत होता. गोखले गुरुजीचे मित्र हरिभाऊ मोहोनी हे तर म. गांधींना कधीच जाऊन मिळाले होते. गांधींनीं साबरमतीचा आश्रम सोडला. इकडे मोहोनीनीहि प्रताप हायस्कूल सोडलें व ते महात्माजींना जाऊन मिळाले. साने का स्वस्थ बसणार? त्याचें मन काय जुन्या इतिहासाचे तेच तेच पाठ शिकवीत राहणार? त्याच्या डोळ्यांदेखत इतिहासाची जडणघडण होत होती. सारे राष्ट्र जुलूमशाहीविरुद्ध अहिंसात्मक लढा लढावयास, निःशस्त्र प्रतिकार करून सारें बळ खर्च करावयास व वाटेल त्या हालअपेष्टा सोसावयास तयार झाले असताना त्यांना का गोखलेगुरुजींकडील सुग्रास जेवण गोड वाटणार? भारतमातेची किंकाळी ऐकूं आल्यावर का ते पाखरी वृत्तीनें दूरदूर जाणार? हजारों गरीब लोकाची छळणूक चालू असताना का ऐषारामांत गादीतक्क्यावर लोळत पडून सुखासीन मवाळ पुढाऱ्यांच्या गोष्टी ते बोलणार? तेथें त्यागाला आवाहन व आव्हान होतें. कर्तृत्वाची परीक्षा होती, सचोटीची परीक्षा होती. सहनशीलतेची परीक्षा होती. होम करावयास पुढें येणाऱ्या नव्या तरुणांची आवश्यकता होती. नव्या पुढारीपणाला बोलावणे होतें. साने एक दिवस असेच प्रताप हायस्कुलांतून निघून गेले. त्यांनीं आपलें कार्यक्षेत्र विस्तृत केले. ते विस्तृत होण्यापूर्वी त्यांनीं तेथें आवश्यक असलेल्या गुणांची जोपासना लहानपणीं व शिक्षक असतांना शाळेंत करून ठेविली होती. त्यांची अमृतोपम गिरा त्यांच्या मदतीस या वेळीं हजर होती. त्यांची तडफ व सेवा त्यांच्या सेवेला हजर होती. कार्य करण्याच्या पद्धति शिस्तशीर तयार होत्या. हां हां म्हणतां अंमळनेरचे सानेमास्तर आपल्या त्यागी जीवनानें सानेगुरुजी म्हणून नांवास चढले—तो इतिहास रोमांचकारी नव्हे काय?

‘ दांडी मोर्चा ’ सुरू झाला, त्या वेळीं राष्ट्राची कितपत तयारी होती याचा अंदाज कोणालाच नव्हता. परंतु राष्ट्राची नाडी ओळखणाऱ्या एका महान् महात्म्यालाच खरा आत्मविश्वास होता. महात्मा गांधी हेच खरे राष्ट्रीय वैद्य ठरले. त्यांनीं अखिल भारतीय हृदयाचा ठाव घेतला. व भरडल्या जाणाऱ्या दीन जनतेला त्यांनीं नवोत्साह दिला. त्यांच्या दुःखांतूनच १९३० सालचा लढा त्यांनीं उभा केला. राष्ट्राच्या खऱ्या दुःखाला वाचा फोडिली व सारे राष्ट्र त्यांच्या नेतृत्वाखालीं, तिरंगी झेंड्याखालीं एक झालें. साऱ्यांची पूर्ण तयारी झाली होती. स्वतंत्र हिंदुस्थानच्या सफरीवर ते निघाले होते. त्याच्या गलबतावर शीड होतेंच, तें त्यांनीं मोकळे केलें. नवचैतन्याचा वारा त्यात शिरला व गलबत चालूं लागलें. ते का थांबणार ? ते का कोणत्याही संकटरूपी खडकावर आदळणार ? साऱ्यानी साऱ्या खान्देशात जागृति केली व तो हलवून सोडला. त्याचा खान्देशांतील संचार विजेच्या लखलखाटा-सारखा होता. त्यांची वाग्गंगा धावत्या गंगौघासारखी विशाल व खोल होती. ते केव्हांच अचानक उपस्थित होत व आपल्या वाग्गंगेचा पूर पाडीत. तेथें शरीराच्या क्षुद्र सौख्याची का ते पर्वा करणार ? एक दिवस सरकारी बंधनांनीं त्यांना धुळ्याच्या कारागृहांत जखडून टाकलें. कारागृहें म्हणजे राष्ट्रपुढाऱ्यांचीं निवासस्थानें. आत्मचिंतन, आत्मशुद्धि व सघटना करण्याचे ते आश्रमच. साऱ्यांनीं तेथेहि सारें पवित्र करावयास सुरुवात केली. त्यांचें सारे लेखन कारावासांत किंवा तत्सम एकातवासात झाले आहे. त्यांनीं केलेली संघटना त्यांच्या स्थानबदलाने का थोडीच थांबणार ? त्यांना धुळ्याहून त्रिचनापल्लीस हलविण्यांत आलें; तरी जोंपर्यंत भारतीय दुःख एकच आहे तोंपर्यंत तें भाषा अगर प्रांत यांच्या बंधनांत अडकूं शकत नाहीं. मद्रासी माणसाचें जें दुःख, तेंच महाराष्ट्रीयाचें, तेंच वगदेशीयाचें, आंध्रदेशीयाचें किंवा हिंदुस्थानांतील सर्वांचें ! दुःख हें मूक भाषेनेंही कळतेंच कळतें. त्यांतून साऱ्यांसारखा भावनाशील मनुष्य. ते तेव्हांच मद्रासी लोकांत एकरूप झाले !

त्यानंतर ‘गांधी-आयर्विन करार’ झाला व साने त्रिचनापल्लीच्या कारागारांतून मुक्त झाले. मित्रत्वासाठीं पुढें केलेला आयर्विनसाहेबांचा हात

व्य. प.–३

ब्रिटिश साम्राज्यशाहीने मागे ओढला. आयर्विनसाहेबांनंतर आलेल्या बड्या लाटसाहेबांनी नाना प्रकारचे वटहुकूम काढून जानेवारी १९३२ पर्यंत सारी चळवळ दडपून टाकण्याचा आटोकाट प्रयत्न केला. साऱ्या प्रमुख पुढाऱ्याना पुन्हां आपल्या आश्रमाकडे-सरकारी विश्रांतिस्थानाकडे—पाठविण्यांत आलें. सानेसुद्धा बाहेर राहणें शक्य नव्हतें. ते पुन्हा धुळ्याच्या कारागृहात आले.

त्या वेळीं धुळ्याच्या तुरुंगांत देशभक्तांचा मेळावाच जमला होता. राष्ट्राकरिता त्यागाची परिसीमा गांठणाऱ्या या थोर थोर देशभक्तांना एकत्र जमावयाचा प्रसंग फक्त तुरुंगांतच येत असतो. दरवर्षी काँग्रेसच्या अधिवेशनांत एकत्र जमतां आलें तरी तुरुंगांत मिळणारें स्वास्थ्य हे बाहेरील स्वास्थ्यापेक्षां किती तरी चांगलें असतें, असेंच तेथें त्या वेळीं झालेल्या देशभक्तांच्या मेळाव्यावरून तरी म्हटल्यावांचून राहवत नाहीं. १९३२ सालच्या पहिल्या सहामाहींत श्री. जमनालाल बजाज, श्री. मणिलाल कोठारी, श्री. अण्णासाहेब दास्ताने एवढेंच नव्हे, तर ऋषितुल्य व गीतेवर अधिकारवाणीनें बोलणारे पूज्य विनोबाजी भावेसुद्धां धुळ्याच्या तुरुंगांत जमले होते. धुळ्याचा तुरुंग पवित्र झाला होता या थोर पुरुषांच्या भेटीनें. त्यांतच सानेहि होते. पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून लढणाऱ्या शेंकडों वीर स्त्रियाहि त्या वेळीं धुळें-तुरुंगांत होत्या. सान्यांनीं या तुरुंगांत अत्यंत महत्त्वाचें कोणतें कार्य केलें असेल तर विनोबांचीं गीतेवरील प्रवचनें अक्षरशः टिपून घेणें हें होय. अगोदरच सान्यांचें अक्षर सुवाच्य व सुंदर, त्यांत त्यांच्या लेखनाची गति फार आणि त्यांत बिनोबाजींसारख्या अधिकारी व विद्वान ऋषीचीं गीतेसारख्या महान् ग्रंथावरील तीं व्याख्यानें. गीतेवरील विनोबाजींचीं व्याख्यानें उतरून घेऊन तीं मराठी वाङ्मयांत अमर करावयाचें फार मोठें कार्य त्यांनीं करून ठेविलें व तें धुळें तुरुंगांत केलें. त्यांना इतकें स्वास्थ्य बाहेर असल्यावेळीं मिळू तरी शकलें असतें का ? आणि म्हणूनच पुनःपुन्हां म्हणावेंसें वाटतें कीं, देशभक्तांना तुरुंगांत जितकें स्वास्थ्य मिळतें, तितकें बाहेर मुळींच मिळत नाहीं. त्यांच्या अंतःकरणांत साठवलेली राष्ट्रभक्ति त्यांच्या शारीरिक बलाच्या

दसपटीने काम त्याच्याच शरीराकडून करून घेत असते. तुरुंगात त्यांच्या कार्यशक्तीला तेज चढतें. दळण दळावयाचें म्हटले तरी २०–२५ किंवा ३० पौंड दळणहि गुरुजी भराभर दळून टाकीत व स्नान करून पुन्हां विनोबाजीच्या व्याख्यानास जाऊन बसत. नाना प्रांतांतून नाना तऱ्हेचे परंतु एक विचाराचे असे जमलेले ते देशभक्त. परंतु त्यांचा एकत्र मिलाफ होऊन एक जीव होण्यास वेळ लागला नाहीं. गुरुजी लहानात मित्र व उपदेशक अशी भूमिका घेत, परंतु थोरांत मात्र ते श्रोत्याचें काम करीत. त्यांच्या जीवनाचें हे एक मर्म आहे. जागृति करावयाची, प्रेम मिळवावयाचें, उठावणी करावयाची व जीवन ओतावयाचे हे काम गुरुजींचें; परंतु पुढारीपण किंवा त्याच्यामागून येणारा मानसन्मान किंवा विद्वत्तापूर्ण वक्तृत्वाचे कार्यक्रम त्यांना मुळापासूनच आवडत नाहींत. धुळ्याच्या तुरुगातहि नेमके तेंच व्हावयाचे. साने एवढया खेळीमेळीनें काय बोलतात, कविता कसल्या म्हणून दाखवितात, गोड गोड गोष्टी कसल्या सांगतात याची खरी परीक्षा किंवा सत्यदर्शन घ्यावयास जर एखादा मोठा पुढारी तेथें आला, तर त्यांच्या तोंडाला खीळ बसावयाचीच. विनोबाजींचें प्रवचन ऐकताना असें सांगतात की, त्यांनीं कधींच तोंड उघडलें नव्हतें व उघडलेंच असलें तर प्रश्न विचारण्याकरितां, मतखंडन करण्याकरितां नव्हे. परंतु धुळ्याच्या तुरुंगांतील आनंदाचा काळ फार दिवस टिकूं शकला नाहीं. जून १९३२ च्या अखेर त्याना 'नाशिक–सेंट्रल' जेलमध्ये हलविण्यांत आलें. पुष्कळ राजकैद्यांना नाशिकच्या तुरुंगात पोंहोंचविलें, त्यांत साने हेहि पण होते. नाशिक तुरुंगाची त्या वेळी अपकीर्ति फार होती. तेथील हवा, पाणी, दिवाबत्ती वगैरें सुखसोयी चांगल्या असल्या, तरी त्या वेळीं असलेल्या ' रोच ' या तुरुंगाधिपतीच्या करडया वागणुकीनें राजबंद्यांना अत्यंत हालांत तेथील जीवन घालवावें लागे. अत्यंत करडया व मानखंडना करणाऱ्या हुकुमांचें तेथे राज्य होतें. परतु अन्यायाचा प्रतिकार अहिंसात्मक पद्धतीनेंच करावयाचें सान्यांनीं ठरविलें. ' पायावर हात ठेवून मान गुडघ्यांत घालून उकिडवें बसलें पाहिजे ' अशा प्रकारची अपमानकारक अट संध्याकाळीं जेव्हां मोजणीच्या वेळीं एक दिवस घालण्यांत आली,

त्या वेळीं तसें न करण्याबाबत आपला निषेध दर्शविणारे साने हे प्रमुख होते. कोणत्याही प्रकारचे शारीरिक हाल झाले तरी चालतील; परंतु स्वाभिमानानें उन्नत झालेली मान वांकविणार नाहीं, हें तेजस्वी तत्त्व सर्व राजबंद्यांनीं अंमलांत आणावयाचें ठरविलें व सान्यांनीं त्यांत पुढाकार घेतला. डोक्यावर दंडुके बसत असले, तें रक्तबंबाळ झालें असलें तरी आपली ताठर मान वांकविणे शक्य नाहीं अशा प्रकारचें दिव्य तेज सान्यांनी तुरुंगाधिकाऱ्यांना दाखविलें. त्याबाबत त्याचा पुष्कळ छळ झाला. परंतु त्यांनीं तें सारें सहन केले ते कशाच्या जोरावर? शारीरिक बळाच्या जोरावर का? आत्यंतिक राष्ट्रप्रेम ही अमोल भावना त्याच्या शरीरात ते क्लेश सहन करावयास अपूर्व तेज ओतीत होती. प्रत्यक्ष कडेलोट झाला तरी चालेल, परंतु आपली मानखंडना होऊं देतां कामा नये, अशा प्रकारची कठोर वृत्ति त्या सर्व गोष्टींच्या पाठीमागें होती. अखेर कायद्याच्या कचाट्यांत सांपडल्यानें नाशिक तुरुंगांतील अधिकाऱ्यांची अरेरावी कमी झाली व पुन्हां तें राजबंद्यांच्या मेळाव्याचें ठिकाण बनलें. पुढें १९३२-३३ साली सनदशीर राजकारणाचा काल आल्यामुळें सर्वच राजबंदी मुक्त झाले त्यांत सानेहि मुक्त झाले.

त्यांचा त्यानंतरचा वर्ष दोन वर्षांचा काळ जवळ जवळ अज्ञातवासांतच गेला. निवडणुका व त्यांतील निवडणुकीचें राजकारण व पक्षोपपक्षाची रणधुमाळी यांत मिळून मिसळून वागून, चार धक्के देऊन चार सोसण्याची तयारी, इत्यादि गोष्टींची त्यांच्यांत असलेली वानवा म्हणा किंवा कोणत्याही प्रकारचें पुढारीपण आपल्याकडे न घेण्याबाबतची त्यांची शालीनता म्हणा, या कारणानें ते निवडणुकीच्या वेळीं अगर त्यांचा निकाल लागल्यानंतरही जवळ जवळ अज्ञातच होते. पुण्याला त्याचा शोध करीत असतांना ते विद्यार्थ्यांचा स्वयंपाक करतांना आढळले. एवढेंच नव्हे तर विद्यार्थ्यांमध्यें, त्या वेळांत त्यांनीं अतोनात जागृति केली होती. पेरुगेटाजवळ व त्याचप्रमाणें स. प. कॉलेजजवळच्या टिळकरोडवरील कित्येक विद्यार्थ्यांत त्यांची बैठक असे. ते एक प्रकारची राष्ट्रीय शाळाच चालवीत, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. अंमळनेरचे बहुतेक सारे विद्यार्थी त्या काळीं एकत्र जमत.

गप्पागोष्टी तर नेहमींच्याच व त्याहि अत्यंत उंच पातळीवरून होत. त्याचें 'भारतीय सस्कृति' हें पुस्तक त्यांनीं टिळकरोडवरील 'नारायण भुवनात' थोड्याशा दिवसांत पुरें केलें. विद्यार्थ्यांच्या खाण्यापिण्याची तर ते सोय पाहतच, परंतु गुरुजी असले कीं मुलींना घरीं असल्यासारखेंच वाटे. माता व पिता या दोन्हीहि नात्यांचें एकीकरण मुलांना त्यांच्यांत आढळे व तीं आपलीं मनें मोकळेपणाने त्यांच्यासमोर उघडी करीत. प्रेमळता अशी की, आई करणार नाहीं इतकी ते प्रसंगीं त्यांची सेवा करीत. सदू भालेरावला एकदां त्याच्या मित्राच्या आकस्मिक मृत्यूचे पत्र आल्याबरोबर वैतागानें त्याने दाढीच्या पात्याने अंगावर जखमा करून घेतल्या व तिसऱ्या मजल्या-वरून खाली उडी टाकावयाचा त्यानें प्रयत्न केला. गुरुजी त्या वेळीं बाहेर गेले होते, तोपर्यंत जवळपासच्या विद्यार्थ्यांनीं त्याला समजाविण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. शेवटीं गुरुजी आले. त्यांनीं त्याला अंथरुणावर निजविले, पाणी पाजलें व शात केलें. "सदू, असं रे काय करतोस ? तूं जखमा केल्यास–आणखी असं केल्यास मीहि जखमा करून घेईन." "गुरुजी–सोडा मला" अशी सदू आरोळ्या मारून विनवणी करीत होता, तर गुरुजी त्याला, "अरे बाबा, पाया पडूं का ?" म्हणून आर्जवीत होते. त्यांचे डोळे भरून आले होते. बाकीचे विद्यार्थीहि सद्गदित झाले होते. रात्रभर गुरुजी सदूजवळ बसले. आजूबाजूच्या विद्यार्थ्यांना त्या दिवशी कळलें कीं दररोज भोळसरपणानें यांच्या खोलींत वागणारा, त्यांचा स्वयंपाक करणारा, प्रसंगीं कपडे धुणारा, भांडीं घासणारा, औषधपाणी करणारा, बाजारहाट करणारा व रात्रीं पहांटे कांहीं तरी लिहीत बसणारा हा मनुष्य सामान्य नसून प्रत्यक्ष सानेगुरुजी होत.

अशा रीतीनें थोडा स्वस्थतेचा व अज्ञातवासाचा काळ १९३६ पर्यंत गेला. त्याच काळांत त्यांनीं बरेंचसें लिखाण केलें. याच वर्षी कॉंग्रेसनें महा-राष्ट्राचें आमंत्रण स्वीकारलें व म. गांधींनीं 'खेड्यांत कॉंग्रेस भरवावी' असें जाहीर केलें. झालें. सान्यांच्या कार्याला वाव मिळाला. श्री. एस्. एम्. जोशी व सानेगुरुजी यांनीं त्या वर्षी पूर्व खान्देशांत जो अभूतपूर्व प्रचार केला, त्याला

सीमा नाहीं. गुरुजींच्या वाणीतील गोडवा व तेज असें की पुरुषच काय पण खेड्यातील स्त्रियाहि मोठ्या हिरीरीनें पुढें आल्या व सारें फैजपूर राष्ट्रीय तेजानें ओसंडले. फैजपूरचें फजितपूर होणार अशा प्रकारच्या विरोधी घोषणांना व त्या घोषित करणाऱ्या अवसानघातकी लोकांना जर कोणी सणसणीत जबाब दिला असेल, तर तो बव्हशी गुरुजींच्या प्रभावी राष्ट्रीय जागृतीनें व प्रचारानेंच होय. पैसा उभा करतां येतो, निरनिराळी साधनसामुग्री हस्ते परहस्ते मिळवितां येते, पाहुणे येऊन उतरतात; परंतु यजमानाचें जर कोणत्याहि प्रकारचें त्यांत हृदय नसेल तर तो पाहुणचार निष्प्रेम होतो, कोरडा होतो. साऱ्यांनीं कॉंग्रेस पाहुणी येणार म्हणून साऱ्या खान्देशांतील जनतेला जागृत केलें व कॉंग्रेसच्या सत्काराला बोलाविलें. फैजपूरचे फजितपूर न होतां फत्तेपूर झालें याचें पुष्कळसें श्रेय साऱ्याच्या प्रभावी व्यक्तित्वाला, त्यांनीं केलेल्या अभूतपूर्व प्रचारालाच दिलें पाहिजे.

सनदशीर राजकारणांत कॉंग्रेस गुंतली असतांना साऱ्यानीं पुष्कळशी वैयक्तिक चळवळ केली. ' टोल टॅक्स 'मध्ये गरीब शेतकऱ्यांना होणारा अन्याय त्यांनीं आपले प्राण पणाला लावून दूर केला. गिरणीकामगारांची गिरणी बंद केली गेल्यामुळें उपासमार होत होती ती वांचविण्याकरता त्यांनीं तापी नदींत प्राणार्पण करावयाची तयारी दाखविल्याबरोबर बाळासाहेब खेरांच्या मध्यस्थीनें तो अनावर प्रसंग टळला. शेतकऱ्यांचे व कामगारांचे मोर्चे त्यांनीं लोकनियुक्त प्रतिनिधींकडे नेले व त्यांचीं दुःखे वेशीवर टांगावयाचे प्रयत्न केले. कॉंग्रेसवरील जनतेची श्रद्धा अजमावण्याकरतां २१ दिवसांचा खडतर उपवास केला व हजारोंनीं कॉंग्रेसचे सभासद पाठविले. हें करीत असतांना त्यांनीं कॉंग्रेसवरील आपलें व जनतेचें प्रेम व्यक्त करण्याचें व नैतिक पाठबळ मिळविण्याचें मोठें महत्त्वाचें कार्य केलें हें दृष्टीआड करून चालणार नाहीं. ' कॉंग्रेस ' या नांवाचें साप्ताहिक चालवून कॉंग्रेसच्या तत्त्वाचा खेड्यापाड्यांतून प्रसार केला व लोकजागृति केली. १९३७ ते ३९ पर्यंत त्यांनीं अत्यंत काबाडकष्ट घेऊन चालविलेलें हें पत्र आर्थिक दृष्ट्या तोट्यांत गेलें. त्याशिवाय सेवादल कार्याची संघटना, चांदवडची युवकपरिषद इत्यादि अनेक कार्यें त्यानीं हाती घेतलीं व आपल्या धडाडीनें, कष्टानें व सचोटीनें पुरीं केलीं. चांदवडच्या युवकपरिषदेनंतर त्यानीं पुन्हां तर्फे

दीड वर्ष सरकारी पाहुणचार घेतला व ते बाहेर आले.त्याच वेळीं सरकारशीं कॉंग्रेसचे संबंध बिघडत चालले होते. १९३९ सालांत कॉंग्रेसनें अधिकार-त्याग केला व साने परत आले. त्याच वेळीं १९४२ ची प्रसिद्ध अशी बैठक झाली होती. साने त्यानंतर फारच थोडा काळ चमकले व पुन्हा जे कारा-वासात गेले,ते तीन वर्षांच्या खडतर तपश्चर्येनंतरच १९४५ त बाहेर पडले.

बाहेर आले तरी साने हे स्वस्थ बसणारे नव्हत. त्यानीं १९४२ च्या आंदोलनाचा सारा भारतीय इतिहास गांवोगांव सांगावयास सुरुवात केली. मध्यंतरी त्यांचे बधु फार आजारी असल्याकारणानें ते कोंकणांत जे कांहीं काळ गेले, तेवढाच त्याचा विश्रांतीचा काळ होय. त्यानंतर ते सारखे फिर-तच राहिले. आज मुंबईस तर उद्यां कोल्हापुरास, तर परवां अंमळनेरास असा त्यांचा विद्युत् दौरा सुरू झाला. अंमळनेरच्या जनतेने त्यांचें किती उत्साहपूर्वक व प्रेमभरानें स्वागत केलें असेल याचें वर्णन लेखणीनें करता येणें अशक्य आहे. साने सामान्यतः महाराष्ट्राचे अगर भारताचे असले, तरी विशेषतः खान्देश व त्यांतल्या त्यांत अंमळनेरचे आहेत. त्यांचें खरें कार्यक्षेत्र अंमळनेर हें होय. लढाईहून परत आलेल्या पुत्राला प्रेमभरानें भेटणाऱ्या मातेप्रमाणें खान्देशभू सान्यांना भेटली. त्यांचें ठिकठिकाणीं जें हजारो स्त्रीपुरुषांनीं स्वागत केलें, त्याला राष्ट्रीय इतिहासांत तोड नाहीं. सानेगुरुजींचें आगमन अंमळनेरला झालेलें आहे असें कळतांच शेंकडों विद्यार्थ्यांची रीघ अंमळनेरला लागली. ते ७ सप्टेंबर १९४४ रोजीं धुळ्याला गेले,त्या वेळींही त्या दिवशीं साऱ्या शहरांत जणूं काय नवीन चैतन्य स्फुरलें ! व्याख्याने देऊन देऊन त्यांचा घसा बसलेलाच होता; परंतु त्यांच्या वाणींतील गोडवा व चमक थोडीच कमी होणार ? ते जेथें जेथें जात, तेथें तेथें त्यांच्या भोंवती राष्ट्रभक्तीनें भरून गेलेलीं अंतःकरणें त्यांना भेटत. देशाकरितां त्याग करणाऱ्या प्रत्येक वीराची ते पूजा बांधीत. नंदुरबारला गेले असतांना ज्या ज्या मातांचीं बालकें आंदोलनांत धारातीर्थी पडलीं त्या त्या मातांच्या पाया-वर लोटांगण घालीत ते म्हणाले; " तुम्ही माता धन्य–तुम्ही देशाकरतां आपले पुत्र दिले ! " ज्या ठिकाणीं तीं मुलें धारातीर्थी पडलीं तेथील रजःकण उचलून त्यांनीं कपाळावर लावले. केवढी ही त्यागाची पूजा ! ऑक्टोबर १९४५ मध्यें त्यांना मनमाड येथें पुन्हां अटक करण्यांत आली

व नंतर जामिनावर मुक्त करण्यांत आलें असें म्हणतात. ते कारावासांत असले किंवा बाहेर असले, तरी ' भारतमाता ' हा एकच त्यांच्या विचाराचा मुख्य विषय आहे हें नेहमीं लक्षांत ठेवावयास हवें आहे. त्यांनी जे जें लिखाण केलें आहे, तें तें राष्ट्रीय जागृतीचें एक साधन म्हणून केलें आहे. वाङ्मय हें प्रचाराचें एक साधन होय असे त्यांचे स्पष्ट मत आहे व या भूमिकेवरून जर त्यांच्या वाङ्मयाचें परिशीलन केले, तर सानेगुरुजींचे हृदय जास्त स्पष्ट झाल्याशिवाय राहत नाही. ते प्रथम राष्ट्रसेवक आहेत व नंतर साहित्यिक आहेत, हें लक्षांत ठेवणे अत्यंत आवश्यक होय.



# सानेगुरुजींच्या कादंबऱ्या

: लेखक :

य. ए. नांदेडकर, एम्. ए., बी. टी.

## साने गुरुजींच्या कादंबऱ्या

श्री. सानेगुरुजी यानीं वाङ्मयप्रांतांत सर्वत्र अनिरुद्ध संचार केला असून सरस्वतीच्या दरबारांत ते पहिल्या वर्गाचे मानकरी बनले आहेत. इतर वाङ्मय-प्रकारांप्रमाणें त्यानीं कादंबरीच्या प्रकारातही आपलें व्यक्तिमत्व दाखविलें आहे. ते एक प्रभावी कादंबरीकार आहेत. त्यांच्या लेखनाची छाप वाचकां-वर, विषशेत: तरुण वाचकांवर, चट्‌दिशीं पडते. त्यांनीं आतांपर्यंत एकूण बारा कादंबऱ्या प्रकाशांत आणल्या आहेत, व अजून हस्तलिखित स्वरूपांत किती आहेत तें सानेच जाणे ! ह्या बारा कादंबऱ्यांची पृष्ठसंख्या सुमारें २४०० तरी होईल.

### कादंबऱ्यांचें ओझरतें दर्शन

| नांव | लेखनस्थल, काल | प्रकाशनकाल | आवृत्ति | रूपरेषा |
|---|---|---|---|---|
| १ श्यामची आई | नाशिक तुरुंग १९३३ | १९३५ १९४३ | ७ वी. | मातेचा महिमा मूख्य सूत्र. पांच रात्रींत २२८ पृष्ठें लिहिलीं. यांत स्वानुभवच खूप |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | आहेत. संस्कृत व बालबोध घराण्यातील साध्या व रम्य संस्कृतीचें चित्र. आईची प्रेममय व थोर शिकवण. श्याम मातेच्या स्मृति सांगतो. |
| २ आस्तिक | नाशिक तुरुंग १९३३ | १ ली. | महाभारतांतील जनमेजय सर्पसत्र. वत्सला, नागानंद व आस्तिक ऋषि हे नाग व आर्य यांच्या संस्कृतींचें मीलन करितात. हिंदु व अहिंदु यांवर रूपकात्मक कथा. भिन्न संस्कृतींचें मीलन भारतांत झालें पाहिजे हा आग्रह. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ धडपडणारीं मुलें | नाशिक तुरुंग १९३३ | १९३७ | २ री. १९४४ | कथानकाशिवाय रमणीय कथा; गोपाळराव, स्वामी, नामदेव, रघुनाथ इ. भारतपुत्र मातृभूच्या उद्धारार्थ धडपडत आहेत. |
| ४ पुनर्जन्म | नाशिक तुरुंग १९३३ | १९३९ | २ री १९४४ | तुरुंगातील कैद्यानीं सागितलेल्या नानाप्रकारच्या चित्रविचित्र अनुभवांवरून रचलेली. आनंदी-भाऊराव, गोविंदराव—तारा, व मन्यादादा यांच्या कथेंत देशसेवेचें उत्कट स्वरूप दिसते. |
| ५ सती | नाशिक तुरुंग १९३२।३३ | १९४० | २ री. | एका तरुणावर प्रेम करणाऱ्या, बापानें विकली म्हणून |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | षंढ पुरुषाशीं विवाह करणाऱ्या व पतीबरोबर सती जाणाऱ्या, पण विवाहानंतरही प्रियकराची प्रेमपूजा बांधणाऱ्या सतीची कथा. |
| ६ श्याम, खंड १ | | | श्यामच्या इं. ५ वीपर्यंतच्या लहानपणच्या आठवणी. |
| ७ श्याम, खंड २ | १९३७ | | श्यामच्या मॅट्रिकपर्यंतच्या आठवणी. |
| ८ श्याम, खंड ३ | | | जप्त. |
| ९ क्रांति | १९४० | ३ री १९४४ मध्यें दोन मुद्रणें. | प्रचारप्रधान कथा. महाराष्ट्रीय रामदास व बंगाली माया यांचा विवाह. मॅट्रिक झालेली शांता व मजूर मोहन यांचा विवाह. या कादंबरींत लेखकाच्या |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | सर्व तऱ्हेच्या तत्त्वज्ञानाची ओळख होते. |
| १० गोड शवट | | १९४३ | | सत्वस्थ गुणा व स्खलनशील जगन्नाथ ह्या खान्देशी मित्रद्वयाची कथा. |
| ११ तीन मुलें | सुमारें १९४० | १९४४ | | टेनिसनच्या 'इनॉक ऑर्डनचें' रूपांतर. बुधा व मंगा ह्या लहानपणच्या दोन्ही मित्रांशी लग्न लावणाऱ्या मधुरीची कथा. |
| १२ रामाचा शेला. | त्रिचनापल्ली तुरुंग. १९३० धुळें तुरुंग १९४१ | १९४४ | १ ली. | १९३० सालीं त्रिचनापल्ली तुरुंगांत हें नाटक लिहिलें, पण अप्रकाशित. १९४१ मध्यें धुळें तुरुंगांत त्याचें कादंबरींत रूपांतर. सरला नि उदय यांची प्रेमकहाणी. |

गुरुजींच्या कादंबऱ्यांचें ओझरतें दर्शन घेतल्यानंतर चिकित्सक मनापुढे असा प्रश्न उभा राहतो कीं, त्यांनीं आपल्या कादंबऱ्या का लिहिल्या ? आपणांस असें दिसतें कीं, कांही लोक प्रसिद्धीसाठीं लिहितात, काहीं पैशासाठी लिहितात, तर कांहीं ' कागद यंत्रावर लावलेला आहे, मजकूर खुंटला आहे, काहीं तरी मजकूर द्या' अशी निकड लागली आहे म्हणून लिहितात. गुरुजी ह्या तीनही प्रकारांत मोडत नाहींत. लेखकांचा आणखी एक चवथा प्रकार आहे. त्यांत कविवर्य तांब्यांसारखीं माणसें मोडतात. तीं माणसें आत्मविनोदार्थ लिहितात. आणि साने ? त्याना काहीं तरी लिहिल्याशिवाय राहवत नाहीं, म्हणून ते लिहितात. साने म्हणतात, "पांखराची जशी किलबिल, तसें माझें लिहिणें. किलबिल केल्याशिवाय त्यांना राहवत नाही. मलाही काहीं तरी लिहिल्याशिवाय राहवत नाहीं." फरक एकच. पांखराची किलबिल पुष्कळदां निर्हेतुक असते. साने मात्र सहेतुक लिहितात. केवळ लेखनासाठीं ते लेखणी उचलीत नाहींत. 'कलेसाठीं कला' हें तत्त्व त्यांना मान्य नाहीं. उलट ते म्हणतात, " मला कला कळत नाहीं. पांखरे किलबिल करतात, तेथें का कलेचे नियम असतात ? झरा झुळझुळ वाहतो व गुणगुणतो कांहीं तरी. तेथें का तंत्र असतें ?" सान्यांचें कादंबरीवाङ्मय वाचीत असतांना असें दिसतें कीं, त्यांच्या मनांत विचारांची बेफाम गर्दी होऊन त्यांचे विचार आठवतील त्या शब्दांनीं प्रकट होतात. व स्वतः साने साधेल तें तंत्र अंगीकारतात. एका पुस्तकाच्या निर्मितीबद्दल ते जें म्हणतात, तेंच सर्व पुस्तकांबाबत लागू पडतें. ते म्हणतात, " माझ्या मनांत ज्या शेकडों कल्पना येत असत, ज्या विचारांची गर्दी उसळे, स्मृती येत, ज्या ज्या व्यक्ती उभ्या राहत, त्या सर्वांतून हें पुस्तक निर्माण झालें."

लेखक अनेकदां आपल्या अतृप्त आकांक्षा निदान कल्पनासृष्टींत तरी तृप्त झालेल्या पहाव्यात म्हणून लिहितो. सानेगुरुजींचेंही तसेंच झालें आहे. " प्रत्यक्ष सृष्टींत अतृप्त राहिलेल्या शेंकडों हृदयांच्या भुका तृप्त करण्याचा हा एक मार्ग होय. माझ्यासारख्या दुबळ्या कृतीच्या माणसाच्या मनांत खूप तळमळ असते, मनांत मनोहर स्वप्नें असतात; परंतु त्या सर्वांना कृतींत आणण्याचें धैर्य नसतें. मग दौत, लेखणी व कागद घेऊन कल्पनांचे घोडे नाचविणें, एवढाच पुरुषार्थ करतो. व तोच मी कुटुंबांत करीत बसें." सान्यांनीं

कादंबऱ्या कां लिहिल्या, याची कारणमीमांसा एकूण ही अशी आहे. त्यांच्या अतृप्त आकांक्षा तृप्त करण्यासाठीं, समाधानासाठीं त्यांनीं सारें कादंबरी-लेखन केले आहे.

गुरुजींनीं कादंबऱ्या कां लिहिल्या हें पाहिल्यानंतर सहजच आपल्या मनांत अशी जिज्ञासा उत्पन्न होते कीं, त्यांनीं आपल्या कादंबऱ्या कशा लिहिल्या ? पुष्कळ लेखकाचे असें असतें कीं, त्याना लिहावयास स्फूर्ति हवी असते. या स्फूर्तीच्या आवाहनाचे प्रकारही अनेक आहेत. चहा वा मद्य घेतल्याशिवाय कित्येकाना स्फूर्ति येत नाहीं, तर कित्येकांना सिगारेट्सच्या धूम्रवलयांकडे पाहिल्याशिवाय स्फूर्तिदेवी प्रसन्न होत नाहीं. एकाद्याला एकात हवा असतो, तर एकादा दररोजच्या धबडग्यांतही सरस्वतीची पूजा बांधू शकतो व स्फूर्तिदेवीला वश करूं शकतो. एकाद्याला सुपारी चघळावयास हवी असते, तर एकाद्याला तपकीरीची तल्लफ असते. परंतु यांपेक्षां गुरुजींचें प्रकरण कांहीं औरच आहे. ते म्हणतात, "हृदय भरलेलेंच आहे. भराभरा शाईनें कागदावर ओतावयाचें, एवढेंच उरलेलें आहे." 'श्यामची आई' ही कथा छापील दोनशे अठ्ठावीस पानें त्यानीं अवघ्या पांच रात्रींत लिहिली ! स्फूर्तिदेवता व शब्दसंपत्ति त्याच्यासमोर सदैव हात जोडून उभ्या. आज्ञेचाच काय तो अवकाश.

कथानक लिहितांना तें कशा पद्धतीनें सांगावे याबद्दल ते काहीं पूर्व-विचार करतील, तर तसेंही दिसत नाहीं. 'धडपडणारीं मुले' या कादंबरीच्या प्रस्तावनेंत ते लिहितात, " एके दिवशी तुरुंगांत मी सहज लिहूं लागलों व त्या सहज लिहिण्याचा विस्तार होत गेला. माझ्या मनांत आधीं कांहींही ठरलेलें नसे. उद्यां कोणतें प्रकरण लिहीन, कोणतें वर्णन घालीन, कोणतें नवीन पात्र निर्मीन, कांहींही ठरलेलें नसे. आपोआप डोळ्यासमोर जसजसें येत गेलें, तसतसें मी लिहीत गेलों. नदीच्या प्रवाहाला जसें पुढचें पाऊल माहित नसतें, तसेंच माझें होतें. माझ्या लेखनाची नदी पुढें जात होती. लिहून झाल्यावर याला नाव काय द्यावें असें मनांत आलें. पुस्तकांत शेंकडों ठिकाणीं आलेला 'धडपडणारीं मुलें' हा शब्द माझ्या डोळ्यांसमोर आला, व ते नाव दिलें." या उताऱ्यावरून असें लक्षांत येईल कीं, पूर्वसंकेतानुसार लिहिण्याची गुरुजींची पद्धत नाहीं. पण मला असें वाटतें कीं, त्यांच्या अंत-र्मनांत लेखनाविषयीं नेहमीं निश्चय झालेला असतो.

आतांपर्यंतच्या विवेचनावरून सानेगुरुजी यांनीं कादंबऱ्या का लिहिल्या व त्या लिहिण्याची त्याची पद्धत कोणती, हे ध्यानात आलेच असेल. आता त्यांनी लिहिलेल्या कादंबऱ्याचा प्रामुख्याने विचार करूं. सुरुवातीला दिलेले 'कादंबऱ्याचें ओझरते दर्शन' पाहिल्यास हे लक्षात येईल कीं,'श्यामची आई,' 'श्याम' खंड १, खड २ या तीनही पुस्तकातून यशोदामातेच्या श्यामच्या आठवणी आहेत. 'धडपडणारी मुले' या कादंबरीच्या पहिल्या खंडात कथानकाला प्राधान्य नाहीच, असे म्हटलें तरी चालेल. तीनही खंडमिळून येणाऱ्या कथानकाचा पाया या खंडात घातलेला दिसतो. बाकीच्या सात कादंबऱ्यात मात्र कथाबीज व त्याचा विस्तार झालेला दिसून येतो. त्यापैकी 'तीन मुले' या कादंबरींतील कथावस्तु टेनिसनच्या 'इनॉक ऑर्डन' वरून घेतली असल्याचे सुरुवातीलाच त्या कादंबरीत नमूद केलेलें आहे. 'सती' या कादंबरीत तर गुरुजींनी त्या कादंबरीचे कथासूत्र सुरुवातीला लिहिलेल्या प्रास्ताविकांतच सागून टाकले आहे. 'क्रांति' व 'गोड शेवट' या प्रचारप्रधान कथा आहेत. यात तत्त्वप्रतिपादनाला मुख्य स्थान असून कथेला गौण स्थान आहे. 'क्राति' या कादंबरींतील नायक रामदास ह्यापेक्षा भाई मुकुंदराव ह्यालाच अधिक उठाव मिळालेला आहे. नायिका 'माया' हिच्यापेक्षा 'शाता' अधिक ठळकपणें डोळ्यांपुढें उभी राहते. कथेपेक्षां प्रचाराला अधिक महत्त्व दिले गेलें म्हणजे कथेंतील नायक–नायिकांपेक्षा प्रचार करणाऱ्या व्यक्तींना प्राधान्य येणें स्वाभाविक असतें. तसेच 'आस्तिक' मध्ये नागानंद व वत्सला ह्याच्या भेट–परिचय–प्रेम–परिणय ह्या गोष्टींना महत्त्वच नाहीं. तीं दोघेही आर्य व नाग ह्याच्यामध्ये एकी होण्याकरतां धडपडतात. आणि नेमकें याच गोष्टीला सर्व कथेंत प्राधान्य आहे. भिन्नभिन्न संस्कृतीचे प्रवाह हिंदुस्थानांत यावेत व तेथें त्यांचें मधुर मीलन व्हावें हें साने यांचें एक सुखस्वप्न आहे. त्या सुखस्वप्नाच्या पूर्तीसाठीं नागानंद व वत्सला हीं साधनें आहेत. तेव्हां 'क्रांति', 'गोड शेवट' व 'आस्तिक' ह्या तीनही कथांमध्यें प्रचाराला प्रमुख स्थान असून वाचकांच्या मनोविनोदनाला गौण स्थान आहे. 'रामाचा शेला' व 'पुनर्जन्म' ह्या मात्र आनंदप्रधान अशा गोड कादंबऱ्या आहेत.

कादंबरी हा ललित लेखनातील मनाला आनंद देणारा एक वाङ्मय-प्रकार आहे. ह्या सूत्रानुसार कादंबरी म्हणजे कोठल्याहि प्रश्नावरील पांडित्यपूर्ण प्रवचन नसून एकाहून एक चमत्कृतिपूर्ण व एकमेकाशी कार्यकारणसंबंधानें जोडल्या गेलेल्या अनेक प्रसंगांची एक चेतोहारि मालिकाच होय. या दृष्टीने मनोहर प्रसंग व ते सांगण्याची तऱ्हा असे कादबरीचे दोन भाग पडतील. कथानक व तंत्र अशीं या दोनहि विभागाना अनुक्रमे नांवें देता येतील. कथानक म्हणजे चमत्कृतिपूर्ण प्रसंग व त्याच्या मागच्या-पुढच्या कार्यकारण दुव्याचा विस्तार असतो. हा विस्तार चित्ताकर्षक रीतीने करणे म्हणजेच तंत्र संभाळणे होय. मध्यवर्ति घटना अशी असली पाहिजे कीं ती सागताक्षणीच ऐकणाऱ्याच्या मनात तिच्या मागच्यापुढच्या धाग्याबद्दल कुतूहल निर्माण व्हावें. श्रोत्याची जिज्ञासा पहिल्याप्रथम जागी करून ती अखेरपर्यंत सुस्त पडूं न देणें यातच कादंबरीच्या तंत्राचे मर्म आहे. वाचकाचे मनोरंजन होण्यासाठीं कथेत संग्राम हवा असतो; विरोधी शक्तीची झुंज लागावयास हवी असते. वाचकांच्या मनाची पकड घेणारा प्रसंग निर्माण केला म्हणजे वाचकाची जिज्ञासा डिवचली जाते. ही डिंवचलेली जिज्ञासा सतत ताजी ठेवण्यासाठीं वाचकांना विस्मयाचे धक्के द्यावे लागतात. हे धक्के देत असताना कथानकाची गुतागुंत करून नीरगांठ बाधून व शेवटीं ती वाचकाच्या अपेक्षेचा भंग करून उकलून दाखविली म्हणजे कादंबरीची अखेर साधली असे होतें.

कादंबरीच्या ह्या तत्त्वनिकषावर सान्यांच्या कादंबऱ्या घांसून पाहिल्या, तर त्याचा कस बराच कमी लागतो. काय कथन करावयाचे आहे हे सान्याना नक्की माहित आहे.परंतु हृदयांतील खळबळ कशा रीतीने कथन करावयाची याचे जे एक शिष्टसमत कलातत्त्व आहे,त्याकडे ते तितकेसे लक्ष देत नाहीत. त्याला ते गौण स्थान देतात. येईल तसे लिहिण्यापेक्षा जे येईल तेच सुबकपणें माडले तर अधिक परिणामकारक होते, या तत्त्वाकडे ते प्रामुख्याने लक्ष देत नाहीत. प्रा. फडके याच्या शब्दांत लिहावयाचे तर, "एक साधु होता, तो मेला. एवढे सरळ सांगितले तर ऐकणाऱ्याच्या बुद्धीचे त्यात रंजन होत नाहीं. उलट, एक साधु होता. त्याच्या साधुत्वाबद्दल संशय येऊन एका

दुराचारी राजाने त्याचा छळ करावयाचे ठरविले असे आपण सांगितलें तर ऐकणारा लगेच 'ह, मग काय झाले ?' असे मोठ्या औत्सुक्याने विचारतो आणि मग आपल्या सांगण्यानें त्याच्या बुद्धीला आल्हाद वाटतो." तेव्हा असें चित्ताकर्षक तंत्र सानेगुरुजी यानी कितपत पाळले आहे, याचा विचार करणें प्रस्तुत होय.

'रामाचा शेला' या कादंबरींत सरला नांवाची एक मातृहीन विधवा मुलगी प्रेमासाठीं भुकेली असल्याचे दाखविले आहे. तिचा बाप व तिची सावत्र आई तिला विषवल्ली म्हणून वारंवार हिणवून तिचा द्वेष करतात. योगायोगाने तिची व उदयची गांठ पडते. तिला हवी असलेली सहानुभूति व प्रेम या गोष्टी त्याच्याजवळ तिला मिळतात. दोघाच्या प्रेमाचें परिणयांत रूपातर होण्यापूर्वी तिला दिवस जातात. यापुढे परिस्थितीमुळे दोघेहि दूर फेकलीं जातात व पुन्हा योगायोगाने दोघांचे पुनर्मीलन होते. यातील सरला ज्या प्रतिकूल परिस्थितीशी झुंज खेळते, ती मोठी चित्तवेधक आहे. वाचकाची जिज्ञासा शेवटपर्यंत ताजी ठेविलेली आहे. यातील गब्बूशेट असहाय सरलेला भ्रष्ट करण्याचा निश्चय करून तिच्या खोलीत जातो. त्या वेळीं वाचक आपला श्वास कोंडून धरून पुढे काय होते हे जिज्ञासेने वाचीत असतो. त्याची सारी सहानुभूति सरलेकडे असते. तेव्हां रामाचा शेला तिच्या मदतीला येतो व तिची सुटका होते. सरलेची ही सुटका उदयकडून करविली असती तर हा कळस तंत्रदृष्ट्या अधिक आकर्षक झाला असता. त्यामुळे उदयने सरलेची सुटका करण्याकरिता कसकसे प्रयत्न केले हें दाखवितां येऊन त्याच्या पदरीं कर्तृत्व बांधतां आलें असते. परंतु सान्यांनीं ते केले नाहीं. ते त्याना जमले नसते असें नाही; परंतु त्या तत्राकडे ते दुर्लक्ष करतात असेंच म्हणावेसे वाटतें.

सानेगुरुजी यांच्या निवेदनपद्धतीकडे पाहता ती साक्षात् अथवा अनुलोम पद्धत आहे. " जसे घडले तसे सांगितलें " अशी ती पद्धत. पाण्याचा प्रवाह एकतर्फी पाहण्यांत जशी गंमत नाहीं, तद्वतच ही पद्धत कंटाळवाणी होते. इतर सर्व कादंबऱ्या सोडून फक्त 'रामाचा शेला' व 'पुनर्जन्म' या दोनच कादंबऱ्यांत वरील अनुलोम पद्धतीचा त्यांनीं त्याग केलेला

दिसतो. केवळ कथनाला प्राधान्य दिल्यामुळें पाल्हाळ येतो. चमत्कृति, विस्मय व कुतूहल यांचे क्वचित् दर्शन होते. त्यातून सान्यांची मधून मधून प्रवचने देण्याची हौस [illegible] अधिक भर घातल्यावांचून राहत नाहीं. वर सांगितलेल्या दोन कादंबऱ्या सोडून त्याच्या बाकीच्या कादंबऱ्या तत्रदृष्टीनें पाहिल्यास दीर्घकथा होत असेच म्हणावेसे वाटते.

सानेगुरुजींच्या कादंबऱ्यात कंटाळवाणी प्रवचने आहेत, चमत्कृति नाही, विस्मय नाही किंवा कुतूहल नाही असे असूनहि त्यांच्या कादंबऱ्या महाराष्ट्रात घरोघर मोठ्या आवडीने वाचल्या कशा जातात, एवढेंच नव्हे, तर त्यांच्या ह्या दीर्घकथाच्या दोन दोन तीन तीन किंवा क्वचित् सातदेखील आवृत्त्या कशा निघतात, असे कोणते आकर्षण त्यात आहे, हा प्रश्न मनात उभा राहिल्याशिवाय राहत नाही. या जबरदस्त आकर्षणाचे प्रधान कारण म्हणजे त्यांच्या लेखनात दिसून येणारी आत्यंतिक कळकळ. ते अतिशय कळकळीने व तळमळीने लिहितात. ते हृदयाच्या रक्ताने लिहितात. कळकळीबरोबर उत्कंठाहि आहेच. माणसाच्या भावना तीव्रतर झाल्या म्हणजे त्याना या ना त्या मार्गाने वाट करून द्यावी लागते. साने आपल्या उत्कट भावनांना कागदावर लिहून काढतात. त्यांची भावना-प्रधानता त्यांच्या लेखनांतहि उत्कटतेनें प्रतीत होते. ते आपल्या आत्यंतिक भावनाप्रधानतेमुळें रडतात, त्याच तीव्रतर भावना कागदावर उतरल्या जात असतांना त्यांची मानसप्रजा रडते व करुणरसाच्या उत्कटतेनें वाचकहि रडतात. त्याचप्रमाणें त्यांची भाषा अत्यंत बालबोध व सोपी आहे. लहानपणीं पाठ केलेलीं स्त्रीगीतें व कहाण्या यांनीं त्यांच्या भाषेला सुबोधता आणली आहे. तळमळ, उत्कटता, बालबोधपणा ह्यांच्या जोडीला रसाळपणाची जोड मिळालेली आहे. शुद्धता आहे, पावित्र्य आहे, सद्गुणांची स्तुति व दुर्गुणांची निंदा आहे. एकूण, सदभिरुचीला विघातक असें कांहींहि नाहीं. त्यांना नेहमीं तळमळ लागलेली असते कीं, ‘ जें जें आपणांसि ठावें, तें तें इतरांसि शिकवावें. ’ प्रसंग लहानसा का असेना, परंतु त्यांच्याकडे ते ‘ मला यांतून काय शिकवतां येईल ?’ इकडे बघत असतात.

स्वतः सानेगुरुजी मध्यम वर्गांतील आहेत. त्यांनीं दारिद्र्यांत अनेक वर्षें काढलीं आहेत. ते शेतकऱ्यांच्या जीवनांत शिरले आहेत. मजुरांशीं तद्रूप

झालेले आहेत. शिक्षक असताना विद्यार्थ्यांत मिसळले आहेत. आणि स्वतः अत्यंत संवेदनशील असल्यानें मध्यम वर्गाची सुखदुःखें, शेतकरी, मजूर याच्या भावना किंवा विद्यार्थ्यांचे जीवन ह्याच्याशीं एकरूप होऊन ते लिहूं शकतात. वर उल्लेखिलेल्या ह्या बहुजनसमाजांतील प्रत्येकाच्या हृदयांतील भावनाना वाचा फोडण्याचे सामर्थ्य त्यांच्यांत आलेलें आहे. त्यामुळें ह्या बहुजनसमाजातील वाचक म्हणतो, "अरे, माझ्या मनातलेच गुरुजींनीं माडले. मला हेच म्हणावयाचे होते. पण गुरुजींनी तें किती सोज्वळपणें माडले आहे बरे !" श्यामची आई, गुणाची आई, ही पात्रे प्रत्येकाच्या घरात वावरणाऱ्या माताच होत. वाचक म्हणतो, "माझ्याच आईचें, अथवा मला हव्या असलेल्या आईचेच हे चित्र आहे." 'श्याम' खंड १ मधील विद्यार्थीदशा प्रत्येक विद्यार्थ्याला वस्तुस्थितिनिदर्शक वाटते. याच विस्तृत अनुभवाच्या जोरावर प्रत्येक प्रकारच्या वाचकाचें मन आकर्षित करून घेण्याची शक्ति गुरुजींच्या अंगी आहे. तंत्राकडे दुर्लक्ष झाले असून, विस्मय, चमत्कृति इत्यादि प्रकार अत्यल्प असूनही त्याच्या कादंबऱ्या लोकप्रिय कां झाल्या याचे खरे मर्म हे आहे.

शृंगाररसाने आतापर्यंतच्या बहुतेक कादंबऱ्या ओथंबलेल्या होत्या. नवरसांत तर शृंगाराला राजा म्हटले आहे. ह्या रसराजानें आतापर्यंतच्या कादंबऱ्यावर पूर्ण स्वामित्व चालविले आहे. १९१५ च्या विविधज्ञानविस्तारात कादंबऱ्यांबद्दल लिहिताना श्री. भानू यानी अशी तक्रार केली होती कीं आजच्या काळात कादंबऱ्यात बहुतेक अंशीं शृंगाररसच आढळून येतो. तदनंतरच्या ह्या गेल्या तीस वर्षांच्या काळांत काय शृंगाराला कमी प्राधान्य देण्यांत आले आहे ? उलट शृंगारनदीला पूरच आलेला आपणास दिसतो. या शृंगारनदीला बाध घालण्याचा कांहींसा प्रयत्न सानेगुरुजींनीं केला आहे. त्याच्या कादंबऱ्यात शृंगाराला बरेच गौण स्थान देण्यात आले आहे. उत्तान शृंगार तर नांवालादेखील नाही. त्याच्या नायक–नायिकाना आपल्या प्रियजनांचा विरह होत नसेल असे नाहीं. परंतु मातृभूचे दुःख व जनतेंतील सहस्रमुखी वेदना यांनीं त्या नायकनायिकांचीं हृदये इतकीं भरून गेलीं आहेत कीं, तेथें वैयक्तिक शृंगाराला व विहाराला स्थानच नाहीं. क्वचित् प्रियजन शृंगाराच्या आहारीं जाऊन प्रेमाचा खेळ खेळण्याचा प्रयत्न करतात.

परंतु त्यांचा हा खेळ लहान मुलाच्या निरागस क्रीडेसारखा वाटतो. त्यांत उत्तानपणा नसल्याने रसापकर्षकपणा नाही. 'तीन मुले' या कादंबरींतील मंगा, मधुरी आणि बुधा यांचे लहान मुलाप्रमाणे नाचणे, वाळूच्या टेकड्यां-वरून घसरणे किवा एकमेकाच्या अंगावर समुद्राचे पाणी फेकणें, किंवा 'आस्तिक'मध्ये नागानंद व वत्सला याचे मेघागनमाने हातात हात घालून नाचणे, 'पुनर्जन्म' मधील भाऊरावाने आनंदीला खाद्यावर घेऊन धांवणे इत्यादि कामक्रीडा बालिश वाटतात. लग्नापूर्वी वत्सला आपल्या प्रियकराबद्दलची आपली ओढ आपल्या वृद्ध आजीला एका झाडावर बसून मोठ्यानें ओरडून सागते. मला नाहीं वाटत की कोणतीही तरुणी अशा तऱ्हेने आपल्या हृदयातील गुपित इतराना ओरडून सागेल. ' गोड शेवट ' मध्ये गुणा व इदु याचे प्रेम निष्पाप [illegible] प्रेमासारखे निरागस वाटते. तेथे कामदेवाचा प्रभाव दिसत नाहीं. शृंगाररसाला आळवणे हा सानेगुरुजींचा प्रमुख विचार नव्हेच. त्याच्या वाङ्मयांतील रसराज शृंगार नसून करुण आहे. सस्कृत वाङ्मयात ज्याप्रमाणे करुणरसाचा भवभूति हा स्वामी मानला गेला आहे, तोच मान आधुनिक मराठी वाङ्मयांत सानेगुरुजींना द्यावासा वाटतो. करुणरसांत सान्याच्या भावना जितक्या उत्कट होतात, तितक्या इतर रसांत क्वचितच होतात. या रसाच्या आविष्कारांत त्यांनीं इतर ललितलेखकाना मागे टाकले आहे. मातृभूचें पारतंत्र्य पाहून त्यांचे हृदय तिळतिळ तुटते. शेतकरी व मजूर यांच्या दीनवाण्या दारिद्र्याचें अवलोकन करून त्यांच्या हृदयाला घरें पडतात. ' क्राति ' मधील गिरणीकामगाराचीं दुःखे पाहून कोणाचें हृदय द्रवणार नाहीं ? ' सती ' मधील त्या साध्वी स्त्रीच्या हाल-अपेष्टा पाहून कोणत्या सहृदय वाचकाला हुंदका येणार नाहीं ? ' गोड शेवट ' मध्यें गुणाच्या आईवडिलांवर घर सोडण्याचा प्रसंग आलेला पाहून आपले डोळे ओलावतात. दारिद्र्यांत खितपत पडलेली उदयची माता व श्यामची आई, मंगाला जहाजावर पोहोंचवून आलेली मधुरी ह्या कारुण्याच्या मूर्ति वाटतात; परंतु ह्या करुणरसाचें रूपांतर कधीं कधीं असहाय्यपणें रडण्यांत होतें. त्या वेळीं पात्रांची खरोखरच कींव करावीशी वाटते. ' गोड शेवट ' मध्यें जगन्नाथाचे आईवडील आपल्या सुनेला

जगन्नाथाचें मन वळविण्याचा उपाय सांगतात: " तूं रड " गुणा एकदा आपल्या पत्नीला सांगतो, " इंदिरा रडते, तूंही रड. " गुणा व जगन्नाथ पद्मालयास जातात. तेथें कांहीं वेळ त्यांच्या स्त्रिया त्यांना दिसत नाहींत म्हणून ते दोघेहा रडतात ! 'तीन मुले'मध्ये आपल्याला पतंग उडवितां येत नाहीं म्हणून बुधा रडतो. तेव्हां मधुरी म्हणते, "रडतोस काय असा ?" त्यावर बुधा उत्तरतो, "रडूं नको तर काय करूं ?" मंगाला राजकन्या म्हणते, " मी रडते. तुम्हीही रडा." अशा प्रकारची रडवी वृत्ति मधून मधून सर्वत्र डोकावते. बुधा हे पात्र तर रडवे व निष्क्रियच आहे. श्यामचे गंगूने वर्णन केले आहे, " तूं रडयाच आहेस. तुला कवडयानीं खेळ म्हणून ' सांगितले तरी रडतोसच." गुरुजींची अशी एकही कादंबरी नाही, कीं जींत पात्राचे अश्रुसिंचन नाही !

वीररसाचा विचार करीत असताना नागानंदाचे उदाहरण दृष्टीसमोर येते. नागानंद वेगाने वाहणाऱ्या नदीच्या पुरात उडी मारून वत्सलेस वांचवितो. तो एका सिंहाला मारतो. तो म्हणतो, "दुर्बल असणं पाप होय." तो बलोपासना करतो. मैलोगणती चालतो. 'क्रांति' मधील आनंदमूर्ति घोडा कौशल्यानें हाकण्यांत पटाईत असतो. शारीरिक वीरवृत्ति येथेंच संपते. मानसिक वीरवृत्ति क्रांतीमधील मुकुंदरावाच्या ठिकाणीं दिसते. तो निधडया छातीचा वीर भरलेल्या मोटरीपुढे आडवा पडतो व मजुरांसाठीं प्राणार्पण करतो. नागानंद व वत्सला आपल्या ध्येयपूर्तीसाठीं आपली काया अग्नींत होमून घ्यावयास तयार असतात. अशा रीतीनें वीरवृत्तीचीं उदाहरणें मधून मधून त्यांच्या कादंबऱ्यांतून नजरेसमोर येतात.

हास्यविनोदाबद्दल फारसें लिहिण्यासारखें आढळत नाहीं. विनोद हा त्यांच्या लिखाणाचा आत्मा नव्हे. कादंबऱ्यांच्या चोवीसशें पृष्ठांत एकदांही खळखळून हंसूं आल्याचें आढळत नाहीं. सानेगुरुजी हे गंभीर स्वभावाचे असल्यानें विनोद त्यांच्या वृत्तीला मानवत नसेल. सानेगुरुजींच्या सर्व कथांतून करुणरसालाच प्राधान्य दिलें गेलें आहे, हें निश्चित.

त्यांच्या सर्व कादंबऱ्या वाचून झाल्यावर त्यांनीं निर्माण केलेल्या पात्रां-बद्दल एकत्र विचार केला तर खालील गोष्टी सरळपणें नजरेस पडतात.

त्यांचीं कांहीं पात्रें तोंडवळयानें, विचारानें व कृतीनें एकसारखीं दिसतात. त्याबद्दल साने 'आस्तिक'च्या प्रस्तावनेत लिहितातः " पुस्तकांचीं नावे निराळी; आंतील पात्राची नांवे निराळीं. थोडेफार प्रसंग निराळे, परंतु विचार तेच. भावना त्याच. मी निराळें देणार तरी काय ?"

गुरुजींनीं आत्मसदृश अशीं जीं पात्रें निर्माण केलीं आहेत, तीं एकमेकासारखीं आहेत. दयाराम भारती, मनोहर, मुकुंदराव, स्वामी व आस्तिक ऋषि हीं पात्रे पहा. गुरुजींना व्यवहारी जगात जे करता येत नाही तें तीं कादंबरीच्या विश्वात करून दाखवितात. 'धडपडणारीं मुले' ह्या कथेच्या प्रस्तावनेत ते लिहितातः " माझ्यासारख्या दुबळ्या कृतीच्या माणसाच्या मनात खूप खळबळ असते. परंतु सर्वांना कृतीत आणण्याचे धैर्य नसते." याचा अर्थ असा की, अतृप्त आशा, इच्छा याची पूर्ति ह्या पात्राकरवी पुऱ्या केलेल्या असतात. दयाराम भारती, मनोहर, मुकुंदराव व स्वामी ही प्रचार करणारी पात्रे सदैव हिंडत असतात. याना ऊन बाधत नाहीं. पाऊस त्रास देत नाही. याचे खाण्यापिण्यांत लक्ष नाही. सानेगुरुजीच्या ध्येयाने मानवाची रूपे घेतलेल्या त्या साऱ्या मूर्ति आहेत. त्यामुळें ही पात्रे आदर्श, उत्कट, भावनाप्रधान, त्यागी व सर्वगुणसंपन्न अशी बनलेली आहेत.

' गोड शेवट' मधील दयाराम भारती ही एक आकर्षक शक्ति आहे. ते जेथे जेथें जातील तेथें तेथें लोकाना आकर्षून घेतील व आपणासारिखे तात्काळ करतील. जगन्नाथ व गुणा तर त्याचे भक्तच बनलेले आहेत. ध्येयनिष्ठ दयाराम भारतीचें मन हिंदुस्थानचा शतद्वारांनी होणारा अध:पात पाहून तळमळते. त्यानी आपला देह शेतकरी व मजूर यांच्या सुखासाठी झिजविला. अन्यायाचा प्रतिकार केला व करविला. सर्वत्र क्रांति घडवून आणावी या मताचे ते एक वंदनीय पुरुष होत. त्यांचे मन शुद्ध विचारांनी भरलेले असून त्याची वाणी मधुर आहे. दयाराम भारतीचें शब्दचित्र रेखाटतांना महात्मा गांधी तर सानेगुरुजीच्या दृष्टीसमोर नसतील ना ?

'धडपणारीं मुलें' यांतील स्वामींच्या शब्दचित्राकडे पाहिलें म्हणजे खुद्द सान्यांचीच पदोपदीं आठवण होते. स्वामींनी देशासाठीं सर्व सुखाचा त्याग केलेला असून अक्षरशः संन्यास घेतलेला आहे. ते भटकत भटकत गोपाळ-

रावांच्या अंमळनेर येथील आश्रमात येतात व तेथेच आग्रह झाल्यावरून स्थिर होतात. आश्रमांतील मुलाच्या चादरी धुतात, कंदील साफ करतात. आश्रमांतील मुलांसाठीं रोज सकाळीं उठून एक हस्तलिखित दैनिक लिहून काढतात. एकदां दोन तीन दिवसांत दोनशे छापील पृष्ठें होतील एवढा मजकूर त्यानी लिहून काढला. लिखाणाचे नावही 'गोड गोष्टी' असेच दिले. एकदा ते आजारी पडले असता आश्रमातील मुले त्याची सुश्रुषा करीत होती व ते गादीवर आरामात पडले होते. त्या वेळी त्याना गरीब, अनाथ जनतेची आठवण होऊन त्याना रडूं कोसळलें. विवेकानंदांना देखील अमेरिकेतील मऊ मऊ पलंग असेच रुतले होते. स्वामी एके ठिकाणी म्हणतात, " मला मुलाची आई होऊं दे. " साने गुरुजीचे चरित्र डोळ्यां-पुढे ठेविल्यावर साने व या कथेतील स्वामी हे एकच नव्हेत काय ?

'क्रांति'मधील मुकुंदराव हे पात्र देखील गुरुजीची प्रतिकृतिच आहे असे वाटते. मुकुदराव प्रथम आदर्श शिक्षक म्हणून गाजतात. ते विद्यार्थि-प्रिय असून त्यांचे वाचन विस्तृत असते. त्याची राहणी साधी असून विचारसरणी उच्च आहे. त्याना खादी व श्रमजीवि लोकाबद्दल फार प्रेम आहे. त्यानीं शिक्षकाची नोकरी सुटल्यावर उत्तर हिंदुस्थानचा प्रवास करून स्वतःच्या ज्ञानात भर घातली. ते विश्वभारतीत राहिले; निरनिराळ्या कामगार-संघटनाना त्यानीं भेट दिली. नंतर महाराष्ट्रात येऊन मजुराच्या उन्नतीप्रीत्यर्थ त्यानी अहोरात्र श्रम केले. मीनीवर प्रेम असूनहि तें प्रेम आपल्या कार्याच्या आड येऊं नये म्हणून त्यांनीं मरणघटकेपर्यंत तें व्यक्त केलें नाहीं ! ते मोटरीतून तर प्रवास करीत नसतच, परंतु गाडीवान बैलाला मारतात म्हणून बैलगाडीचा प्रवासहि ते टाळीत. त्याचा संचार पायीच असे. त्यांनीं महाराष्ट्रीय संस्कृति बंगालला उत्तम तऱ्हेने समजावून दिली. त्याना समाजांत क्रांति हवी आहे. श्रमणाऱ्यांचे हक्क प्रस्थापित व्हावेत ही त्याची मनीषा आहे. मुलाना त्यानी उपदेश केला: " सुखाचे संसार सोडून गरिबांत मिसळा. शिकून हमाल व्हावा. अन् मजूर बना. क्रांति करा. "

ह्या तीनहि पात्रांचें वर्णन एकत्र वाचले म्हणजे गुरुजींच्या चरित्राची, त्याच्या आचारविचारांची बरीचशी ओळख होते. या पात्रापुढें त्या त्या

कादंबऱ्यांतील नायक फिके पडतात. त्यांचीं आणखी अनेक पात्रें ध्येयदर्शी आहेत, त्याच्याबद्दल आदर वाटतो व भीतीहि वाटते! आस्तिक हा महान् पुरुष आर्य व नाग यांच्या एकीसाठी प्राणपणाने झिजतो. तो ह्या तत्त्वाच्या मागें इतका लागलेला असतो की, त्याला जळीं, स्थळी, काष्टीं, पाषाणी हेंच तत्त्व दिसते. लहान बालकाबरोबर पाण्यात भाकरीचा खेळ खेळतांना देखील तो हे तत्त्व विसरत नाहीं. दुसरे अतिमानुष पात्र म्हणजे वत्सला. ती नागानंदाबरोबर हर्षभराने नाचते. ध्येयनिष्ठेसाठी एका नागाबरोबर विवाह करते. आपला पोटचा मुलगा आजारी असताना त्याला टाकून प्रचारकार्य करते. आर्य व नाग याच्या एकीसाठी होमकुंडात उडी घेणारी ही स्त्री केवळ देवता वाटते. ती तुमच्या आमच्या घरांत वावरणारी स्त्री वाटत नाहीं. मानव हा सद्गुणदुर्गुणाचा पुतळा आहे. एकाद्यात सद्गुण अधिक असतील, तर एकाद्यात दुर्गुण अधिक असतील. वत्सलेंत दुर्गुण नाहींतच. आणि म्हणूनच ती अतिमानुष वाटते. ‘रामदास’ व ‘भाऊसाहेब’ आपल्या कुळाचीं गहाणखते, प्रॉमिसरी नोटा जाळून टाकतात! सामान्य व्यवहारात हा आदर्शवाद कितपत शक्य आहे?

याबरोबरच कांहीं मानवी पात्रांचीहि ओळख झाल्यावाचून राहत नाही. **गुणा** हा सच्छील आईबापाचा एकुलता एक सद्वर्तनी मुलगा असतो. त्याचें मित्रावर अपरंपार प्रेम असते. तो सारंगी उत्तम वाजवितो व नादब्रह्मात समाधि लावतो. आईबापासाठीं वनवास भोगतो व कर्जापोटी गेलेले घर परत मिळविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगतो. त्याचे आपल्या पत्नीवर अलोट प्रेम असतें: परंतु तिच्या प्रेमात न गुरफटता तो सर्व परीक्षा पास होतो. त्याला हलक्या कामाची लाज वाटत नाहीं. दयाराम भारतींचा शिष्य असल्यामुळें तो पुढें कर्तृत्ववान् निपजेल अशी आशा वाटते. **जगन्नाथ** मित्रासाठीं भावाला दूर लोटतो. खेडोपाडी जाऊन दयानंद भारतीच्या आदेशानुसार जागृति करतो. मजुराना चांगल्या तऱ्हेनें वागवितो. भिकाऱ्यांना उष्टें घालूं देत नाहीं. लग्नात खादी वापरतो. तो दागिन्याचा तिरस्कार करतो; कारण ती संपत्ति गरिबांना लुटून, पिळून मिळविलेली असते ना! तो पत्नीच्या मोहांत न पडतां सद्धेतूनें, दक्षिण हिंदुस्थानांत आईबापांच्या इच्छेविरुद्ध जातो. येथपर्यंत तो होतकरू वाटतो. पुढें कावेरीच्या मोहांत

सापडून तो उल्लू बनतो व आईबाप व पत्नी ह्याना तो विसरतो. भोगप्रधान प्रेमासाठी उच्च आचारविचाराची होळी करतो. त्याच्या हातून एकहि सत्कृत्य होत नाहीं. कावेरीच्या मरणानंतर त्याला पश्चात्ताप होतो व त्याची पत्नी इंदिरा त्याला उदार मनानें क्षमा करते. **नागानंद** हा साने गुरुजींच्या सर्व नायकात उठून दिसणारा हा धीरगंभीर वीरनायक आहे. त्याला दुर्बलतेची चीड आहे. तो पट्टीचा पोहणारा आहे. शूर आहे. एकदा त्याने भाल्याने वाघ मारला. तो जातीने नाग असूनहि आर्यांचा द्वेष करीत नाही. वत्सलेने अनेकदा प्रेम सूचित करूनहि उल्लूपणानें तिच्या प्रेमपाशात तो पडत नाही. 'प्रेमाची खातर' पटल्यानंतरच व सुश्रुता आजीनें सांगितल्यानंतरच वत्सलेशीं तो लग्न करतो. मुलांवर निरतिशय प्रेम असूनहि त्याला आजारी स्थितीत टाकून तो प्रचारकार्य करतो. त्याला अनेक कला येतात. शेती येते, टोपल्या विणतां येतात, बांसरी वाजवितां येते. तो आपल्या तत्त्वासाठीं देहाचा होम करावयास सिद्ध होतो.

इतर गौण पात्रे अगदीच सामान्य वाटतात. गुरुजींनीं त्याचा उपयोग पार्श्वभूमीसारखा करून नायकांना उठाव दिला असता तर अधिक बरे झाले असते. परतु गुरुजीच्या कादंबऱ्यात नायकांना तरी कोठें महत्त्व आहे ? महत्त्व आहें ते दयाराम भारती, स्वामी किंवा मुकुंदराव यानाच. दुसरा महत्त्वाचा विशेष म्हणजे सर्व पात्राना संगीताची अपरंपार गोडी असलेली दिसते. जगन्नाथ, गुणा, रामदास, शांता, मुकुंदराव, भाऊराव इत्यादि बहुतेक पात्रे संगीत म्हटले कीं तल्लीन झालेलीं दिसतात. त्याशिवाय हलकीं सलकीं कामे करण्यांत त्याना संकोच वाटत नाहीं. मोठमोठीं कामें करता आलीं, तरी हलकीं कामे कोणी करावयाचीं हा उदात्त विचार पात्रांतून गुरुजींनीं सांगितला आहे, असे दिसतें. त्यांना धोतर धुणें, भांडीं घांसणें, झाडणे, दळणे इत्यादि कामें करतांना कोणत्याहि प्रकारचा संकोच वाटत नाहीं. त्यानीं अलीकडच्या तरुणांना 'हलक्या कामाचें उदात्तत्व' (Dignity of Labour ) पटवून दिलें आहे. आजाऱ्याची मोठ्या प्रेमळपणानें सुश्रूषा करणें यांतील सेवेचें तत्त्वहि त्या पात्रांनीं अंगीकारिलें असल्याचें श्याम, गुणा, जगन्नाथ, व इंदिरा ह्या पात्रांतून दिसतें.

हल्लींच्या कादंबऱ्यांतून रूढ असलेल्या परित्यक्ता स्त्रियांचे प्रश्न, प्रौढ कुमारिकांचे प्रश्न, वेश्यांचे किंवा त्यांच्या मुलींचे प्रश्न इत्यादि विषयांहून सान्यांच्या कादंबऱ्यांतील प्रश्न अधिक व्यापक स्वरूपाचे आहेत. तसे पाहिलें तर हिंदवी स्वातंत्र्यांत अंतर्भूत असलेले प्रश्न म्हणजेच त्यांचा एकच एक व्यापक प्रश्न आहे असें म्हटलें तरी चालेल. त्यानी निसर्गवर्णनाने कादंबऱ्यातील पानें भरलीं नाहींत. 'श्यामची आई' मधील यशोदा व श्याम एकदा एका देवाला जातात त्यावेळचें निसर्गवर्णन वगळल्यास कोठेहि परिणामकारक निसर्गवर्णनें आढळत नाहीत. 'गोड शेवट'मध्ये जगन्नाथ दक्षिण हिंदुस्थानात जातो. 'क्राति'मध्यें रामदास बंगालमध्ये जातो. परंतु या कादंबऱ्यातून एकाहि गांवाचें अगर स्थळाचे वर्णन सांपडत नाही. कोणतीहि निसर्गरम्य जागा डोळ्यांपुढें उभी राहत नाही. प्रा. फडके यानी 'दौलत' कादंबरीत लोणावळ्याचे हुबेहुब केलेले वर्णन किंवा तत्सम सुंदर निसर्गवर्णन सान्याच्या कादंबऱ्यातून नाहीत. त्याचप्रमाणे सूक्ष्म मनोविश्लेषणाचा कोठेच प्रयत्न केलेला दिसत नाही. त्याना बरेचसें सांगावयाचेच असल्यामुळें संयमाचा अभाव दिसतो. लांबलचक प्रवचने व व्याख्यानें त्यामुळेच वाचकाना अडवितात. कित्येक ठिकाणीं पुनरुक्ति फार. उलट त्यांच्या कादंबऱ्या लघु आकारांत (Abridged) पुन्हा प्रकाशित केल्या तरी रसहानि होणार नाहीं. 'तीन मुलें' यांत मधुरीच्या मुलाच्या आजाराचे इतके वर्णन आहे कीं त्याच्या प्रातर्विधीचें वर्णन करून सान्यानीं औचित्यभंगहि पत्करला आहे. खरोखर संयम राखून तें वगळतां आले नसते असे नाही. त्याप्रमाणे लेखकानें एकहि खलपुरुष निर्माण केलेला नाहीं. 'पुनर्जन्मात' गोविंदराव कांहींसा त्या वळणावर जातो. पण तो प्रकृति दुष्ट नसल्याने निवळतो. स्वतः साने हे अतिशय सात्विक स्वभावाचे असल्यानें खलपुरुषाच्या खलत्वाची पराकोटीची केलेली कल्पनाच त्याना मानवत नसावी. ते 'सती'च्या प्रस्तावनेंत लिहितात कीं, "मला खलपुरुषाची कल्पनाच करता येत नाहीं." त्याचप्रमाणें त्याच्या कादंबऱ्यांतून क्षुद्र व अमंगल विचार किंवा अश्लीलता आढळत नाही. ते वाचकाच्या किंवा प्रकाशकांच्या आहारीं न गेल्याने जें खपेल तें लिहावयाचें किंवा जें रुचेल तेंच लिहावयाचें असें त्यानीं केलें नाहीं. त्यांनीं हीन मनोवृत्तीला कधींहि गुदगुल्या केलेल्या नाहींत.

केवळ कथनाला महत्त्व दिल्याकारणाने तात्त्विक दृष्टीनें सान्यांच्या कादंबऱ्यातून बरेच दोष दिसून येतात. त्याचा थोडक्यांत विचार झालाच पाहिजे. एखादा कुशल स्थापत्यविशारद उत्तम घर बाधताना प्रथम सर्व घरचा आकार अंत:चक्षूंसमोर आणतो. नंतर कागदावर त्याचे प्रमाणबद्ध चित्र काढतो. नंतर घर बाधतो. प्रत्यक्ष घर बाधतानाहि प्रत्येक वीट, प्रत्येक खिडकी, दार, कोनाडा, कपाट घराच्या सौंदर्यात भर घालीत आहे ना, हे हे तो चौकस रीतीने बघतो. तोच दाखला ललितलेखनातहि द्यावासा वाटतो. लेखकाने आपल्या ललितकृतीचे आपल्या मनाशी स्थूल चित्र उभारून त्या चित्राच्या सौंदर्यात भर घालतील व त्या चित्राला शोभतील असेच शब्द, संवाद, स्वभावपरिपोष इत्यादि ललितकथेची अंगे सजवावयास हवी असतात. परंतु सान्याच्या लिखाणात सारीच रीत निराळी दिसते. काही कादबऱ्याचा त्याच्याच शब्दात सागावयाचे झाल्यास लिहिता लिहिता विस्तार होत गेलेला आहे व अशा ह्या लिहिण्यानेच काही काही दोष निर्माण होणें अपरिहार्य झालेले आहे.

त्याच्या कादबऱ्यातील कथेचा ओघ अखंड सुरू आहे असे वाटत नाहीं. ज्या ज्या ठिकाणी त्याची पात्रे व्याख्याने देतात, त्या त्या ठिकाणीं तेवढा भाग वगळून वाचल्यास रसहानि होईल असे वाटत नाहीं. ही व्याख्यानें उद्बोधक व विचारप्रवर्तक असलीं, तरी कलेच्या व तत्राच्या दृष्टीनें तीं कादंबरीची मनोहर उपांगे ठरत नाहीत. खरोखर कादंबरींतील एखादा जरी शब्द सुटला, तरी आनंदात उणेपणा आला असे वाचकाला वाटले पाहिजे; परंतु तसें होत नाही. याच्याउलट कोठें कोठे, उदाहरणार्थ 'आस्तिक'मध्ये वत्सलेला मूल होतें तो भाग पाहिला तर एकाच पानांत लग्न, डोहाळे, मूल, चालणारें बालक, खोड्या करणारा मुलगा इतकाहि कथाभाग येऊन गेलेला आढळतो. त्याचप्रमाणें प्रवचनांच्या हिरीरींत कित्येक ठिकाणीं विषयांतरेंहि झालेलीं आहेत. 'श्यामच्या आई'त आपण विषयांतर करीत आहोंत अशी श्यामला म्हणजेच पर्यायानें साने गुरुजींना जाणीव आहे असें दिसतें; परंतु भावनेच्या भरांत त्याला आळा घालणें त्यांना जमत नाहीं. ते आळा घालीत नाहींत. 'श्यामची आई' व 'श्याम' खंड एक व दोन हीं खरोखर स्मृतिपुस्तकें होत; परंतु श्री. लक्ष्मीबाई टिळक यांचें 'स्मृतिचित्रें' व दुसरें कै. वा. म.

जोशी याचें ‘ स्मृतिलहरी ’ या पुस्तकांतील कथनाची कलात्मक दृष्टि माझ्या मतें जास्त आकर्षक वाटते. कारण त्यात भरपूर विनोद असून विषयातरें मात्र पूर्ण गाळली आहेत.

सानेगुरुजींच्या कादंबऱ्याची सुरुवात बहुशः कधींहि आकर्षक अशी नसते. ‘गोड शेवट’ या कादंबरीची सुरुवात एरंडोलवर एक भारदस्त निबंध लिहून झालेली आहे. ‘गोड शेवट’ जर प्रा. फडक्यासारख्या तंत्र-विशारदाने लिहिली असती, तर ‘ गुणा व इंदू यांची भेट ’ या गोड प्रसंगानेच तिची सुरुवात झाली असती ! ‘पुनर्जन्मात’ गोविंदराव आनंदीचा हात धरतो, अशाच आकर्षक प्रसंगाने त्या लेखकाने सुरुवात केली असती व नंतर गोविंदराव व आनंदी याची वाचकाना त्याने ओळख करून दिली असती. त्यामुळे कथेंत जिज्ञासा निर्माण करून ती तशीच टिकवितांहि आली असती. ‘ क्राति ’मध्ये कथानायक रामदास याची ओळख दुसऱ्या प्रकरणात होते, तर नायिकेची ओळख ६२ पृष्ठें उलटून गेल्यानंतर होते. पहिल्या प्रकरणात [illegible] येऊन एकदम अदृश्य झालेले संन्यासी मुकुंदरावच, हे कादंबरी सपता संपता लक्षात येते ! पहिल्या प्रकरणात आलेली मीना जी एकदम दडी मारते, ती शेवटी प्रकट होते ! कथानायक रामदास खरा, प्रण कथेचा प्राण मुकुंदरावच.

गुरुजींच्या कादंबऱ्या वाचल्यानंतर त्याच्या गाढ्या विद्वत्तेची साक्ष पटते. त्यांनी खूप वाचले असून खूप विचार केलेला आहे. त्यानी रामायण, महा-भारत, उपनिषद्वाङ्मय इत्यादि सर्व ग्रंथाचा अभ्यास केलेला आहे. अगस्ति ऋषीच्या तोंडी घातलेली भाषा ह्या विधानाची साक्ष देते. “असतो मा सद् गमय । तमसो मा ज्योतिर्गमय । मृत्यो मा अमृत गमय । ” वसिष्ठ वरुणदेवास प्रार्थना करताना म्हणतात, “ आस्ते ज्यायान् कनीयस उपारे ।” पतजलीच्या भाष्यातला, “ एकः शब्दःसम्यक ज्ञातःस्वर्गे लोके कामधुक् भवति । ” असा उल्लेख आहे. बुद्ध तत्त्वज्ञानाचें व बुद्धाच्या गोष्टीचेहि त्यानीं अध्ययन केलेले आहे. तदनतर आपल्या मराठीतील उपनिषदें म्हणून ज्यास म्हणतात त्या कहाण्याहि त्यांनीं अभ्यासिल्या आहेत. कहाण्याचा त्यांच्या लेखन शैलीवर स्पष्ट असा परिणाम झालेला दिसतो. त्यांचा तुका-रामाचाहि व्यासंग चांगलाच आहे. कारण अनेक ठिकाणीं तुकारामाचे

अभंग समर्पकपणे आलेले आहेत. 'क्रातींत' मुकुंदराव म्हणतातः " रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसग । अंतर्बाह्य जग आणि मन," " सत्या असत्याही मन केले ग्वाही " इत्यादि. आधुनिक कालाकडे पाहिले तर त्यांनीं रामकृष्ण परमहस व स्वामी विवेकानंद याचेहि विचार आत्मसात केलेले दिसतात आणि तसे उल्लेखहि वारंवार येतात. बंगालमधील बकिमचंद्र व रवींद्रनाथ ठाकूर याचाहि उल्लेख अनेकदां आलेला आहे. बकिमचंद्राच्या 'साम्य' पुस्तकाचा उल्लेख पुष्कळ ठिकाणीं येतो, तर ठाकूराच्या 'गीतांजली'चा छाप त्यांच्या कादंबऱ्यावर आहे. विनोबाजी भावे याच्या गीताईचा उल्लेख 'श्याम,' 'श्यामची आई' यांत केलेला आहे. महात्मा गाधींच्या थोर आचार-विचाराचा परिपाक तर त्याच्या सर्व कादंबऱ्यातून दिसून येतो. त्याच्या आश्रमाच्या कल्पना सर्व कादंबऱ्यातून विस्ताराने विखुरलेल्या दिसतात. श्यामच्या बालपणच्या आठवणी व महर्षि धोंडो केशव कर्वे यानी लिहिलेल्या आठवणी तुलना करून पाहण्यासारख्या आहेत. पाश्चात्य विभूतीत लेनिन व स्टॅलिन याचे तत्त्वज्ञान त्यांनीं रोमरोमात भिनवून घेतलें आहे. 'क्रांति' कादंबरी या दृष्टीनें उल्लेखनीय आहे. इग्लंडमधील कित्येक ग्रंथकार त्यानीं अभ्यासिले आहेत. कित्येकाच्या पुस्तकाची भाषांतरे, वा रूपातरें त्यांनी कादंबरीस्वरूपात केलेलीं आहेत. त्याचा विशेष असा कीं त्यांनीं वाड्मयचौर्य केलेले नाहीं. थोर ग्रंथकारांचें ऋण मात्र वेळोवेळीं मानलेले आहे.

साने गुरुजींनीं आपल्या विद्वत्तेच्या जोरावर जुनीं रूपकें बुद्धीला पटतील अशा तऱ्हेनें सोप्या व सरळ भाषेत समजावून दिलीं आहेत.

त्यांनीं केलेलें नरकासुर, लिंगपूजा, दशावतार, दक्षिणेवरील तुळशीपत्र, देवाची पानांनीं पूजा करणे, यांचे केलेले स्पष्टीकरण वाचण्यासारखे आहे. त्यांचा आणखी स्पष्टपणे दिसून येणारा विशष म्हणजे ते जातील तेथें प्रेम करतात. सान्यांच्या मातेनें त्यांना प्रेमाचे बाळकडूच तसे पाजिलें आहे. ते माणसांवर, पशूंवर, पक्ष्यावर, सर्वांवर प्रेम करतात. खान्देशावर तर त्याचें अमर्याद प्रेम आणि ते प्रेम त्यांनीं 'गोड शेवट' मध्यें अमर करून ठेविलें आहे. अंमळनेरला राहून त्यांनीं शेतकरी व मजूर यांची बलशाली संघटना

केली. हा त्यांच्या जीवितकार्याचा एक भाग होय. लोकांना सन्मार्ग दाखविणें, त्यांच्या भावना पवित्र करणें, त्याना त्यागाचे शिक्षण देणें हेंहि जीवितकार्याचे ध्येय त्यांच्या कादंबऱ्यातून प्रतीत झाल्यावाचून राहत नाहीं. त्याच्या कादंबऱ्यावरून पाहता, त्याना स्वतःला आपले जीवन अधिक निर्दोष व अधिक निर्मल व्हावे, असे वाटत असले पाहिजे.

गुरुजींनीं कादंबरीवाङ्मय केवळ कलाविलासासाठीं लिहिले नसून तत्त्व-प्रचारासाठी लिहिले आहे. देशाला आग लागली असताना कला, आनंद, विनोद यात साऱ्या राष्ट्राने रममाण व्हावे हे त्याना मान्य नाही. ते मनाशी तत्त्व ठरवितात व त्याच्या विस्तारासाठीं त्याच्याभोंवतीं जसें जमेल तसे कथानक गुंफीत जातात. केवळ कथेसाठीं कथा, मनोरंजनासाठी कथा असे त्यानी केले नाही. तत्त्वचिंतन हा त्याच्या कादंबऱ्यातील विशेष असे सागता येईल. 'आस्तिक'मध्ये वेळींअवेळी नाग व आर्य याच्याबद्दल चर्चा आलेली आहे. परीक्षिती नदीवर स्नानास जातो तेथेंही तत्त्वचर्चाच करतो. वत्सलेला डोहाळे होतात ते देखील आर्य व नाग यांच्या प्रेमाबद्दलच. आस्तिक ऋषि लहान बालकाबरोबर भाकरीचा खेळ खेळतात, तेथें देखील तत्त्वज्ञानच येतें. परीक्षितीला आश्रम दाखवितांना देखील तत्त्वज्ञानच येते. थोडक्यांत, तत्त्वप्रतिपादनासाठी सान्यानीं कथानकास राबवून घेतलें आहे. प्रचारकी कथा असे त्यांच्या कादंबऱ्यांचें स्वरूप दिसतें. सद्धर्माचा प्रचार, श्रमणाऱ्यांसाठीं प्रचार, मातृप्रेमाचा प्रचारच सर्वत्र दिसतो. प्रचार–प्रवचनें –गाणीं ही त्यांच्या कथाची खूण होय.

साने गुरुजींनीं गायिलेल्या शुद्ध व दिव्य प्रेमाच्या महतीचा थोडा विस्तारानें येथें विचार करणे प्रस्तुत ठरतें. पुत्रप्रेमासाठी पिता आपलीं तत्त्वें व अहंकार सोडतांना दिसतो, हे बुधाच्या पित्याच्या उदाहरणावरून दिसतें. पुत्रप्रेमासाठीं माता अतुल त्याग करतांना 'श्यामच्या आई'त दाखविलें आहे. पति व पत्नी हें नातें गुरुजींनीं अत्यंत पवित्र मानलें आहे. पतीच्या समाधानांत पत्नीचें समाधान असावें व पतीच्या मार्गात पत्नीनें अडथळा न आणतां शक्य तेवढी पतीला मदतच करावी असें त्यांना वाटतें. इंदिरा लग्न लागतांच पतिमय होते, पतीचे विचार तिला आदरणीय वाटतात.

श्यामची आई व त्याचे वडील यांचेंही उदाहरण असेंच देतां येईल. विवाहानंतर पतिपत्नींना स्वतंत्र अस्तित्वच उरत नाहीं, दोघेहि एकमेकांत विलीन होतात, हा हिंदु संस्कृतीचा विशेष सान्यांनीं चांगल्या रीतीनें प्रतिपादिला आहे. त्यानी चर्चिलेल्या पतिपत्नी-प्रेमात वैषयिकता नाहीं. नागानंद–वत्सला, कार्तिक–कृष्णी यांना तर प्रेमाचे चाळे करावयास वेळच नाहीं. परंतु भाऊसाहेब व आनंदी या जोडप्याच्या प्रेमांतहि वैषयिकता दिसत नाहीं. गब्बूशेट व सरला, रामभटजी व सरला यांच्या संवादांत विषयलौल्य मनावर ठसण्याऐवजीं त्याच्याबद्दल घृणाच निर्माण होते. 'श्यामच्या आई'त तर दिव्य प्रेमाचा सर्वत्र वर्षाव आहे.

त्याग व सेवा हीं तत्त्वे गुरुजींनी अनेक तऱ्हांनीं सजवून मांडिलीं आहेत. नागानद–वत्सला, आस्तिक आदि मंडळी आर्य व नाग यांच्या एकीसाठीं वाटेल त्या त्यागास तयार होतात; देहदंड सोसतात व कायाहोम करावयास सिद्ध होतात. बुधा मधुरीसाठीं कमालीचा त्याग करतो. त्याचप्रमाणें मातृभूसाठीं सर्वस्वाचा त्याग व बलिदान करणारीं पात्रें तर अनंत वावरताना दिसतात. मातृभूची सेवा, मजुराची सेवा, शेतकऱ्यांची सेवा यांच्याबद्दल तर अनेक ठिकाणीं प्रतिपादन केलें आहे. सेवा करीत असतांना त्यांना उच्चनीच भेद माहित नाहीं. हरिजनांच्या वस्तींत मलमूत्र काढण्यांत देखील स्वामी कमीपणा मानीत नाहींत.

क्रांतीचा फार मोठा संदेश गुरुजींनीं दिला आहे. क्रांति म्हणजे मूल्यपरिवर्तन. शेतकरी व सावकार; मालक व मजूर; उच्चवर्णीय व दलित यांच्यासंबंधांत क्रांति झाली पाहिजे. शेतकऱ्यांनीं कष्टानें पिकविलेली शेती, त्यांनीं कष्टानें काढलेलें पीक याचा उपयोग प्रथम त्यांना सुखासमाधानानें करून घेतां आला पाहिजे. सावकार, श्रीमंत वा कारखानदार मजुरांच्या रक्तावर वाढतात, हा अन्याय नष्ट करणें म्हणजेच क्रांति; संपत्तीची समसमान वांटणी झाली पाहिजे; दुःख, अन्याय, यातना, विषमता यांच्याविरुद्ध बंड म्हणजेच क्रांति; आजची समाजपद्धति चुकीची आहे, तीच मूलतः बदलली पाहिजे. या सर्वांचें सार, या सर्वांचें मूलतत्त्व म्हणजेच त्यांच्यामतें 'क्रांति.' त्यांच्या मते क्रांति ही नवीन राष्ट्रधर्मासाठीं करावी लागेल. लाखों कुटुंबांची

दैना दूर करावयाची असेल, तर सारी समाजरचना बदलावी लागेल. माणसाची किंमत वाढवावी लागेल. माणुसकीचा धर्म आणावा लगेल. खोटे धर्म बुडवावे लागतील. सारे दंभ जाळावे लागतील. ज्या दिवशी जगांतील एकूण एक मनुष्याला पोटभर अन्न, अंगभर वस्त्र व राहावयास घर मिळून स्वाभिमानानें जगता येईल तोच नवीन राष्ट्रधर्मांचा उषःकाल होय. ह्या नवीन राष्ट्रधर्मात श्रमणाऱ्याची शेती व मजुराचे कारखाने होतील. भिन्नजातीय व भिन्नधर्मीय लोक या भरतभूमध्ये एकमेकास आपल्या संस्कृतीचें दान करून मोठ्या गुण्यागोविंदाने नांदतील. अनेक संस्कृतींचे ऐक्य होईल. बंगालची मुलगी व महाराष्ट्राचा मुलगा किंवा महाराष्ट्राची मुलगी व बंगालचा मुलगा यांचा विवाह होऊन संकुचित प्रांताभिमान नष्ट होईल व सर्वत्र माणुसकीचा उदोउदो होईल. श्रीमंतानी मिळविलेला पैसा हा गरिबांचाच होय असे त्यांचे मत आहे. 'क्रांति' मधील मिनी जेव्हा एका श्रीमंताकडून दहा हजार रुपये आणते तेव्हा ती म्हणते, " श्रीमंताचे हे पैसे गरिबाचेच होत. गरिबानी ते खुशाल घ्यावे " दुसऱ्याच्या श्रमावर जगण्याचा अगर धनदौलत करावयाचा त्याच्या मते कोणासच अधिकार पोहोचत नाही. या तत्त्वाला अनुसरूनच त्याचे शेतकऱ्यावर व मजुरांवर अपरंपार असें प्रेम आहे व तें त्यांनी प्रत्येक कादंबरीत निःसंकोचपणे दिग्दर्शित केलें आहे. हें प्रेम 'तीन मुलें,' 'गोड शेवट,' 'क्रांति,' 'पुनर्जन्म' ह्या कादंबऱ्यांतून विशेष तऱ्हेने दिसून येते. एके ठिकाणी मजूरमहिमा वर्णन करतांना ते लिहितात, " जगांत मजूर नसतील तर तुमची शेती कोण पिकवील ? तुम्हांस अन्न, वस्त्र, दूध, तूप कोठून मिळेल ? मजुराचा घाम म्हणजे जगाचे जीवन. मजूर जगाची नाडी, जगाचीं फुप्फुसे होत. त्यांना मान द्या. त्यांचा गौरव करा."

देशाची सेवा करावयास बाहेर पडणाऱ्या तरुणास साने सांगतात, "हिंदुस्थानभर प्रवास कर. निरनिराळे आश्रम पाहा. रामकृष्ण परमहंसांच्या शिष्यांनीं चालविलेल्या संस्था पाहा. गुरुकुलें पाहा. ग्रामोद्योगाच्या संस्था पाहा. खादी केंद्रास भेट दे. कानपूर, कलकत्ता येथील मजूर संघटनांचा अभ्यास कर–बिहारमधील किसानसंघटना पहा. शेतकऱ्यांच्या जीवनांत शीर. रोज जगन्नियंत्याची प्रार्थना कर. ध्येयवेडा हो. हातीं घेशील त्यांचें वेड लागू

दे. कारण ध्येयवेडीं माणसें दिव्यासारखी असतात. तीं जातील तेथें प्रकाश देतात. एका दिव्यावर दुसरा दिवा लावावा, त्याप्रमाणें तीं माणसे दुसऱ्यातही ध्येयवादित्व निर्माण करतात. तसा तूं हो. मग हवी ती देशहित-कारक चळवळ हातीं घे. त्यांत यश ठेवलेलेंच आहे. ”

आधुनिक कादंबरीकारात गुरुजींचे स्थान कोणतें याचा थोडक्यात विचार करावयाचा म्हटल्यास कादंबरीकारात तंत्रप्रधान व मंत्रप्रधान असे दोन गट करावे लागतात. पहिल्या गटात फडके, खाडेकर, माडखोलकरादि कादंबरीकार येतील, तर दुसऱ्या गटात कै. वा. म. जोशी, ना. ह. आपटे, कै. डॉ. केतकर, य. गो. जोशी इत्यादि कादंबरीकार येतील आपले विचार सरळ व सोप्या भाषेत मांडून वाचकाच्या सदभिरुचीस आवाहन करून आपला प्रधान विषय कथानकाच्या द्वारा सांगावयाचा हा मंत्रप्रधान कादं-बरीकाराचा कादंबरीलेखनाचा प्रधान हेतु. सानेगुरुजीही याच प्रकारांत सामावतील.

कै. वा. म. जोशी हे या विभागात प्रामुख्यानें विहार करताना दिसतात. त्यानीं अनेक सामाजिक प्रश्न कादंबरीद्वारां चर्चिले आहेत. त्याचे लिखाणहि तर्कशुद्ध व बुद्धीला आवाहन करणारे, हृदयाला नाजुक अशा सात्विक गुदगुल्या करणारे व क्वचित् रडविणारेहि आहे. श्री. ना. ह. आपटे यांच्या कादंबऱ्यातून हास्य, करुण, वीरादि रसप्रकर्ष दिसूनहि तत्त्वचिकित्सा व मनोरंजन आहे. तळमळ तर आहेच आहे. कै. डॉ. केतकरांनीं तर समा-जाचें शक्य तेवढें व्यापक स्वरूप दाखविलें आहे. त्यानीं समाजाला धक्के दिले आहेत. त्यानीं सुशिक्षिताना आपल्या नीति-अनीतिविषयक कल्पनांचा आणि भावनांचा फेरविचार करावयास लाविलें. श्री. य. गो. जोशी यानीं कलेला गौणपणा देऊनच लिखाण केलेलें आहे. त्यांनी एके ठिकाणीं म्हटलें आहे, कीं; “ ‘ग्यानबा तुकाराम. ’ यात कला कोठें आहे ? पण तें कानाला गोड लागतेंच ना ? त्यात लोक रंगतात ना ? ” जोशीबुवांच्या लिखाणांत विनोद, बालबोध भाषा व हिंदु संस्कृतीच्या सुरम्य चित्राचें दर्शन होतें.

वरील लेखकांत व साने यांच्यांत कादंबरीलेखनाच्या एकंदर तंत्राबद्दल साम्य असलें, ते मंत्राकडेच केवळ लक्ष पुरवीत असले, तरी सान्यांनीं प्रति-

पादिलेले विषय या सर्वांहून पुष्कळच भिन्न आहेत. साऱ्यांचे सर्वच विषय ह्यांनीं हाताळले आहेत असें म्हणतां येणार नाहीं. साऱ्यांचें क्षेत्र जास्त व्यापक आहे. गुरुजींनीं शेतकरी, मजूर व इतर गरीब जनता यांच्या जीवनात स्वतः शिरून, त्यांचे अनुभव स्वतः आत्मसात् करून ते कादंबऱ्यांतून मांडले आहेत. त्या अनुभवांना ध्येयात्मकतेची जोड दिल्यानें ते विशेष खुलून दिसतात. आपटे, जोशी किंवा केतकर हे मध्यमवर्गाचे कादंबरीकार आहेत, तर साने 'तेल्यातांबोळ्यांचे,' साऱ्या जनताजनार्दनाचे कादंबरीकार आहेत. या त्यांच्या वैशिष्ट्यामुळेंच ते प्रचारप्रधान कादंबरीकारांत श्रेष्ठ ठरतात. समाजातील हीन, दीन लोकांच्या दुःखाला त्यांनीं वाचा फोडिली. त्यात राजकारण, समाजकारण, धर्मकारण हे विषय आले नाहींत तर ते वाङ्मय साऱ्याचे कसे? पुनर्विवाह, परित्यक्ता, प्रौढ, कुमारी, यशवंती विवाह ह्या विषयापेक्षा त्याचे विषय व्यापक स्वरूपाचे आहेत. पारतंत्र्यांत पडलेल्या भरतभूचे दीनवाणे चित्र सर्वांसमोर उभे करून दगडालाहि पाझर फोडील अशा वाक्सामर्थ्यानें त्यानी सर्वांची हृदये हलविलीं. ज्या समाजाची चित्रे त्यानी चितारलीं आहेत तोच समाज मोठा आहे. अफाट आहे तो समाज. त्याच्या सुखदुःखाची चित्रे रेखाहून जागृति करणाऱ्या ह्या लेखकाला बहुजनसमाजाचा लेखक असे म्हटलें तर काय हरकत आहे! साने बहुजनसमाजाचे आहेत, बहुजनसमाजाचेच लेखक आहेत.

त्याच्या कथासंभाराकडे साकल्यानें पाहिले म्हणजे पुनः पुन्हां म्हणावेंसें वाटते की ते 'राष्ट्रीय कीर्तनकार' आहेत. कीर्तनकार प्रथम पूर्व रंगांत एखाद्या संताचा अभंग घेतो व त्यावरून परमेश्वराच्या गुणांचें गान करतो, संसाराची विफलता दाखवितो व नंतर उत्तररंगांत एखादें आख्यान लावतो. त्या आख्यानांतहि संधि सापडेल तेथें पूर्वरंगांतील तत्त्वाचें स्पष्टीकरणच करतो. आख्यान करमणुकीसाठीं असलें, तरी करमणूक हें कांहीं कीर्तनकाराचें ध्येय नव्हे. लोकजागृति हें त्याचें ध्येय असतें.

सानेगुरुजी यांचें अगदीं असेंच आहे. ते जें कांहीं कथन करतात, त्यामागील हेतु लोकजागृति हाच असतो. त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांतून वारंवार श्रीमंत, गरीब, शेतकरी–सावकार, मजूर–मालक, उच्च–नीच इत्यादि

द्वंद्वांची चर्चा केली आहे. संधि सापडेल तेथें ते शेतकऱ्यांच्या हलाखीबद्दल, मजुरांच्या दैन्याबद्दल प्रवचनें देत असताना दिसतात. कीर्तनकार मधून मधून ज्याप्रमाणें गाणीं म्हणत असतो, त्याप्रमाणें सान्यांच्या कादंबऱ्यातूनहि गाणीं पेरलेलीं आहेत. तीं गाणीं अर्थात् राष्ट्रप्रेमाने ओथंबलेलीं असतात. आणि म्हणूनच माझ्या मतें सानेगुरुजी हे आपले सद्विचार मातृभूच्या उद्धारार्थ प्रामाणिकपणें व कळकळीनें महाराष्ट्र-वाचकांसमोर मांडणारे एक ' राष्ट्रीय कीर्तनकार ' होत.

---

## साने गुरुजींचीं नाटकें

नाटककार म्हणून सानेगुरुजी महाराष्ट्राला माहित नाहींत. ते नाटककार म्हणून गाजलेले नाहींत. लहान मुलाचे सोबती, तरुणाचे पुढारी, मजुराचे व राष्ट्रीय सभेचे कळकळीचे कार्यकर्ते, एक निष्ठावंत व आदर्श हळवे सैनिक या विविध बैठकींवरून गुरुजींच्या लेखणीचा संचार महाराष्ट्रातून होत आहे. ते नाटककार म्हणून गाजले गेल्याऐवजीं वाचले गेले आहेत मात्र भरपूर ! त्यांच्या तीन नाटकापैकीं 'ते आपलें घर' या पुस्तकाची तर दुसरी आवृत्तीहि संपत आली असावी. ' अस्पृश्योद्धार ' हें त्यांचें छोटें नाटक आज असेंच दुर्मिळ होऊन बसलें आहे. मॅारिस मॅटर्लिंक याच्या ' निळा पक्षी ' या अनुवादित नाटकाचेहि पुनर्मुद्रण झालें आहे.

' तें आपलें घर ' ही छोटी नाटिका हरिजनाच्या, अंमळनेर येथें ते स्वतः कांहीं वर्षांपूर्वी प्रसिद्ध करीत असलेल्या 'कॅाग्रेस' पत्राच्या व अंमळनेर येथील प्रकाशमण्डळाच्या मदतीसाठीं अंमळनेरच्या आणि इतर अनेक ठिकाणच्या विद्यार्थ्यांनीं मिळून चारपांचदां केली होती, एवढेंच. गांवोगांव आपली बैठक मांडून नाटकांचे शेंकडोंवारी प्रयोग करणाऱ्या नाटक मंडळ्यांनीं गुरुजींचीं नाटकें अजून करून दाखविलीं नाहींत आणि या एवढ्याच अर्थानें हें नम्रपणें सुचवावेंसें वाटतें कीं, सानेगुरुजी हे गाजलेले नाटककार नाहींत. परंतु त्यांची प्रभा महाराष्ट्रांतच काय, परंतु साऱ्या भरतखंडांत आज

पसरली आहे. खरोखर ते आपल्या त्यागाने तळपत आहेत, आपल्या सोज्ज्वल व निरहंकारी लेखणीनें एक फार मोठे राष्ट्रकार्य ते आज करीत आहेत. नव्या पिढीला व यापुढे होऊं घातलेल्या पिढीला ते स्वाभिमानाचे राष्ट्रीय वेदपाठ देत आहेत. अशा या विराट कार्यात त्यानी नाटकासारख्या लोकप्रिय वाङ्मयप्रकाराचा अजूनपर्यंत वैपुल्याने अवलंब का केला नाही, याबद्दल पुनः पुनः आश्चर्य वाटते. अर्थात् कलावानाने असे का केले नाही, अगर तसे का केले नाही हे म्हणणे काही सीमेपर्यंत योग्य नाही. सूर्याचा प्रकाश सर्वत्र पोहोचतो, तद्वत् कलावानहि उघड्या डोळ्यानी सामाजिक, राजकीय व धार्मिक प्रश्नाकडे पाहत असतो व त्याचेच चित्रण तो आपल्या वाङ्मयात सहानुभूतीने करीत असतो. सानेगुरुजी हे सर्व करतात; परंतु त्यानी हाताळलेल्या विविध वाङ्मयप्रकारात नाटकाला आतापर्यंत तरी गौण स्थान मिळाले आहे, हे खरे. बालकाशी हितगुज करणे, त्याना स्वाभिमानाची शिकवण देताना अनंत गोड गोष्टीचा मेवा आपल्या पुढ्यातून काढून त्यांच्यापुढे वाढणे, राष्ट्रदीपक थोर थोर पुरुषार्चा चरित्रे गोष्टीरूपाने रसाळ व हळव्या भाषेत सागणे, आयाबहिणीची गोड गाणी एकत्रित करून ती घरोघर जात्यावर पोहोचती करणे; त्याचप्रमाणे आपल्या धर्मात जे जें उदात्त, उच्च नि भव्य असेल, त्याची पूजा करून ते आपल्या लाडक्याना देणे किंवा परद्वीपस्थाचे भव्य व उदात्त विचार मातृभूमीत मायबोलीत आणून मोडणे ही महत्त्वाची कामगिरी करीत असताना त्यानी लघुकथा, कादंबरी, काव्य, दीर्घकथा, कहाण्या अगर चरित्र इत्यादि वाङ्मयप्रकाराचा जितका भरपूर उपयोग करून घेतलेला दिसतो, तितका नाटकाचा नाही.

तसें पाहिलें तर 'नाटक' हा ललित वाङ्मयात अत्यंत महत्त्वाचा प्रकार आहे. हजारो लोकाच्या अंतःकरणाची पकड एकदम व एकाच वेळी घेण्याची ताकद एकट्या नाटकातच आहे. लघुकथा काय किंवा कादंबरी काय, ही एकाच वेळीं एकालाच वाचतां येते. तसे नाटकाचे नाही. बहुजनसमाजाचें चित्र बहुजनसमाजापुढें एकाच वेळी दृश्य व श्राव्य होणें हे अत्यंत महत्त्वाचें कार्य नव्हे काय ? ते कार्य नाटक करीत असते. कादंबरी किंवा लघुकथा यांचें वाचन एकालाच जमते. त्यांचे बहुजनसमाजाकरिता वाचन झाले, तर

योग्य रसोत्पत्ति होणे अशक्य. शिवाय दृश्य होण्याची कला तर कादंबरी व लघुकथा यात पूर्णपणे अशक्य. ते सारे गुण नाट्यप्रकारालाच मिळतात. परत असल्या बहुजनसमाजाला आवाहन करणाऱ्या वाङ्मयप्रकाराचा गुरुजींनी वैपुल्याने उपयोग केलेला नाही.

याची कारणे अनंत असू शकतील. एक म्हणजे त्याचे अस्थिर स्थान. त्याना सामान्यतः भारताची व विशेषतः महाराष्ट्राची सेवा करावयाची असल्यामुळे एकादे नाटक लिहून मग त्याचा प्रयोग घडवून आणण्यासाठी त्याच नाटकाची सेवा करावयास वेळ कुठला मिळणार ? त्यापेक्षा एखादी कथा, कादंबरी किंवा एखादे चरित्र लिहून मोकळें होणे बरे. शिवाय नाटकाची अवधाने फार. ते जीवनाचे चित्र म्हटले तरी तें चित्र जनतेसमोर उभे करावयाचे म्हटलें म्हणजे पुष्कळ नाटक करावें लागते ! नाटक हें जीवनाचे प्रतिबिंब म्हटले तरी तें जनतेला दिसावे म्हणून मोठी मायानगरी उभारावी लागते ! ते सत्यचित्रण म्हटले तरी पडदे, दिवे, रंग, पात्रें, साज, अलंकार याकडे बारीकसारीक लक्ष देऊन एक मोठा आभास उभा करावा लागतो ! एवढा उद्योग करावयाला किंवा करवून घ्यावयाला त्याना वेळ आहे कोठे ? इतकी शांतता आहे कोठे ? इतकें स्थैर्य आहे कोठे ? जेथें जमेल तेथे, जो कागद असेल तो, जी लेखणी असेल ती या सामुग्रीवर व मुळातल्या अपरंपार भांडवलावर ते स्वतःला जें कांहीं सांगावयाचें असेल तें सांगून मोकळे होतात.

सानेगुरुजींनी लिहिलेल्या साहित्यांतील प्रत्येक वाक्यात त्यांना कांही तरी सांगावयाचें असते. त्यांचीं सारींच नाटकें हेतुप्रधान आहेत. 'कलेकरतांच कला' हें तत्त्व त्यांना अमान्य आहे. कांहीं तरी सांगावयाचें असल्याशिवाय लेखकानें आपली लेखणी झिजवूं नये असे त्याचे प्रांजल मत आहे. समाजातील जो महापुरुष आहे, त्याच्या ध्येयापाठोपाठ लेखकांनीं गेलें पाहिजे. लेखक हा राष्ट्राचा, समाजाचा सेवक बनला पाहिजे. **एकांडी शिलेदारी** त्यांना अमान्य आहे. त्याने स्वाभिमानाची पूजा करावयास हवी, गुलाम विषयलंपटाची नव्हे. त्यांच्या मतें, समाजांतील महापुरुषानें हरिजनसेवेचें ध्येय राष्ट्रासमोर ठेविलें, तर थोर कलावंतांनीं तें आपलेंसें करून घेतलें पाहिजे.

तीच गीते कवींनी गायिलीं पाहिजेत. त्याच कथा, कादंबऱ्या अगर लेख लेखकांनी लिहिले पाहिजेत. त्याच जीवनाची चित्रे नाटककारांनी रंगविली पाहिजेत. साऱ्या जनतेच्या अंतःकरणात त्याच उदार भावना लेखकानें जागृत केल्या पाहिजेत. हे महान् कार्य जर लेखकानी करावयाचे नाही, तर करावयाचे काय ? राष्ट्र त्यानीं उठवावयाचे नाही तर मग कोणी ? जागृति त्यानीं करावयाची नाही तर मग कोणी ? स्वातंत्र्याचे व समतेचे पाठ त्यानी शिकवावयाचे नाहीत, तर मग कोणी ? लेखकांनी हे काम टाकून केवळ कलाविलासापायी बहुत लिहून ठेवून त्या लिखाणाने जर स्वाभिमानाऐवजी दास्य, खऱ्या सुखाऐवजी कामुकता वाढेल व जनता स्वातंत्र्यविन्मुख होईल, तर ते लिखाण काय कामाचे ? राष्ट्राच्या गरजेला नाटकानी 'ओ' दिली पाहिजे. गुरुजींच्या 'ते आपले घर' व 'अस्पृश्योद्धार' या दोनहि नाट्य-सुमनात आपणास त्याचे हे तत्त्वज्ञान मुळाशी दिसून येते. हरिजनांच्या जीवनाचे विदारक चित्र 'अस्पृश्योद्धार' ह्या त्याच्या छोटेखानी नाटिकेंत दिसते. आपल्या उजव्या हाताने डाव्या हाताला दलित करावें हा प्रसंगच शोककारक. परंतु अशी दुःस्थिति आज भारतात आहे. याचकरितां गुरुजींचे प्राण तळमळत असलेले दिसतात.

'तें आपले घर' या नाटिकेंत वरील विचार अधिक प्रकर्षानें रंगविलेला दिसतो. हरिजनाचा उद्धार करणें हा एक सामाजिक तसाच राष्ट्रीय प्रश्न आहे. चाळीस कोटींतील आठ कोटी समाज दलित म्हणून राहावा हा एक जुलूम आहे. आजच्या समतेच्या काळात अस्पृश्यता हा हिंदुसमाजाला एक कलंक आहे. एक डाग आहे हा. तो डाग धुऊन काढणें व अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या जमातींना माणुसकीचे साधे हक्क देणें हे प्रत्येक हिंदुमात्राचे कर्तव्य ठरते. हें एक राष्ट्रीय कार्य असल्याकारणानेच कॉंग्रेसच्या कार्यक्रमात ह्या समाजसुधारणेचा महात्मा गांधींनीं अंतर्भाव केलेला आहे. आपला देश एकीच्या अभावीं प्रगति करूं शकत नाही, स्वतंत्र होऊं शकत नाहीं. स्पृश्य बांधव ज्या देवाचे दर्शन घेतात, त्याच देवावर श्रद्धा कायम ठेवून हरिजन बांधव हिंदु धर्मात टिकून राहिले, ह्याबद्दल त्यांचें ऋणी होऊन उलट त्यांना उच्च स्थान दिलें पाहिजे. गुरुजींच्या मतें, नवधर्मात स्पृश्यास्पृश्य

सारे एकत्र येतील, हिंदुमुसलमान प्रेमाने नाचतील व अशा रीतीने एकीचें मंगल वातावरण निर्माण करून आपल्या भारतमातेचे पारतंत्र्यातील दुःखाश्रु पुसून टाकतील. हरिजनाना माड्या हवेल्या नकोत, तर त्याना साध्या, स्वतंत्र व ज्यात सुखाने राहता येतील अशा झोपड्या पाहिजेत. त्याना त्याच्या मालकी हक्काचे शेत पाहिजे. स्वाभिमानाने श्रम करून राहता येण्यासारखे सुरक्षित जीवन हवे आहे. श्रमणाऱ्याचा हक्क आधी, श्रमणारा सर्वात पवित्र. जगात एकच वस्तु पवित्र आहे व ती म्हणजे श्रमणाऱ्याच्या कपाळावरील घाम. गंगागोदाचे पावित्र्य त्यात आहे. सारे शंकराचार्य त्या घामाच्या स्पर्शाने पवित्र होतील. सारे गादीवाले महाराज त्या घामाच्या स्पर्शाने उद्धरून जातील. शेकडो शेटजी भटजी आणि पांढरपेशे त्या पवित्र घर्मबिंदूंच्या स्पर्शाने मोक्षाचे अधिकारी होतील. झपाट्याने बदलणाऱ्या काळाची आशा हीच की, श्रमणाऱ्याला मान व वैभव लवकरच प्राप्त व्हावे. समतेचे व संघटनेचे गोड फळ म्हणजे स्वराज्य. त्यांत कोणी श्रीमंत नाहीं, कोणी गरीब नाहीं, कोणी स्पृश्य नाहीं, कोणी अस्पृश्य नाही. महारमांगांत जाणें, वावरणें म्हणजे माणसात वावरणे होय. कोपायमान होणे हेच अस्पृश्यतेचे लक्षण. परंतु जोंपर्यंत माणूस माणसाला दूर लोटीत आहे, तोंपर्यंत कोठले स्वराज्य ? स्वराज्यात हरिजनांना स्पृश्यलोक असेच वागविणार असतील, तर ते स्वराज्य काय किंमतीचे ? ज्या हरिजनाना स्पृश्य समाज दूर लोटतो आहे, तेच अत्यंत उच्च आहेत. भंग्याचे अत्यंत महत्त्वाचें काम करणारा मनुष्य साऱ्या समाजावर केवढे उपकार करीत असतो ! साऱ्या समाजाची तो आई. त्याचा स्पर्श म्हणजे पवित्र स्पर्श.

या कार्यांत रूढ धर्माच्या अभिमानी सनातन्याचा कसून विरोध दिसून आल्याशिवाय राहत नाही. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादि चातुर्वर्ण्यव्यवस्था जी अनादिकालापासून प्रस्थापित झाली आहे, ती जणुं काहीं विधिलिखितच होय, अशा समजुतीनें वागण्याची सनातनी लोकांची पद्धति असते. सनातन्यांचा तो धर्म राहिला नसून स्वभावधर्म झालेला आपण पाहतों.

'तें आपले घर' या नाटिकेंत समाजसुधारणेचें राष्ट्रीय कार्य करणारा 'राजा' दिसतो, तर सनातन्याचें हिडिस रूप घेतलेले 'दिनकरराव' आढळतात.

'शंकरराव' हें पात्र सारासार विचारानें वागणाऱ्या सोज्वळ समाजाचे प्रतीक असलें, तर राजाचे वडील गणपतराव हे नवधर्माचें व्रत धडाडीनें अंगीकारणारे वृद्ध गृहस्थ आहेत. त्याच्या मते, नामधारी सनातन्यानींच धर्म धुळीला नेला आहे. धर्म म्हणजे सत्य व न्याय. धर्म म्हणजे दुसऱ्याचे दु:ख दूर करण्यासाठीं तुरुंगांत जाणें, मरणे. धर्म म्हणजे दंभ नव्हे. थोर सनातन धर्माचीं खांडोळीं करणारे विषारी खलपुरुष म्हणजे सनातनीच होत. त्यांनीं महान् तेजस्वी संतांचे छळ केले, गीता–भागवताचा खरा आत्मा त्यांनींच जाळून टाकला. ते मानव नसून दानव होत, धर्मरक्षक नसून भक्षक होत; उपनिषदाचे पूजक नसून भंजक होत. अबलावर अत्याचार करणाऱ्या, अगर गरिबाच्या मुंड्या मुरगळणाऱ्या लोकाना सनातन धर्माच्या गप्पा मारताना पाहिल्यावर तळपायाची आग मस्तकाला जाणार नाही तर तो माणूसच नव्हे. नव्या धर्माची मुहूर्तमेढ रोंवावयाची म्हणजे छळास व निंदेस तयार असावयास हवें असते. गणपतराव, राजा, रामा यांनींहि असाच छळ सहन केला.

आजारी गणपतरावांचा देशभक्त मुलगा राजा आपला धाकटा भाऊ रामा यास वडिलाच्या सेवेस ठेवून १९३० सालच्या चळवळींत तुरुंगात जातो. रामजी महाराचें शेत त्याला परत देऊन, त्याच्याशीं माणुसकीनें व सलोख्यानें वागण्याचें पाप ह्या पितापुत्रांनीं केलें (!) म्हणून दिनकररावांच्या –ह्या नरराक्षसाच्या–सनातनी धर्माला म्हणे आग लागते! तो हरएक प्रयत्नाने राजाच्या पश्चात् गणपतरावाला घराबाहेर काढतो, वाळींत टाकतो व देशोधडीस लावतो. राजाचे एक डॉक्टर मित्र असतात. त्यांच्याकडे गणपतराव व रामा जातात. मध्यंतरीं राजाची सुटका होते. त्याचें व्याख्यान त्याच्याच खेड्यांत होते व दिनकरराव सूडबुद्धीनें राजावर दगडांचा मारा करून त्यास घायाळ करतो. डॉक्टर, गणपतराव व रामा येतात. गोपाळ ह्या एका तुरुगातील मित्राच्या भेटीनें राजा शुद्धीवर येतो. दिनकररावाला निसर्ग प्रायश्चित देतो–त्याच्या अंगाची मंबाजीतुंबाजीसारखी लाही लाही होते. राजानें त्यांना क्षमा केल्यावर त्यांचा हृदयपालट होतो. ते उत्कृष्ट कार्यकर्ते होतात व राजानेंच चालविलेल्या 'सेवाधाम' ह्या संस्थेंत त्याच

खेड्यात श्रमजीवि अस्पृश्यांचा उद्धार करण्याकरिता मोठ्या आनंदानें सामील होतात.

गणपतरावाना स्वतःचे घर नसते व राजाच्या देशभक्तीच्या व्यवसायानें तें करणें त्याना अशक्य झालेले असते. ते मनांतल्या मनात केवढाल्या आशा खेळवीत होते! लहानसे घर, छोटीशी बाग, गाय–वासरूं, राजाचे लग्न झालेले आहे, घरात सून नादते आहे, बाळ रागते आहे, अशीं स्वप्ने ते रगवीत होते. त्याच्या सान्या आशा राजाच्या राष्ट्रभक्तीच्या निश्चयाने मातींत जाणार होत्या. परंतु त्यानी मन घट्ट केलें. ते त्याच्या ध्येयवादाच्या आड आले नाहीत. त्यानी त्याचे पाय न ओढता त्याला हात दिला आणि म्हणूनच अखेर त्याच्या मातीत गेलेल्या आशातून 'सेवाधाम' सारखें भव्य मंदिर उभारले गेलेले त्याना दिसले. 'सेवाधाम' ही संस्था म्हणजे त्याचे घर. राजा म्हणतो, "श्रमणारा मजूर जेथें राहतो, ते आपले घर. जेथे जेथे दास्य, दुःख, दैन्य आहे, तेथे आपण जाऊं. तेथे राहू. तेथे आपलें घर. तेथें आपण प्रकाश नेऊं, आनंद नेऊं, सहानुभूति, सेवा नेऊ. प्रेमानें पृथ्वी करूं, आपल्या बंधुभगिनीच्या हृदयात आपण प्रेममंदिर बाधूं. त्या प्रेम-मंदिरांत वसति करूं. सेवेने दुसऱ्याच्या हृदयात जे प्रेममंदिर आपण बांधूं, तें भूकंपात पडणार नाहीं, पावसात कोसळणार नाहीं. घरातून आपणास कोणी काढणार नाहीं, ते घर जप्त होणार नाहीं. असे ते प्रेममंदिर म्हणजे आपलें घर. बाबा, ते आपले घर."

स्वतः गुरुजीच्या घराची व्याख्या याहून निराळी नाही. स्वतः त्याचे तरी घर कोठें आहे? कोठेच नाही व सर्वत्र आहे! ते जातील, सेवा कर-तील तेथेंच त्यांचें घर. सारे विश्व त्यांचें घर. विश्वप्रेमाने ओथंबलेली घराची अशी व्याख्या सान्या मराठी वाङ्‌मयांत कोठें सापडणार नाहीं.

'राजा' या पात्राच्या मुखाने या नाटिकेंत प्रत्यक्ष गुरुजीच बोलत अस-लेले आपणांस दिसतात. एका राष्ट्रसैनिकाचा आदर्श या पात्राच्या रूपानें त्यांनीं महाराष्ट्रवाचकांपुढे ठेवला आहे. राजा आपल्या वडिलांना म्हणतो, हिंदुस्थानातील लाखों लोकांना घर नाहीं हा विचार जर तुमच्या मनांत जागृत होईल, तर स्वतःचें घर नाहीं याचें दुःख तुम्हांला वाटणार नाही.

मोठमोठे पुढारी तुरुंगात मोटा ओढीत असताना त्याला घरी कसे बसवेल ? लग्न कसे करवेल ? घर कसे करवेल ? त्याला भारताचे भव्य मंदिर उभारण्याची तळमळ लागलेली असते. हरिजनांना होणाऱ्या अन्यायाचे शल्य त्याच्या कोमल हृदयाला टोचत असते. दलितवर्गाच्या भव्य सेवेने त्याचे शिर नमते. हरिजनाना मदत, स्वच्छता,साक्षरता, खादीधारण वगैरे महात्माजीच्या विधायक कार्यक्रमाचा तो पुरस्कार करतो महात्माजीच्या हृदयाच्या वेदनानीं त्याचे हृदय विव्हळते. कोणत्याही त्यागाला त्याची तयारी असते, तो ध्येयवादी तरुण असतो. त्याला जनतेची सेवा करावयाची असते. त्याच्या हृदयात सहानुभूतीच्या व प्रेमाच्या पायावर त्याला खरे आनंदमय घर बाधावयाचे असते, म्हणून 'सेवाधाम' सारखा तो आश्रम काढतो. नुसता आश्रम काढून तो स्वस्थ बसत नाही, तर आपल्या कार्याचा प्रचार व प्रसार व्हावा ह्या महत्त्वाच्या कार्यासाठी त्याला वर्तमानपत्र काढावेसे वाटते. परत भिडस्त इतका की, त्याला त्याकरिता दुसऱ्याजवळ पैसे मात्र मुळींच मागवत नाहीत. आपल्या विशाल प्रेमाने दिनकररावासारखे शत्रु तो आपलेसेच करतो असें नव्हे, तर आपले शिष्य करतो ! प्रेमाने, अहिंसेने तें सर्व तो साधतो. या सर्व स्वभावात गुरुजींचेच चित्र, त्याच्या १९३० सालातील आशा, आकाक्षा आपणास दिसत नाहीत काय ? आणि तीच सारी ध्येये त्यानी तरुण पिढीपुढे माडली आहेत.

महात्माजीसारख्या महापुरुषाचे तत्त्वज्ञान आबालवृद्धापर्यंत, खेड्यापाड्यातून पोहोचविण्याचे राष्ट्रीय कार्य ह्या छोटेखानी नाटिकेंत गुरुजींनीं केले आहे. खलपुरुषांचा हृदयपालट हा या नाटिकेचा आत्मा आहे. महात्मा गाधीच्या तत्त्वज्ञानाचा तो एक आदेश आहे.

'राजा' या नाटकानंतर त्याचे वडील गणपतराव यांचें पात्र त्यागी बापाचें प्रतीक म्हणून लक्षात राहण्यासारखें आहे. हा थकलाभागलेला म्हातारा. मुलाने नोकरी करावी व एक चागलेंसें घर करून संसार करावा ही इच्छा; परंतु मुलाच्या राष्ट्रसेवेच्या ध्येयाआड तो आला नाहीं. जुन्या पिढींतील पुरोगामी वृद्ध असें थोडक्यांत गणपतरावाचें वर्णन करतां येईल. त्याचे विचारही तितकेच जहाल आहेत. " देवावर अभिषेक करणारे लोकांना रडवतात. ब्राह्मणभोजनें घालणारे हरिजनांना लाथा मारतात." राबाच्या

व्याख्यानाला देवळात अडथळा आल्यावर त्यानें महारवाड्यात जाऊन आपल्याला काय सागावयाचें होतें ते सागितलें. तिकडे जाण्यास गणपतराव उठल्यावर दिनकररावादि सनातन्यानी म्हटलें, " गणपतराव, जाऊ नका; अधर्म करूं नका. महारवाड्यात जाऊं नका. पोटच्या पोरापेक्षां धर्म थोर आहे." तेव्हा तेजस्वी गणपतरावाने उत्तर दिले, " मी महारमांगांत जात नाही. मी माणसात जात आहे. मला महार-माग कोणी नाही. जो रागावतो तो महार. तुकाराम महाराजानी म्हटलं आहे, "महारासी शिवे, कोपें ब्राह्मण तो नव्हे," " सत्कर्माचा पश्चात्ताप होत नसतो." मुलगा चळवळीत गेल्यावर ते म्हणतात, " वेळ आलीच, तर हिंदभूमीसाठी हा वृद्ध गणपतरावहि हातात तिरंगी झेंडा घेऊन उभा राहील व लाठीमार खात हंसत प्राण देईल. " पुरोगामी विचार व खडतर निश्चय याचे गणपतराव पुतळेच. १९३० सालच्या चळवळीत ज्या अनंत वीरांनीं भाग घेतला, त्यातील तरुणाच्या कर्तृत्वाला बरोबर वाव देणारे असे कित्येक वीरपिते होते, म्हणूनच त्यागी तरुणाची तेव्हा वाण पडली नाही. सेवाधाम ही संस्था काढल्यावर त्याच्या लाडक्या राजाने त्याना तेथे राहावयास सागितल्यावर गणपतराव आनंदानें म्हणतात, " तूं म्हणशील तसं.

" जेथे जातो तेथें तूं माझा सागाती
चालवीसी हातीं धरूनीयां "

'राजा'चा धाकटा भाऊ राम हाहि एक त्यागी बंधु दाखविला आहे. राजाला त्यानें आश्वासन दिलें होते की, कठीण प्रसंग आला तर वडिलांना तो सांभाळील. " वेळ आली तर भीक मागेन. परंतु त्याना साभाळीन." देशासाठीं जाणाऱ्या राजाचे ज्याप्रमाणें गणपतरावानी पाय ओढले नाहींत, तद्वत् रामानें त्याला कोणत्याच प्रकारचा अडथळा आणला नाहीं. रामा म्हणजे गणपतरावाची खरोखर काठी, कोठेहि जावयाचें असलें, तरी रामा गणपतरावांचा हात धरून तेथें तयार ! त्याला समाजातील ढोंगी लोकांची भारी चीड. देवळांत जमलेल्या शेटजी भटजीनीं बहिष्कार टाकावयाचा डाव टाकताच ताडकन् तो म्हणतो, " शेटजी, तुम्ही धर्माच्या गप्पा नका मारूं. किती जणांच्या मुंड्या मुरगळल्यात ?" पितृभक्त रामाचें चित्र विद्यार्थ्यांपुढें आदर्श म्हणून खास ठेवण्यासारखें आहे.

'गोपाळ' हा राजाचा तुरुंगांतील मित्र होय. राजा तुरुंगांत गेला त्या वेळीं तेथें त्याचा गोपाळ हा जीवश्च कंठश्च मित्र झाला. नाना इलाख्यांतील लोक सरकारच्या कृपेनें तुरुंगांत एकत्र जमले, त्यांनीं परस्परांच्या ओळखी करून घेतल्या व भारतमातेविषयीं विचारविनिमय केला आणि आपलीं ध्येयें आंखलीं. दिनकररावांनीं केलेल्या अमानुष दगडी हल्ल्यांत बेशुद्ध झाल्यावर राजा शुद्धीवर येणें अशक्य होतें; परंतु गोपाळच्या आकस्मिक उपस्थितीनें राजा शुद्धीवर आला व म्हणूनच गोपाळला पुष्कळसें महत्त्व आहे.

'डॉक्टर' हे राजाचे मित्र असतात. राजाच्या त्यागी जीवनाबद्दल डॉक्टरांना अतिशय आदर असतो. राजाचा मित्र म्हणवून घ्यावयास त्यांना धैर्य होत नाहीं. ते म्हणतात, " मी सरपटणारा सरडा आहें. राजा चंडोल आहे. मी मातींतला किडा आहें. राजा गगनांत उडणारा आहे. " परंतु प्रत्येकाला राजाइतका त्याग करतां येईल अगर प्रत्येकानें तसा तो करावा या मताचे डॉक्टर दिसत नाहींत; डॉक्टरांच्या पात्रांतून सानेगुरुजींनीं तटस्थ राहणाऱ्या निष्क्रिय माणसांना राष्ट्रीय सेवा कशी करतां येईल हें हेतुपुरस्सर सांगितलें आहे. ज्याला जेवढें जमेल तेवढें त्यानें करावें. डॉक्टरला खरोखर किती तरी काम करतां येईल. गोरगरिबांना फुकट इंजक्शनें देतां येतील. निरनिराळ्या लोकांत डॉक्टरला जातां येतें. स्पृश्य, अस्पृश्य, हिंदुमुसलमान सर्वांचे दरवाजे डॉक्टरासाठीं उघडे असतात. डॉक्टरला सर्वांजवळ नीट वागून सर्व समाजांत प्रेम निर्माण करतां येईल. डॉक्टर ऐक्य निर्माण करणारा होऊं शकेल ! आदर्श डॉक्टर कसा असावा याचें गुरुजींचें हें चित्र आहे.

' डॉक्टर ' गोरगरिबांना, भंगी—महारांना फुकट औषधें पुरवितात एवढेंच नव्हे, तर पोटाला अन्न नसल्यामुळें पोटदुखी झालेल्या गरिबांना आठआठ आणे पण देतात. शेटजी-भटजींची ते टिंगल उडवतात व सर्वांचें ऐक्य घडवून आणण्याचा प्रयत्न करतात. 'राजा'चें तुरुंगांतून वडिलांच्या मदतीसाठीं धांवण्यासाठीं पत्र येतांच ते त्वरित धांव घेतात व गणपतरावांना दिनकररावासारख्या सापाच्या छळापासून वांचवितात व स्वतःच्या घरीं रामासह घेऊन येतात. 'राजा'वर दगडमार झाल्यावर त्याच्या सेवेला ते

हजर असतात एवढेंच नव्हे, तर दुष्ट दिनकररावावरहि आपल्या सुश्रूषा-रूपी प्रेमजलाचा वर्षाव केल्यावांचून ते राहत नाहींत.

'शंकरराव' हें पात्र असेंच सज्जन व सारासार विचार करणारें दाखविलें आहे. नव्या व जुन्या विचारांचा सुवर्णमध्य साधणाऱ्या माणसाचें हे पात्र प्रतिनिधि होय. परंतु प्रत्यक्ष कार्य कांहींच करीत नसल्यामुळें ह्या पात्राचा प्रभाव पडावा तसा पडत नाहीं. ते देवळांत, रावळात, सभास्थानीं सर्वत्र हजर राहून सर्वत्र समतोलपणा राहावा एवढाच प्रयत्न करतात. 'राजा'च्या त्यागाची प्रशंसा व दिनकररावांच्या दुष्ट कृत्याची सौम्य शब्दांत निंदा करीत असल्यानें शंकरराव हें एक बिनधोक व समतोल पात्र वाटतें, एवढेंच.

'रामजी' महाराचें पात्र 'तें आपलें घर' या नाटिकेंत 'राजा' नंतर अत्यंत महत्त्वाचे आहे. रामजीचीं गाऱ्हाणीं म्हणजे दलितवर्गाचीं गाऱ्हाणीं होत. रामजीला 'गांधीलोकांबद्दल' आस्था वाटते व तो राजाची वरचेवर प्रशंसा करतो. तो म्हणतो, "निढळाचा घाम ढाळणारा आज अन्नाला महाग झाला आहे. त्याची कोल्ह्याकुत्र्याहून वाईट दशा झाली आहे. जो श्रमतो त्याची सत्ता. राजादा, तुमच्यासारखे लोक आम्हास प्रेम देऊं लागले आहेत. आरंभ झाला आहे." गणपतरावांनी त्याची जमीन परत केल्यावर त्यानें कृतज्ञतेने उद्गार काढले, "असलें कृत्य हजारों हरिजनांचीं हृदयें जोडील. कोरड्या शब्दापेक्षां प्रत्यक्ष करणी महत्त्वाची आहे. तिनें संसारांत ओलावा येतो. संसार सुखाचा होतो." त्याची आशा हीच कीं, दलितांनीं झगडा करीत राहिले पाहिजे. चिखलांतून कमळे फुलतील. वाईटातूनच मागल्याचा जन्म होतो. घाण चिखलांतून निर्मळ व अमृतोपम धान्याची उत्पत्ति होते. तुरुंगां-तून सुटून आल्यावर राजा परत आपल्या गांवीं येतो, तेव्हां रामजीइतका आनंद कोणालाच होत नाहीं. दिनकररावांनीं गणपतराव व रामा यांना ज्या ज्या वेळीं छळलें, त्या त्या वेळीं त्यांना आश्रय व सहाय्य देणारा रामजी महार असतो ! राजाला बरें वाटावें म्हणून महारवाडा दारू सोडतो हा एक मोठा आदर्श गुरुजींनीं रंगविला आहे. गरिबांचें घर मोठें नसलें, तरी मन मात्र विशाल असते हेंच त्यांतून दाखवावयाचें आहे. रामजीची आशा ही कीं, 'या महारवाड्यांतच रहा. आम्हाला ज्ञान द्या. आमची स्थिति सुधारा'.

एक अत्यंत प्रेमळ व सोज्ज्वल हरिजन म्हणजे रामजी. त्यानें आपल्या दलित समाजाची कैफियत सनातन धर्माच्या वेशीवर अत्यंत यशस्वीपणें मांडली आहे.

'दिनकररावांची' जात सापाची आहे. रूढ सनातनधर्माभिमानी, पोटच्या पोरापेक्षां धर्म थोर समजणारा, धर्मरक्षणाची खोती केवळ आपल्याकडेच आहे असें मानणारा, व त्याकरतां बऱ्यावाईट प्रकारानें गणपतरावसारख्या सज्जन माणसाचा छळ करणारा हा गृहस्थ पाहिला, कीं तळपायाची आग मस्तकाला जाते. खलपुरुषाची भूमिका सान्याच्या स्वभावाला जमत नाहीं " खरें; परंतु दिनकररावाचे चित्र रंगविण्यात ते पुष्कळसे यशस्वी झाले आहेत. दिनकररावांच्या तोंडचीं उद्दाम वाक्यें अवलोकन केल्यास वरील म्हणणें अधिक सुसंगत होईल.

" कसले पितृभक्त! इकडे बाप म्हातारा व आजारी आहे; आणि हे म्हणे तुरुंगांत जाणार! यांना बापाची पर्वा नाहीं. यांना हवी कीर्ति, हवेत नवाकाळात फोटो, हव्यात सुताच्या माळा, हव्यात मिरवणुकी!" " संतांचें करणें संताना शोभतें. तुमच्यासारख्या जंताना शोभत नाहीं. " " धर्म कठोर असतो. धर्म पापाला सवलत देत नसतो, वाव देत नसतो. " " जगानें शेण खाल्ले म्हणून मी खावे का?" " धर्म नोटिस देत नसतो, धर्म म्हणजे इंग्रजांचा कायदा नव्हे. शहरातले कायदे येथें नकोत–तुम्ही सापाला दुखवीत आहांत, लक्षांत ठेवा. " दिनकरारव बोलण्यांत तर दुष्ट दिसतातच; परंतु त्यांनीं त्यांच्या धर्मरक्षणार्थ दोन थोर कृत्ये केलीं! एक म्हणजे गणपतरावास खोटे पत्र दाखवून घराचा त्याग करावयास लावून बहिष्कृत करणें व दुसरें म्हणजे राजावर दगडफेंक करून त्याला प्राणान्तिक जखमा करणे. त्याच्या पापाचीं फळें त्याना मिळालीं. खलपुरुषाच्या हृदयपालटाचें तंत्र महात्मा गांधींच्या तत्त्वानुसार पूर्ण अहिंसावादी पद्धतीनें येथें दाखविलें आहे. दिनकररावांच्या दुष्कृत्यांनीं त्याच्या अंगाची लाहीलाही होते व शेवटीं डॉक्टर म्हणजे राजाचे मित्र गोपाळच्या साहाय्यानें त्यांची प्रेमळपणें सेवाचाकरी करून त्याचा हृदयपालट घडवून आणतात. ' सेवाधाम ' ह्या नवीन स्थापिलेल्या आश्रमामध्यें राजाचें शिष्यत्व पत्करून शेवटीं दिनकरराव राहतात.

‘ तें आपलें घर ’ या नाटिकेंतील प्रमुख पात्रांची ओळख विस्तारानें वर करून दिली आहे. सानेगुरुजींनीं निर्माण केलेलीं हीं सारीं पात्रें सान्यांचीं ध्येये बोलतात, त्यांना होत असलेला विरोध व त्यांस तर्कशुद्ध देण्यांत आलेली उत्तरें सान्यांच्या तळमळीतून जन्मास आलेलीं आहेत. एक दिनकरराव सोडून सारींच पात्रें निरलस, निष्पाप व सोज्ज्वळ होत. आणि म्हणूनच त्याना अतिमानुष म्हटलें पाहिजे. तीं ध्येयस्वरूप आहेत, वास्तवरूप नव्हेत. त्याचें वागणें, बोलणें सहेतुक असून केवळ कलानंद ही भूमिका कोणत्याच पात्राच्या पूर्वपीठिकेंत नाही. सारींच माणसें पवित्र व हुषार. वसंतासारखा साधा पोरगासुद्धां व्याख्यान द्यावयास कचरत नाहीं. ‘ धर्माचें रक्षण करावें लागत नाही. धर्म दुबळा नसतो. सत्य स्वतःचें संरक्षण करूं शकत नसेल, तर तें सत्यच नाहीं ’ वगैरे व्याख्यान वसंत देतो एवढेंच नव्हे तर केस पिकलेल्या दिनकररावाशीं तर्कशुद्ध उत्तरें करतो. “ जंगलें तोडलीं म्हणून पाऊस कमी झाला, दर सालीं झाडे लावा; झाडें तोडण्याच्या पापामुळें पाऊस कमी झाला असेल. हरिजनांना जवळ घेण्यामुळें नाहीं.–दिनकरराव, पृथ्वीच्या पोटांत उष्णता असते म्हणून भूकंप होतात. ” इत्यादि. रामजीसारखा महारसुद्धा म्हणतो कीं, “ झगडा करीत राहिलें पाहिजे. चिखलांतून कमळें फुलतील !”

सानेगुरुजींनीं गणपतरावांस रामजीचें शेत त्यास परत द्यावयास लावलें आहे हें चित्र आदर्श होऊं शकेल, परंतु वास्तव नाहीं. डॉक्टर ज्या पद्धतीनें त्यांच्या सनातन रुग्णांशीं वागतात अगर बोलतात त्या पद्धतीनें जर सारे डॉक्टर वागूं लागले तर त्यांना लवकरच आपलीं चंबूगवाळीं गुंडाळावीं लागतील ! गरिबांना मदत व श्रीमंतांची थट्टा ह्या दोनहि गोष्टी स्वतःच्या जबाबदारीवर कोणताहि शहाणा डॉक्टर करणार नाहीं !

कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रम, अस्पृश्योद्धार, हिंदुमुसलमान ऐक्य, १९३० सालची चळवळ वगैरे अनंत विषय या लहानशा नाटिकेंतून पात्रापात्रांच्या तोंडून गुरुजींनीं सहेतुक रीतीनें चर्चिले आहेत; त्यामुळें कलेपेक्षां प्रचारालाच अधिक महत्त्व आलेलें आहे. नाटिकेच्या वाचनानें आनंदाऐवजीं बोध होतो. प्रत्यक्ष नाटिका पाहण्यानें तर निःसंशय गुरुजींचें ध्येय साध्य होतेंच होतें व त्यांनाहि तेंच हवें आहे.

इब्सेनचें महाराष्ट्रांत आयात झालेलें एकप्रवेशी एक अंकी तंत्र या नाटिकेंत कोठेंच सापडणार नाहीं. एक प्रवेश घरांत, तर एक प्रवेश दारांत, एक रस्त्यात, तर तिसरा महारवाड्यांत, नाहीं तर सार्वजनिक देवालयांत अगर तुरुंगात. इतकें जरी असलें तरी त्यात सूत्रबद्धता कायम राहते. प्रवेशांचा विस्तार कलात्मक नाहीं. कांहीं प्रवेश तीनपानी तर कांहीं प्रवेश तीनचार ओळींचे सुद्धां आहेत. काय सांगावयाचें आहे तें सांगून टाकल्यावर पात्रें निष्कारण कांहींच बोलत उभीं राहत नाहींत; स्वगत भाषणें आहेत, पण स्वभावपरिपोषाकरता उपयोग करण्यासाठी कथेतील तुटलेलें सूत्र जुळविण्यापुरत्याच रामजीच्या मनांतून रमाबद्दल भावना प्रतीत होतात, तो भाग चांगला आहे. मूलतः वर उल्लेख केल्याप्रमाणें कथानक हेतुप्रधान, सोपें व अत्यंत साधें आहे. त्यांत गुंतागुंत कांहींच नाही. गूढ नाही कीं औत्सुक्य नाहीं. सरळ कथनपर सर्व कांही आहे. दिनकरराव राजावर दगडफेंक करणार हें त्यांच्याच तोंडून "दगडांचा प्रताप काय आहे तें उद्यां कळेल" असें सांगून गुरुजी मोकळे होतात. राजावर आकस्मिक रीतीनें जर दगडहल्ला झाला असता व दिनकररावानीं तें कारस्थान जर गुप्त रीतीनें रचून पार पाडलें असतें, तर त्यांच्या खलपुरुषाच्या भूमिकेला ते साजेसे झालें असते; परंतु गुरुजींना कांहींच लपवून ठेवावयाचें नसल्याकारणानें पुढें काय होणार याची धोक्याची सूचना आपणांस अगोदरच मिळते. ही प्रचारात्मक पद्धतीची नाटिका असल्यामुळें केवळ कलेच्या निकषावर ती घांसून पाहिल्यास तींत पुष्कळच दोष असलेले दृष्टोत्पत्तीस पडतील. त्रोटक पात्रांच्या व माफक भाषणें, पंधरा पानांच्या एका अंकांतच पांच ते सात प्रवेश व प्रत्येक तोंडीं प्रचारकी थाटाचीं भाषणें यांमुळें कलेस पुष्कळसा बाध आल्याशिवाय राहत नाहीं. प्रचार इतका कीं, एकत्र जमलेल्या मुलांचीं नांवें पाहिलीं, तरी नाटिकेची हेतुप्रधानता स्पष्ट होते. पहिल्या अंकांतील चवथ्या प्रवेशांत मुलाची सभा भरलेली असते. तेथें बहुतेक खादीच्या टोप्या डोक्यावर घालून आलेलीं मुलें म्हणजे वामन, रघुनाथ, मीर्झा, रवींद्र दगडू, उत्तम, दयाराम हीं होत. सर्व ज्ञातींच्या ऐक्याचा हा जिव्हाळ्याचा प्रश्न यांतून अनुस्यूत होतो. हिंदूंनीं बहिष्कृत केलेल्या गणपतरावांस मुसलमान मीर्झा बावडीचें पाणी आणून द्यावयास तयार असतो, तर त्याच गृहस्थास

वनवास पत्करावा लागल्यावर रामजी महार आपल्या महारवाड्यातील घरांत स्थान देतो. थोडक्यांत हीं ध्येयवादी अशीं गुरुजींनीं रंगविलेली आशा-चित्रें आहेत. तीं वास्तव ठरावीत हा त्याचा जबरदस्त आशावाद आहे. लिखाणाचा मुख्य आत्मा आत्यंतिक कळकळ हा असल्यानें गुरुजींच्या इतर लिखाणाप्रमाणेंच हेहि लिखाण मोहक व करुणरम्य वाटतें. एवढेंच नव्हे, तर त्यानीं आपल्या ह्या आत्यंतिक तळमळीने कलेला वळसा घालून आपल्या लिखाणाचें एक नवीनच तंत्र निर्माण केले आहे, तें त्याचें त्यांनाच साधतें. त्यांच्या वाङ्मयप्रकारांत कृत्रिमतेचा गंधहि नसतो व त्यामुळेंच सदर नाटिका रमणीय झालेली आहे.

सुमधुर चालींवरील गीतानीं नाटिकेला प्रयोग होत असतांना चांगलीच साथ मिळते.

जगीं कोण अस्पृश्यांची कींव हो करील
कोण त्यास प्रेमें हृदयीं घट्ट हो धरील ॥ धृ० ॥

ही कवाली करुणरम्य आहे. दलिताचें हें गाऱ्हाणें आहे. त्याला कवालीच्या करुण स्वरांनीं अधिक आर्तता येते.

भारत प्यारा स्वतंत्र झाला
जय बोला जय बोला हो—
जय बोला, जय बोला हो ॥ धृ० ॥

हें दलगीत तर वीररसानें थबथबले आहे.

नाटिकेंत मधून मधून खोंचक विनोदाचीं कारंजीं सहज रीतीने पसरून ठेवणाऱ्या कामगिरीचें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे. कौतुक कां करावयाचें तर तो विनोद गुरुजींसारख्या गंभीर व करुण प्रकृतीच्या माण-सानें केलेला आहे म्हणून. गंभीर विषयानें प्रेक्षकांच्या मनावर ताण पडूं नये म्हणून नाटकांतून विनोदाची खुलावट करावी लागते; म्हणून गुरुजींनीं मोठ्या मार्मिक रीतीनें हा विनोद केला आहे असें कांहीं म्हणवत नाहीं. प्रसंग दिसला, कांहीं तरी टोमणा मारावासा वाटला व लेखणींतून तो उतरला, एवढेंच. त्याकरतां विशेष प्रसंग नाहीं, किंवा शब्दांवर असंख्य कोट्या करून तारेवरील शाब्दिक कसरत नाहीं, कांहीं नाहीं. 'विनोदाकरतां विनोद' ह्या भानगडींत पडण्याचें त्याचें ध्येय नाहीं, व त्यांचें तें कार्यक्षेत्रहि नव्हे.

या नाटिकेंत एकच मनांत भरण्यासारखी कोटी आहे. ती अशी:—

उत्तमः—दगड्ड भावनाप्रधान आहे. त्याचें नांव बदललें पाहिजे.

आणखीहि कांहीं चुटकेवजा विनोदी स्थळे पाहण्यासारखीं आहेत.

गुलाबचंद शेठः— अहो, एकदां बसलों कीं पटकन उठतां येत नाहीं, उठलों तर बसता येत नाहीं. फार त्रास बघा.

लखंभटः—मी उठवतों. उठा, चला, तुम्हांला संध्या शिकवतों, चला—

× × ×

डॉक्टरः—या भटजी, आज अगदीं भले मोठें गंध आहे!

सनातनीः—आमचा धर्म कांहीं मेला नाहीं, गंध लहान व्हायला. ज्याचा धर्म मोठा, त्याचे मोठें गंध, त्याच्या मोठाल्या मिशा, त्याची मोठी शेंडी.

डॉक्टरः—त्याचा मोठा स्वार्थ, त्याचा मोठा दंभ, त्याचा मोठा क्रोध.

× × ×

डॉक्टरः—शेटजी, तुम्हीच सांगा, पोटाची स्वच्छता असणारा अधिक स्वच्छ, का बरच्या कोटाची स्वच्छता असणारा? तुमच्या पांढर-पेशाच्या भोजन-पंक्तींत उदबत्त्या लावतात; कारण, साऱ्याचे कोठे घाणीनें भरलेले! तुम्ही लंघन करा व या हरिजनाला घरांत नेऊन पोटभर जेवायला वाढा.

या बोचक विनोदामागील कारुण्यानें पोटाला पीळ पडत नसल्यास त्याचें नांवच दगड ठेवावयास हवें. गुरुजींचा शेटजीभटजींवरील राग अशाच कित्येक वाक्यांवरून पूर्णपणें दिसून येतो.

सनातनीः—अहो, डॉक्टरला विटाळ नसतो.

शेटजीः— डॉक्टर नेहमीं पवित्र, असें धर्मांत आहे.

डॉक्टरः—देव बाटतो, आणि डॉक्टर बाटत नाहीं! देवापेक्षां का मी मोठा? काय बोलतां तुम्ही?

× × ×

शामभाऊ ह्या डॉक्टरांच्या कंपांउडरचें चित्र पाहाः—

(डॉक्टर बाहेरगांवीं गेल्यावर)

शामभाऊः—बरें झालें, चार दिवस आपलें राज्य. (खुर्चीवर बसतो.)

या डॉक्टरांच्या खुर्चीवर जरा बसावे, नको, पण उठावें. एकदम यायचे नाहीं तर त्या दिवसासारखे व फजिती व्हायची!

× × ×

वसंत:—दिनकरराव, पृथ्वीच्या पोटांत उष्णता असते म्हणून भूकंप होतात. वाफेमुळे भातावरचे झांकण हलतें तेथें का अस्पृश्योद्धार येत असतो! जरा शाळेंत जाऊन सायन्स शिका, शास्त्र शिका.

लखंभट:—तुझ्या शाळा आतां शास्त्र शिकविणार होय?

वसंत:—तें तुमचें शास्त्र नव्हे. ऑक्सिजन वगैरेचे शास्त्र.

वरील कांहीं त्रोटक उदाहरणांवरून गुरुजींसारख्या नेमनिष्ठपणें राजकीय व्रतें आचरणाऱ्या माणसाला विनोदच कळत नाहीं अगर विनोदाशीं त्यांचें वांकडें असतें, असें म्हणवत नाहीं. जीवनांत विनोदाचें स्थान अढळ आहे. विनोदाला वरील उदाहरणांतून दिसून येणारी कारुण्याची धार असली, तर तो अधिक बोंचक झाल्यावांचून राहत नाहीं. तो खोंचक पण पोषक आहे, विदारक पण संवर्धक आहे; हेंच विनोदाचें मुख्य स्थान होय व त्याचा उपयोग गुरुजींनीं लीलया करून घेतला आहे.

नाटिकेंतील सर्व भाषा धावती व सोपी अशी आहे. सत्यसृष्टीचा पाया ती सोडीत नाहीं. काव्यमय भाषेचा एक नमुना येथें दिल्याशिवाय राहवत नाहीं.

गणपतराव:—खरोखरच समुद्र म्हणजे एक गंभीर गूढ आहे. समुद्राचा हा गंभीर सामवेद कोणाला कळणार? अनंत काळापासून तो सारखा ओरडत आहे.पृथ्वीच्या पायाशीं डोकें आपटीत आहे. काय पाहिजे त्याला? हृदय पिळवटून कसलें गाणें गातो तो? कां ही त्याची सारखी धडपड? मानवजातीचें ऐक्य का त्याला पाहिजे आहे? नका रे एकसारखे एकमेकांशीं भांडूं. परस्परांत बंधुभाव राखा असें का तो सांगत आहे?

'तें आपलें घर' ही नाटिका गुरुजींनीं त्रिचनापल्ली जेलमध्यें १९३० मध्यें लिहिली व त्यांतील स्त्रीपात्रें काढून मग त्यांनीं ही नाटिका तयार केली आहे. ते म्हणतात, "देशापुढील सध्यांचे प्रश्न घेऊन लिहिलेल्या छोटया नाटिका आहेत कोठें? मी मोठा कलावान नाहीं. परंतु राहवत नाहीं म्हणून मी लिहीत असतों. महाराष्ट्रांतील कलावंतांना हें लिहिणें आवडलें नाहीं, तरी

त्यांतील सद्धेतु व कळकळ पाहून परमेश्वर कौतुक करील, याची मला शंका नाहीं."

गुरुजींनी स्पृश्यास्पृश्य, हिंदुमुस्लिम ऐक्य, सत्याग्रह, भारतीय श्रेष्ठत्व, श्रमजीवि लोकाबद्दल पांढरपेशा लोकाचें कर्तव्य वगैरे विषयांवर अनंत पृष्ठांतून आपलें तळमळणारे अंतःकरण ओतले आहे. त्यांचें सारे साहित्य प्रक्षोभातूनच निर्माण झालेले आहे. त्यांना रूढ कला तितकीशी साधत नसली, तरी ते तिचे निस्सीम भक्त आहेत, सरस्वतीचे पूजक आहेत. कळकळ हा त्यांचा प्राण असून दीनदुबळ्यांसाठी तो अहर्निश तळमळत असतो हेंच त्यांचें दर्शन.

त्यांचें 'निळा पक्षी' हे अनुवादित नाटक मुळातले मॉरिस मॅटर्लिंक याचें आहे. त्यातील सर्व नाट्यगुण मॉरिस मॅटर्लिंकचे असले, तरी त्याचें मराठीकरण करताना गुरुजींनीं इतकी आत्मीयता व सहृदयता प्रकट केली आहे कीं, ते त्याच्या स्वतःचेच तंत्र पांघरून महाराष्ट्रीय वाचकांच्या समोर उभे राहते. हेंच नाटक त्यानी का अनुवादिलें या प्रश्नाला त्याना तें फार आवडले एवढें उत्तर देऊन भागावयाचें नाहीं. मॉरिस मॅटर्लिंकनें या नाटकांत सारी अंतर्बाह्य सृष्टि पात्ररूपानें उभी केली आहे. चराचर सृष्टि येथें बोलते, रागावते, हंसते, रडते. मोत्या, बोकोबा, सांड, गाय, बैल, कोंबडा, गाढव, डुकर, बकरी, घोडा, ससा, लांडगा इत्यादि प्राण्यांचे आत्मे, भाकरोबा, जलराणी, प्रकाशराणी, शर्करानंद, दुधी, अग्नि इत्यादि पदार्थांचे आत्मे; हिंवर, लिंब, सुरमार, ओक, देवदार, भूर्जवृक्ष, गारवेल इत्यादि वनस्पतींचे आत्मे व ऐषारामादि सुखें, मातृप्रेमाचा आनंद, समजण्याचा आनंद, न्यायी असण्याचा आनंद, समजून घेण्याचा आनंद, इत्यादि भावनांत अंतर्भूत असलेले गूढ आत्मे प्रत्यक्ष रीतीनें मधु व मालती ह्या भावंडांशीं या नाटकांत बोलतांना दिसतात. भांडतात, बोलतात, हंसतात व रडतात.

'निळा पक्षी' म्हणजे सुख. आपण मानवानें सुखाचा जितका शोध करावा, तितकें तें लांब लांब पळतें. म्हटलें तर जवळ आहे व म्हटलें तर दूर आहे. तें क्षणभर आपल्या हातीं आल्यासारखें वाटतें; पण लगेच तें आपण केव्हां

गमावलें याचेंहि आपणांस देहभान राहत नाहीं. शेवटीं सुख आहे तरी कोठें ? तर आपल्या हृदयांत. तें मानण्यावर आहे. थोडक्यांत, सुख ही सापेक्ष वस्तु आहे असाच या नाटकाचा सिद्धान्त आहे. डॉ. जॉन्सनच्या ' रासेलस ' या कादंबरींतही असाच सुखाचा शोध करण्यात येतो व ते अखेरीस हातीं लागत नाहीं अशी गोष्ट आहे. कृष्णशास्त्री व विष्णुशास्त्री चिपळूणकर या पिता-पुत्रानी मराठीत आणलेली सुखाच्या शोधाची ती कादबरी आहे व हें नाटक आहे, फरक एवढाच. विषय मात्र तोच आहे.

हें नाटक प्रतीकात्मक असल्यानें तेवढी जाणीव ठेवून जर नाटकाचे वाचन केले, तर अनिवार्य आनंद लुटता येतो. इंग्रजी सहावी–सातवींतल्या विद्यार्थ्यांनाहि याचा प्रथम वाचनाने नीटसा बोध होत नाही याचे कारण ही प्रतीकात्मकताच होय. गुरुजींनीं आपले सर्व कसब ह्या अनुवादांत ओतलें आहे. परंतु मूळची कल्पना थोडी कठीण असल्यामुळे पहिल्यानेच वाचतांना वाचकाला ते थोडे कंटाळवाणे होणें साहजिक आहे. परंतु जो जों त्या नाटकांतील अंतर्भूत विषयाचा अधिकाधिक विचार करावा, तों तों त्यातील सौंदर्य अधिक प्रतीत होते. जीवसृष्टीप्रमाणे अजीव सृष्टीसहि वाचा आल्यास ती आपलीं गाऱ्हाणीं कशी माडील व मानवाने तिच्यावर केलेल्या अत्याचारांचा, अन्यायांचा सूड कसा घेऊं शकेल याचें मनोहारि चित्रण या नाटकात आपणांस आढळते. मनुष्यानें ज्या सुखाकरतां या पृथ्वीवर काहीं बरें वाईट केलें आहे, त्या सुखाचा मात्र त्यास कधींच लाभ झालेला नाहीं हें करुणरम्य कठोर सत्य उघडकीस आल्यावर या नाटकाची भव्यता अधिक प्रतीत होते. मॉरिस मॅटर्लिंकसारख्या थोर साहित्याचार्याचें ' निळा पक्षी ' हें नाटक मराठींत आणून सानेगुरुजींनीं अनुवादित वाङ्मयांत मोठीच भर घातली आहे.

प्रयोगाच्या दृष्टीनें हें नाटक सोईचें नाहीं. आध्यात्मिक आनंदाच्या दृष्टीनें मात्र अवश्य वाचनीय आहे. जीवाजीवांचे आत्मे यांत बोलत आहेत ही मनोभूमि तयार करून मग हें नाटक वाचलें तरच त्याचें योग्य रसग्रहण करतां येणें शक्य आहे.

' सोन्या मारुती ' या पुस्तकांतहि बरेचसे संवाद आहेत; परंतु ते कथ-

नाच्या आवेशांत निर्माण झालेले आहेत. त्यांत नाट्यगुण भरपूर असला, तरी तीं नाटकें नव्हेत.

गुरुजींची एका हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीहि त्यांची नाट्यसृष्टि विपुल नाहीं हे पाहून प्रथम विषाद वाटतो. कदाचित् बरींचशीं नाटकें त्यांच्याजवळ पडून असतील; तीं प्रकाशांत व रंगभूमीवर आलीं पाहिजेत. गुरुजींनीं आता नाटकें लिहावींत, त्यांनीं आतां कादंबऱ्या लिहाव्यात किंवा लघुकथा लिहाव्यात असे सागण्याचा अधिकार आपला नाहीं; त्याना राहवत नाहीं तेव्हां ते लिहितात. त्यांना कांही सागावयाचें असेल तेव्हां ते लिहितात. त्यांना सागावयाचें असेल तेव्हां ते सांगतात. मग त्यांच्या सागण्याचें बाह्य स्वरूप कसेहि असो. त्यांचें सांगणें कधीं नाटकांतून होईल, तर कधीं कथेंतून होईल, अगर ते प्रदीर्घ व्याख्यानवजा कथा कादंबरी लिहितील. अगर एकादें परडींत ठेवण्यासारखें मंगल असें काव्यपुष्प फुलवितील. त्यांनी काय लिहावे, कोणत्या पद्धतीने लिहावें, हें आपणास सांगतां येत नाहीं. त्याना मुख्यतः काय लिहावयाचें असतें तें प्रसिद्धच आहे. महात्मा गांधींच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार करणें हें त्यांचें पवित्र कर्तव्य आहे. महाराष्ट्रातील बालवाचकानीं जर प्रेमाने मागणी केली, तर ते पांचचार नाटिका सहज लिहून देतील. महात्म्याच्या महामंत्राचा जयघोष करणें हेंच तर त्यांचें ध्येय. नाहीं तरी, त्यांच्याच म्हणण्याप्रमाणें देशापुढील सध्यांच्या प्रश्नांवर लिहिलेल्या छोटया छोटया नाटिका आहेत कोठें ?

## साने गुरुजींचें काव्य

' पत्री'च्या रूपानें सानेगुरुजींचें काव्य महाराष्ट्रास उपलब्ध आहे. साने हे स्वतः प्रथम कवि आहेत व मग ते देशभक्त आहेत असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. त्यांच्या हळुवार मनाला ज्या संवेदना होतात त्यांचींच चित्रें ते आपल्या काव्यांत उतरवीत असतात. मग त्या समाजिक, राजकीय अगर धार्मिक स्वरूपाच्या असोत. अशींच चित्रें त्यांनीं आपल्या 'पत्री' या काव्य-संग्रहांत चितारलीं आहेत. त्यांच्या मनोभूमिकेंत भारतीय भक्ति व युरोपीय शक्ति यांचा यथायोग्य समन्वय झालेला आहे. 'पत्री'चे पावित्र्य सुगंधमय असलें,तरी त्यात अनुस्यूत असलेल्या भारतीयांच्या विशाल दुःखाच्या भावना अंतःकरणाला पीळ पाडल्यावांचून राहत नाहींत. साने यांचें अंतःकरण पत्रीच्या रूपानें महाराष्ट्रापुढें उघडें झालें आहे; त्याचें विशाल दर्शन घेणें प्रत्येक मराठी वाचकाचें कर्तव्य असून टीकाकारानीं त्याच्या भावनांशीं सहृद-यतेनें समरस होऊन त्यांतील गुणदोषपरीक्षण करणें मराठी वाङ्मयाच्या दृष्टीनें इष्ट आहे.

### ' पत्री 'च नांव कां ?

सान्यांनीं आपल्या काव्यसंग्रहाला ' पत्री ' हेंच नांव कां दिलें या गोष्टीमागें एक इतिहास आहे. अमेरिकन कवि Walt Whitman यांची कविता लहानपणापासून गुरुजींना फार आवडावयाची. Walt Whitman च्या

काव्याला दिलेल्या Leaves of Grass या नावाची त्याना अतिशय मोहिनी पडली होती. आपल्या हातून पुढेमागें काव्य निर्माण झाल्यास व त्याचे नामाभिधान करावयाचा सुयोग आल्यास त्याला ' तृणपर्णें ' हेंच नांव द्यावयाचें असे त्यानी आपल्या विद्यार्थी-दशेतच ठरवून ठेविलें होतें. भारतीय संस्कृतीचा जळजळीत अभिमान बाळगणाऱ्या व संपूर्णपणे भारतीय असणाऱ्या गुरुजींना ज्या वेळीं खरोखरच आपल्या काव्याचें प्रकाशन करावयाचा सुयोग आला, त्या वेळीं त्यानी लहानपणीं योजून ठेविलेल्या 'तृणपर्णें' या नावाचा त्यानी उपयोग केला नाहीं. परभाषाच्या अध्ययनाभ्यासानेंहि त्यांचें भारतीयत्व यत्किंचित्‌हि कमी झालें नाहीं. त्यानीं आपल्या काव्यसंग्रहाला ' तृणपर्णें ' हें नाव न देता ' पत्री ' हें नाव दिलें. आचार्य भागवत म्हणतात, " 'पत्री' या नावाने काव्याची सहजस्फूर्तता, कवीची शालीनता, आणि भक्ति स्पष्ट होते. अमेरिकन तृणपर्णांत भारतीय भक्ति मिसळली कीं ' पत्री ' तयार होते. " पत्रीचें पावित्र्य हें भारतीयांनाच माहिती आहे– ' पत्री ' म्हणजे स्वतः सानेगुरुजींची तळमळ असेच आंतील पुष्पांची, बिल्वपत्रांची पाहणी केल्यावर कळून येते.

## १९२५ ते १९३५

'पत्रीं'तील बहुतेक काव्य गुरुजींनी १९२५ ते १९३५ या दशकांतच लिहिलेलें आहे, हें कवितांच्या खालीं दिलेल्या कालांवरून दिसून येतें. साऱ्याच कविता बहुतेक नाशिक, धुळें, त्रिचनापल्ली इत्यादि ठिकाणच्या तुरुंगांत असताना त्यानीं लिहिलेल्या असल्यामुळें त्यांच्या कविताना एक प्रकारची धार आलेली आहे. गुरुजींसारख्या कार्यकर्त्यांना तुरुगासारखीं ठिकाणें म्हणजे स्वतःचे विचार कागदावर निवांतपणे उतरून ठेवण्यास योग्य असलेलीं शांत उद्यानेंच ! बाहेरील जगाची बंधने तुरुंगांत नसल्यामुळें व समव्यवसायी विद्वान् मंडळींच्या सहवासांत सर्व कालक्रमणा होत असल्यामुळे तुरुंग हीं राष्ट्रदीपक पुढाऱ्याचीं विचारसाधना करावयाचीं पवित्र क्षेत्रेंच झालेलीं आहेत; लोकमान्य टिळकांनीं आपला पवित्र व महान् 'गीतारहस्य' हा ग्रंथ तुरुंगातच लिहिला. महात्मा गांधीना लिखाण व विचार करावयास तुरुंगाइतकें स्वास्थ्य बाहेर कधींच मिळाले व मिळत नाहीं. पंडित जवाहरलाल, बाबू राजेंद्रप्रसाद, आचार्य कृपलानी, मौलाना अबुल कलम आझाद यांनी तर त्यांच्या अहमदनगर

तुरुंगांतील १९४२ ते ४५ च्या काळात बरेंचसें लिखाण केलें असल्याचें सर्वश्रुतच आहे. गुरुजींनीं तुरुंगांत अनेक कविता केल्या एवढेच नव्हे, तर त्याचें बहुतेक ललित लेखनहि तुरुंगातच झालेलें आहे. एकूण, श्री. ना. गो. चापेकर यांच्या म्हणण्याप्रमाणे, ‘ तुरुंग हा प्रौढ वाङ्मयाचा पोशिंदा आहे’ असेंच म्हणावेंसें वाटतें.

१९२५ ते १९३५ हा काल म्हणजे मॅाँटेग्यूचेलम्स्फर्ड यांच्या सुधारणा राबविण्याचा व महात्माजींनी सर्व हिंदुस्थानभर केलेल्या लोकजागृतीचा व १९३५ सालचा पार्लमेंटने हिंदुस्थानबाबत केलेला कायदा यांतील काळ होय. असहकारितेच्या चळवळीनतर अखिल भारतवर्षात सर्वत्र एक प्रकारची अशांतता पसरली होती व तिचे ध्वनिप्रतिध्वनि हिंदुस्थानच्या कानाकोंपऱ्यांतून ऐकूं येत होते. तोंच १९३० मध्यें महात्माजींच्या दांडीसत्याग्रहाची रणदुंदुभि वाजली व साऱ्या राष्ट्रानें त्यांच्या आरोळीला ‘ ओ ’ दिली. सारें राष्ट्र सर्वत्र पेटलें, सर्वत्र जागृति झाली व सारें भारतवर्ष स्वतःच्या त्यागानें तळपूं लागलें. कसल्याहि प्रकारच्या विपत्तीला अहिंसात्मक तोंड द्यावयाचें आत्मिक सामर्थ्य जनतेच्या अंतःकरणात उदय पावलें. अशा जिवंतपणाच्या काळांत साऱ्यांनीं हें सारें काव्य केलें आहे. टेबलखुर्चीशीं कोंपऱ्यांत बसून अगर निवांतपणें मंचकावर पहुडून केलेलें हें काव्य नसून तुरुंगाच्या कोठडींतील फरशीच्या गारव्यावर आपलें अंग टाकून अंतःकरणांतून आलेले हे प्रामाणिक कढ आहेत. ज्या काळांत त्यांनीं हें काव्य केलें, त्या काळांतील आंदोलनें लक्षांत आणूनच या काव्याकडे पाहिलें पाहिजे. त्या काळाचें त्यांच्या काव्यांत उमटलेलें प्रतिबिंब आपण पाहिलें पाहिजे. त्या काळांत त्या काळाचें रेखाटलें गेलेलें हें चित्र त्या काळाशीं समरस होऊनच आपण पाहिलें पाहिजे. त्या प्रसंगीं जनतेला आलेले व गुरुजींनीं समरसतेनें वर्णिलेले अनुभव आपण पुनःप्रत्ययानें अनुभवून तपासिले पाहिजेत.ह्या काव्याचें वाचन करीत असतांना त्या काळाशीं समरस झालें पाहिजे.

याच काळांत मराठी कवितासुद्धां भरभराटीस आली. चंद्रशेखर, तांबे, गिरीश, यशवंत, माधव ज्यूलियन, अत्रे वगैरे प्रमुख, नामांकित कवींचें

काव्य याच कालांत फोफावलें व तें साऱ्या महाराष्ट्रीयांच्या तोंडीं झालें. तांब्यांचीं रागदारी भावगीतें, चंद्रशेखराचा मोरोपंती थाटाचा डौलदार प्रौढपणा, आपल्या खणखणीत व दणदणीत आवाजानें व प्रतिभाविलासानें सारा महाराष्ट्र निनादून सोडणारें यशवंत–गिरीशांचें काव्य, आपल्या भावनानुकूल रसमय वाणीनें ओथंबलेलीं माधवराव पटवर्धनांची गीतें, आपल्या खोचक व बोचक विडंबनाने भोदू संभावितांची 'श्रीमुखे' रंगविणारीं अत्र्यांचीं 'झेंडूचीं फुलें' यांनीं महाराष्ट्र–शारदेच्या मंदिरांत एकच धमाल मचवून दिली होती. १९३५ हें साल म्हणजे पूर्ण भरतीचें होय. तेथून पुढें या सर्व काव्याला मिळालेल्या शिष्यवर्गानें ओहटी आणली. सर्व गोष्टींचा अतिरेक झाला. प्रेमगीताचें रूपातर लावण्यांत झालें व विडंबनाचें मूलभूत तत्त्व बाद करून प्रसिद्ध कवीच्या काव्याचा वेडावाकडा पसारा करून अचकाविचका करून ठेवण्यांतच शिष्यगणातील कवींना आपल्या काव्यजीवनाचे सार्थक भासूं लागलें ! तो हीन काळ १९४२ च्या आंदोलनानंतर बदलत आहे असें वाटतें. काव्यदेवी पुन्हां आपलें नयनरम्य व हृदयंगम स्वरूप धारण करीत आहे. कुसुमाग्रज, निकुंभ, वसंतराव वगैरे कवींनीं पुन्हां उच्च काव्याच्या आशा उत्पन्न केल्या आहेत. परंतु मराठी कवितेला वरील १९२५ ते १९३५ या काळांत जी प्रतिष्ठा प्राप्त झाली होती, तितकी प्रतिष्ठा आजच्या घडीला अजून मिळवितां आली नाहीं. उरलेल्या जागेंत मजकूर म्हणून तिचा अजून उपयोग करण्यात येतो हें नाकबूल करून चालणार नाहीं. किंवा शोभेचे दोन खाब मंडपापुढें लावितात तितकेंच तिचें स्थान अजूनहि आहे. अजूनहि महाराष्ट्र–साहित्य–संमेलनांतून कवितेला कसबिणीप्रमाणें करमणुकीच्या कार्यक्रमांतच आपला शृंगार थाटावा लागतो. अगर सर्कशींतील विदूषकाप्रमाणें श्रोत्यांना हास्यरसाचे डोस पाजावे लागतात. परंतु हें हीन कार्य करीत असतांना तिचें स्वतःचें स्वरूप हास्यास्पद होत जातें, याची वाट काय ?

वर उल्लेख केलेल्या कवींचा महाराष्ट्रांत स्वैरपणें संचार चालू असतांना गुरुजींचें काव्य मात्र काव्य म्हणून कोठेंच ऐकण्यांत येत नव्हतें. राष्ट्रीय कविता म्हणून खाडिलकर, दु. आ. तिवारी, आनंदराव टेकाडे, मुचाटे यांच्या पोवाड्यांचें व काव्याचें गायन होत असलें, तरी साने यांचें काव्य

इतक्या जाहीर रीतीनें कधींच गौरविलें गेलें नाहीं. त्याचा हेतुच निराळा होता. साहित्यतज्ज्ञांच्या परीक्षेकरतां त्यांनीं तें कधींच पुढें केलें नाहीं. तर एका हातांत राष्ट्रीय निशाण व दुसऱ्या हातांत स्वतःचें शिरकमल घेऊन राष्ट्रीय लढ्याकरतां पुढें सरसावून स्वतःचे प्राण पणास लावणाऱ्या सान्यांचें काव्य त्या वेळच्या लढ्यांतच ऐकूं होत होतें. लोकांकडून तें वाचिलें जाण्यापूर्वी गायिलें जात होतें. प्रतिष्ठित वाचकांच्या मनास धक्का देण्याचें व त्यांची मान्यता मिळविण्याचें कार्य सान्यांच्या काव्यानें फार उशिरां केलें. तें म्हणजे 'पत्री'च्या रूपानें त्यांच्या काव्यापत्याला बाह्य स्वरूपाचें आंगडें टोपडें घातलें गेलें तेव्हांच. स्वतः साने अत्यत भिडस्त व प्रसिद्धिविन्मुख असल्यामुळें त्यांच्या मित्रांना त्यांच्या या काव्यबाळाला मुद्रणाचें आंगडें टोपडें चढवावें लागलें. आपलें हें काव्यबाळ चारचौघांना आवडेल कीं नाहीं, कीं ते त्याच्याकडे पाहून तोंडें फिरवितील याबद्दल त्यांना अतिशय काळजी वाटत होती. खरोखर तसें कांहींच कारण दिसत नव्हतें. परंतु काव्याबद्दलच्या रूढ अशा अपेक्षा व समजुती यांकडे लक्ष दिल्यास आपलें अपत्य रसिकांस ओबडधोबड व रूक्ष वाटेल याची त्यांना सारखी भीति वाटत असावी आणि म्हणूनच त्यांना चार रसज्ञांकडे अभिप्रायाची याचना करावी लागली. बाळाच्या प्रेमामुळें आंधळे होऊन साने आपल्या बाळासाठीं आशीर्वाद मागावयास गेले. रसज्ञांनीं आशीर्वाद तर दिलेच, परंतु दोन उपदेशाच्या पण सावधगिरीच्या सूचनाहि दिल्या.

साने यांच्या समकालीन कवींकडे दृष्टिक्षेप टाकल्यास आपणांस असें आढळून येतें कीं, त्यांचा पंथ निराळाच आहे. पित्यासमान आज्ञा करणारें व विद्वत्तादर्शन करणारें त्यांचें काव्य नाहीं. मित्राप्रमाणें उपदेश करणारें असें त्यांचें काव्य क्षणभर समजावें, तर मित्राकडून मिळणाऱ्या धैर्यगुणांपेक्षां ते त्याच मित्राची कास धरून आपलीं गाऱ्हाणीं त्याच्यापुढें मांडतांना दिसतात; कांतासमित उपदेश करणारें त्यांचें काव्य समजावें, तर त्यांत वीररसाचा खळखळच फार. शिवाय सभोंवतालीं पसरलेल्या निराशामय वातावरणानें उदास झालेल्या मनाचा कारुण्यपूर्ण परंतु आशावादी चेहराच सर्वत्र दिसावयाचा ! बरें, केवळ परमेश्वराचें गुणगान करणारें तें संतकाव्य समजावें, तर केवळ भक्ति व मुक्ति या पारमार्थिक आत्मानात्म

विवेकांतच त्याला मोक्ष मिळत नाहीं. देशाचें स्वातंत्र्य हा त्यांचा मित्र, त्यांचा देश हा देव होय व त्याची पूजा म्हणजेच देशाची व देवाची पूजा होय. केवळ 'कलेसाठीं कला' हें तत्त्व त्यांना मान्य नसल्याकारणानें त्यांचें सारें काव्य सहेतुक कलेचा पूर्णाविष्कार झालेलें आढळून येतें. केवळ आल्हाद देणें हे त्यांच्या काव्याचें कार्य नसून, चेतना देणें, स्फूर्ति देणें, कार्यप्रवण करणें हें त्याचें मुख्य ध्येय होय. तसें पाहिलें तर साने यांना आधुनिकांत कै. दु. आ. तिवारी यांच्या रांकेंत बसवावें लागेल. १९३० सालच्या चळवळींत पेटलेल्या लढ्याला पूरक असें बरेंच काव्य त्यांनीं वैपुल्यानें लिहिलें आहे. त्यांच्या काव्याची तळमळ ही माता असून प्रचार हा आत्मा आहे.

## 'पत्री'

'पत्री'तील त्यांच्या काव्याचे प्रामुख्यानें चार खंड पडतात. पृष्ठ १ तें ११६ पर्यंत एक खंड होतो व यांतील सर्व कविता परमेश्वरविषयक गुणगान करणाऱ्या व संताच्या पद्धतीनें ईश्वराची आळवणी करणाऱ्या अशा थाटाच्या आहेत. पृष्ठ ११७ ते १८६ चा दुसरा खंड करतां येतो. यांतील कवितांचे विषय सामान्य जीवनांत आढळून येणारे असे आहेत. पृष्ठ १८७ ते ३०२ पर्यंतच्या खंडांत देशभक्तिपर व स्वातंत्र्यविषयक कविता आहेत व पृष्ठ ३०३ ते अखेर म्हणजे ३७६ पर्यंत 'सत्याग्रही' नामक एका खंडकाव्याचा अंतर्भाव झालेला आहे.

## परमेश्वरभक्तिपर काव्य

'पत्री'च्या पहिल्या सुमारें सव्वाशें पृष्ठांत साने यांचें काव्य संतकाव्याशीं समरस झालेलें दिसतें. संकटसमयीं परमेश्वराची करुणा भाकून त्याला सहाय्यासाठीं आर्तरवानें बोलावणें हा भक्तिमार्गपंथ महाराष्ट्रास नवीन नाहीं. आपल्याकडे ती एक सोज्ज्वल व दिव्य परंपरा आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम रामदासादि संतांनीं परमेश्वराचें गुणगान करून भक्तिपंथ काव्यांत रूढ केला. फार काय, पण आजच्या वादकुशल महाराष्ट्रांत त्या वेळीं प्रस्थापित झालेला भक्तिविचार काव्यकलेच्या सहाय्यानें महाराष्ट्राच्या अंतःकरणांत पोहोंचविला. ह्या तत्कालिन थोर महापुरुषांचा भक्तिविचार त्या

कालांतील लहानथोर कवींनीं महाराष्ट्रांत घरोघर पोंहोचविला. " ध्यायीन तुझें रूप। गाईन तुझें नाम। आणिक न करी काम। जिव्हा सुखें" हें तुकाराम महाराजांचें काव्याचें ध्येय होतें. जेणें करून भवसिंधु आटेल असे जें लिहिणें त्याला कवित्व म्हणावें व बाकीचें तें व्यर्थ अगर अलीकडील भाषेंत सांगावयाचें म्हणजे 'हुच्च काव्य' होय, अशा मताचें प्रतिपादन महाराष्ट्र संत श्रीमर्थांनीं केलें. ते म्हणतात; " सीघ्रचि कवित्व जोडिले। दृष्टी पडिलें तेंचि वर्णिलें। भक्तिवांचून जें केलें। त्या नांव धीटपाठ॥ कामिक, रसिक, शृंघारिक। वीर हास्य प्रस्ताविक। कौतुक विनोद अनेक। या नाव धीटपाठ॥ मन जालें कामाकार। तैसेच निघती उद्गार। धीटपाठें परपार। पाविजेत नाहीं॥ " शिवाय आपल्या काव्यावरील मताच्या समासाच्या उपसंहारात श्रीसमर्थ लिहितात, " जेणें सद्वस्तु भासे। जेणें भास हा निरसे। जेथें भिन्नत्व नासे। त्या नांव कवित्व॥ जेणें होय समाधान। जेणें तुटे संसारबंधन। जया मानिती सज्जन। तया नांव कवित्व॥" या नियमांत संतांनी भक्तिपर काव्यास पहिल्या नंबरचे गुण दिलेले आढळतात, व ते काव्य सोडून बाकीचें काव्य हीन स्वरूपाचें होय असें त्यांनीं आपलें मत दिलेलें दिसते. परंतु विसाव्या शतकांत विचार करतांना हें लक्षात ठेवावयास हवें आहे कीं तो त्या काळाचा प्रमुख विचार होय. आदर्श व ध्येयें हीं बदलत्या काळानुरूप बदलत आली आहेत व यापुढेंहि बदलतील. अत्यंत हीन अशा निराशामय परिस्थितीत विरंगुळा म्हणून सारे संत भगवद्भजनाकडे वळले असें एक प्रबळ मत आहे. एवढेंच नव्हे, तर त्याच्याहि पुढें जाऊन असें म्हणावेसें वाटतें कीं ह्यांतील कित्येक संतांनीं हतबल झालेल्या जनतेला भक्तिमार्गाच्या आशामय मार्गानें धीर देण्याचें व संकटास हंसतमुखानें तोंड देण्याचें राष्ट्रीय कार्य केले. येथें पुष्कळच मतभेद होण्याचा संभव फार. या वादग्रस्त प्रश्नाचा ऊहापोह करण्याचें हें स्थल नव्हे. परंतु विरंगुळा व प्रेरणा देणें हे संतकाव्यांतील गुण नेमके साऱ्यांच्या भक्तिपर काव्यांत सांपडतात, एवढें म्हटलें म्हणजे पुरे. हताश राष्ट्रीय परिस्थितीनें गांजणूक झाल्यावर ते परमेश्वराचा धांवा करतांना दिसतात. संकटकालीं भगवंताचें साहाय्य अवश्य हवें या भाविकतेनें त्यांचें मन ओथंबलेलें असून त्याकरतां ते आत्मशुद्धीसाठीं टाहो फोडीत आहेत, असें आढळतें.

'पत्री'चें समर्पण साने यांनीं श्रीरामचंद्रमाउलीच्या पवित्र पदांवर केलें आहे. अंत:करणामध्ये चाललेल्या अनंत झगडयांमुळें किती तरी आशे-निराशेचे क्षण त्याना भोगावे लागतात. परंतु त्या सुखदु:खांतील मानसिक परिस्थिति परमेश्वराला कळावी ही खरी आस्तिक मनीषा असल्यामुळें हृदय-सागरामध्ये उचंबळणाऱ्या ह्या लाटांतील एकच बिंदु 'पत्री'च्या नामानें त्यांनीं श्रीरामचंद्राला समर्पण केला आहे. एवढेच नव्हे, तर 'पत्री'तील एक तृतीयांश भाग भक्तिपर असा आहे. श्रीरामचंद्राची अभिनवतम, रमणीय व गुणनिधान मूर्ति स्वत:च्या हृदयसिंहासनावर सदासर्वकाळ विल-सत राहो ही त्याची अपेक्षा. श्रीरामचद्राची उपासना म्हणजे सामर्थ्याचीच पूजा. दंभ, दर्प, काम, क्रोधादि विकारांनी ज्ञानमार्गावर पसरणाऱ्या अंधा-राचा नाश जर व्हावयाचा असेल, तर तो श्रीराममूर्तीच्या उपासनेनेच, ही त्याची श्रद्धा. भक्तिभावाचा गंध, सद्विचारांचीं सुमने, व मंगलमय गाय-नाचे मंत्र गाऊन प्रभूची पूजा बांधणे ही त्याची पावित्र्यपूर्ण वासना. आपली मतिमलीनता धुतली जाऊन खरें सात्विक प्रेम अंतरंगामध्यें भरावे, आपला जीव संतसंगीं जडावा, अहंकार जळून जावा व हृदयांत ज्ञानदीप तेवावा ह्यासाठी त्याचा जीव तळमळत असलेला प्रत्येक काव्य-पंक्तींतून दिसून येतो. त्याकरता तेज:सिंधु प्रभूजवळ एका प्रकाशबिंदूची, किरणाची ते याचना करतांना दिसतात–

'मम जीवन हरिमय होऊं दे'

यांत आत्मसमर्पणभक्तीची सीमा पहावयास सांपडते. तर—

'तंव अल्प हातून होई न सेवा'

या पद्यांत दास्यभक्तीनें कवीचें मन भरून आलेलें दिसतें. 'सेवा करावी, सेवा करावी' असें तोडाने बोलणे मात्र होते व प्रत्यक्ष सेवा मात्र लवमात्र होत नाहीं म्हणून त्यांना खंत वाटते. जनताजनार्दन दु:खानें आर्त होऊन किती तरी शोक करीत आहे. तरी त्याची त्याना सेवा करतां येत नाहीं म्हणून त्याना खंत वाटते. हृदयांत, वदनात सेवेचा उच्चार असला तरी ती हातानें घडत नाहीं म्हणून त्यांना खंत वाटते.

परमेश्वराला 'आई' अगर 'माउली' म्हणून प्रेमळपणानें हांक मारणें ही पद्धत संतवाङ्मयापासून मराठींत रूढ आहे. परमेश्वराशीं सख्य जुळ-

विण्याकरतां त्याच्याशीं सर्व प्रकारचीं नातीं कल्पिण्यांत संतवाङ्मयांत तर संतांची चढाओढ लागलेली दिसते. ' ये ग ये ग विठाबाई। माझे पंढरीचे आई!' ही संतोक्ति महशूरच आहे. भगवंतसदनाला माहेर कल्पून साने म्हणतात—' ये ग आई। मज माहेराला नेई.'

त्याच परमेश्वराचें अर्चन करतांना ते म्हणतात, " मी पूजा कशी करूं? माझें घर पडकें आहे, मजजवळ सुमनांऐवजीं अश्रूंचा हार आहे, संगीता-ऐवजीं सुस्कारे आहेत, अमृताऐवजीं नैवेद्यासाठीं माझें अपयश आहे! मोत्यें फेंकून!—देवा–मीं माती जमा केली आहे; परंतु तुझ्या स्पर्शानें ते मृत्कण माणिकराशी होतील!"

' असो तुला देवा! माझा सदा नमस्कार ' ह्या कवितेंत परमेश्वराला वंदन करीत असतांना ते त्याला मोठा दाता समजतात. खरोखर परमेश्वरा-एवढा दानशूर कोणी तरी आहे का? मुळींच नाहीं. परमेश्वरानें कृपा केल्या-वर फत्तराचीं फुलें होतील, मातीचीं मोतीं होतील, सर्पाचा रम्य हार होईल, अंधःकाराच्या ठिकाणीं आशारूपी सुप्रभात होईल, हलाहलाचें अमृत होईल, पंगूंचे धडधाकट होतील! अशा उदार परमेश्वरानें जर वक्रदृष्टि केली, अव-कृपेचा अंधार केला, तर त्याच्या उंबरठ्यावर प्राणार्पण करावयाची तयारी त्यांनीं ' निराधार ' या कवितेंत दाखविली आहे. त्याचें मन खरोखर फुलां-प्रमाणें किंवा दंवाप्रमाणे हळवें आहे. सर्पाप्रमाणें घातक अशा कठोरांच्या संगतीनें व सहवासानें तें निराशतें, रडतें आणि त्यामुळेंच त्याला परमेश्व-राच्या कृपाछत्राची आवश्यकता, व सांवलीची जरूरी भासूं लागते. त्याची सांवली असल्यावर सारी सृष्टि बदलावयास काय उशीर? सुकलेल्या फुलांचा संभार परमेश्वराच्या सहाय्यानें, कृपेनें तत्काळ फुलतो. आजूबाजूस चालू असलेला गदारोळ जागच्या जागीं थांबतो; अंधकाराचा नाश होऊन प्रकाश–किरणें दिसूं लागतात; अविवेकाचीं अभ्रपटलें नाश पाऊन सुविचा-राच्या तारकांच्या राशी अंतरंगामध्यें चमकूं लागतात, विकारांची बोळवण झाल्यानें हलके हलके हृदय मोकळें होतें व सद्भावनेचा उदय होऊन मनुष्य परमेश्वराच्या जास्त जास्त जवळ जातो. या श्रद्धेनें व भाविकतेनें साने पूर्णपणें भारावून गेलेले दिसतात. त्यांची ही श्रद्धा अचल आहे. त्यांची नम्रता मानी व विशाल आहे. त्यांचे विचार भव्य आहेत. त्यांचे उच्चार

प्रेमळ आहेत. त्यांचा आचार सात्विक आहे. प्रभु रामराय हा त्यांचा बोध, विवेक, विसावा आणि आधार. राम हेंच त्यांचें संगीत. राम हेंच त्यांचें खान. राम हेंच त्यांचें पान. राम हेंच त्यांचें स्थान. राम हाच त्यांचा मान. राम हेंच त्यांचें सौख्य. राम म्हणजे त्याचें काय नाहीं? ज्याप्रमाणें पंखाविना पांखरूं, गाईविना वांसरूं, सूत्राविना पतंग, आईविना मूल, चंद्रिकेविना चकोर, वसंताविना वन, पिकाविना वसंत व वसंताविना पिक, जलाविना मीन त्याप्रमाणें रामरायाविना ते स्वत: होत.

त्यानंतरच्या, रामरायाच्या कृपेची याचना करतांना श्रीसमर्थांनीं ज्या प्रकारची करुणा भाकली व 'तुजवीण रामा मज कंठवेना' अशा आर्त स्वरूपांत आपलें करुण गायन केलें, त्याच प्रकारची करुणा भाकून साने यांनीं करुणगायन केले आहे.

' प्रभो दीन दासा तुझ्या तार तार. ' असें आर्त स्वरांत गातांना ते म्हणतात, " माझ्या दुःखानें, श्रमानें माझें चित्त जळून जातें. माझ्या नेत्रांतील अश्रूंची धार कोण पुसणार? निर्जन वनामध्यें ज्याप्रमाणें दीप-दर्शन व्हावें पण क्षणांतच तो दीप नाहींसा व्हावा, त्याप्रमाणें मनामध्यें आलेल्या सद्विचारांचे होतें. षड्रिपूंच्या गाजणुकीनें, वासनांच्या भुकेनें मी अहोरात्र खिन्न असतों. अन्न रुचत नाहीं; निद्रा येत नाहीं; तेव्हां या सर्वांचें नाशन तुझ्यावाचून कोण करणार? माझ्या नेत्रांमध्यें निर्मळा, प्रेमळा वृत्ति वाढव व माझ्या मुखांत नेहमीं पुण्यमय शब्द येऊं दे. मना-मध्यें नित्य सद्विचार नांदोत. माझा विकास होवो हीच माझी प्रार्थना. "

प्रभु रामचंद्राच्या पायाशीं करुणा भाकतांना सानेगुरुजींनीं आपल्या परमेश्वरभक्तीचें ध्येय 'विकास' हे सांगितलें आहे. श्रीरामचंद्राचें उज्ज्वल चारित्र्य त्यांनीं आपल्यापुढें ध्येय म्हणून ठेविलें आहे व त्याची सेवा करून त्याचे गुण अंगीं बाणविण्याचा त्यांचा निर्धार दिसून येतो. दुष्टांचें निर्दालन व सज्जनांचें पालन, पापांचा नाश व सद्विचारांचा विकास हेंच प्रभु राम-चंद्राचें अवतारकार्य होतें. त्या अवतारकार्याचा अल्पांश तरी आपल्या हातीं लागावा, हेंच साने यांच्या परमेश्वरभक्तीचें मर्म होय. विसाव्या शतकांतील महाराष्ट्रांतील ते श्रीसमर्थ रामदासस्वामी होत असें मी म्हणेन. स्वार्थत्याग, सेवापरायणता व साधुवृत्ति हे त्यांच्या स्वभावांतील विशेष त्यांच्या 'पत्रीं'-

तील भक्तिपर गीतांतून दिसून आल्यावाचून राहत नाहींत. त्यांना अंतः-शुद्धीची तळमळ लागली आहे. त्यांचीं भक्तिपर गीतें वाचताना त्यांची भूमिका संतांची होय हें अधिक स्पष्ट होतें.

भरो विश्वात आनंद । शाती नादो चराचरीं
म्हणून जळती संत । महात्मे भास्करापरी ॥

अशा स्वरूपांत संतांचें वर्णन करतांना त्यांनीं माडलेले विचार स्वतः आचरणात आणण्याचें कार्य ते कसोशीनें पार पाडीत आहेत. त्यांच्या साधुवृत्तीने व निरहंकारी नम्र स्वभावानें त्याना कधीं काळीं सामाजिक छळहि सहन करावा लागेल, अशी भीति वाटते. परंतु संताच्या साधुवृत्तींत ज्या प्रकारची अहिंसात्मक सोशिकता होती, ती त्यांच्यात पूर्णपणें वसत असल्याकारणाने सूर्यावर थुंकणाऱ्या निंदकांच्या थुंकीचे फवारे त्याच्या स्वतःच्याच अंगावर उडून ते आपलें हंसें करून न घेवोत,एवढेंच. सौख्यानें गाद्या गिरद्यावर लोळणे म्हणजे संतांना कंटकमय शय्यासुख घेण्यासारखें. संत स्वतः मेणबत्तीप्रमाणे जळून दुसऱ्याला प्रकाश देतात. आपल्या सुखाची रक्षा करून दुसऱ्याला सुखाचा अंगारा देतात. परदुःखभूमींत ते आपल्या सुखाच्या रक्षेचे खत घालून ती गोड करतात, फुलवितात. जनताजनार्दनाच्या जीवन-वृक्षाला आनंदाचीं फळें लागावींत म्हणून स्वतः नित्य खंत करतात. सुखासीन विलासांत त्यांना आपलें मरण दिसतें. आणि त्यांना मरण्यांत मौज व जळण्यांत जीवनाचें सार सांठविलेलें आढळतें. दुसऱ्याच्या सुखाकरतां स्वतःच्या सौख्याची होळी करून जळणारे संत स्वतः जळून दुसऱ्याला प्रकाश देणारे प्रतिभास्कर होत. साऱ्या विश्वांत हेंच उदात्त तत्त्व आपणांस विखुरलेलें दिसत नाहीं काय ? वायु हा दुसऱ्याकरतां वाहतो, मेघाच्या राशींनीं ओटींत भरून आणलेलें धन स्वतःसाठीं नसतें, अहोरात्र दुसऱ्याला सुखविण्यास उभे राहणारे वृक्ष आपली रक्षा करून घ्यावयासही तयार असतात. पर्वत, नद्या, सुमनें, तृणें, फळें, धान्य, भवनें, वनें याचें कार्य स्वतःचा स्वतःच उपभोग घेणें हें नसून दुसऱ्याला सुख देणें हेंच नव्हे काय ?

स्वतःच्या स्वार्थावर पाणी सोडून दुसऱ्याच्या सुखाकरतां आपल्या सुखाची होळी करणें, हें उदात्त तत्त्व पूर्ण भारतीय होय. आज या तत्त्वाची

टवाळी होत आहे. स्वार्थ साधणें हा आजच्या भौतिक जगताचा पुरुषार्थ आहे. पण एक दिवस असा येईल कीं, ऐहिक सुखाच्या पाठीला लागलेला तंत्रसत्ताकवर्ग या उच्च तत्त्वापुढें नम्र झालेला दिसून येईल. हें स्वप्न ठरूं नये. कालगतीच्या ओघात कोणकोणत्या घडामोडी होतील याचें नक्की निदान करणें सामान्य माणसाच्या आंवाक्याबाहेरचें आहे. साने यांनीं वरील तत्त्वाचें नुसते गायन केलेले नसून आचरणहि केलेलें आहे, एवढें सागितलें म्हणजे पुरे.

## सांसारिक काव्य

साने याचा संसार भारतवर्षाचा आहे. संसार हा शब्द त्यांच्या काव्याशीं संलग्न करावयाचा असेल, तर त्याचा व्यापक अर्थच घ्यावयास हवा. ते भारताकरता आपल्या जिवाची पायपीट करतात. ते स्त्रीजातीकडे माता व भगिनी याच्या नात्याने पाहतात. त्याच्यापेक्षा वयानें मोठी असलेली माणसें त्याना पितृतुल्य, तर समवयस्क म्हणजे त्याचे भाऊच व लहान मुले म्हणजे हंसणारीं व बागडणारीं फुलेच ! ही त्याच्या संसाराची रूपरेषा एकदा मनांत कायम केली, म्हणजे त्याच्या सासारिक काव्याविषयीं आस्था उत्पन्न होते. नाही तर ते एकांगी व अपूर्ण वाटावयास लागतें,हा दोष प्रथम कबूल केल्याशिवाय पुढे पाऊल टाकता येणार नाहीं. श्री समर्थांनीं लहानपणींच त्यांना त्यांच्या सचिंतपणाविषयी प्रश्न विचारल्यावर उत्तर केले होतें कीं, "चिंता करितों विश्वाची." साने याच्या सासारिक अडचणी घरगुती नव्हत, तर भारतीय आहेत. ते भारताच्या संसाराची अहर्निश चिंता करीत असतात. त्याच्या संसाराची व्याप्ति जशी विशाल, तशाच त्याच्या चिंता पण मोठ्या आहेत. या दृष्टीने त्याच्या सासारिक जीवनातील दुःख फार मोठें आहे. अशा प्रकारची कल्पना नीट रीतीने मनाशीं बाधून घेतल्यावर मग त्याच्या सांसारिक काव्यांतील भावना तपासून पाहणें सोयीस्कर होय. त्याच्या ह्या संसाराचा सहृदयतेने विचार केला, तरच त्याचा रसास्वाद घेतां येतो. नाहीं तर आपण त्यांच्यापासून दूरदूर जातों, हें प्रथमच सांगून ठेवणें आवश्यक ठरतें.

ते 'फुलामुलांचे कवि होत' असें म्हणणें योग्य होईल. खि. ना. वा. टिळक यांना ही संज्ञा लावण्यांत येते. त्यांचेच शिष्य कै. बालकवि यांनीं

तर आपल्या निर्झरगीतानें महाराष्ट्राला कित्येक वर्षें वेड लाविलें होतें. साने यांनीं पद्यापेक्षां गद्यात तर बालकांच्या भावनांचीं चित्रें अधिक उमटविलेली आहेत. त्यांनीं बालकांना आपल्या गोड गोष्टींनीं हंसविलें, रिझविलें व रडविलें.त्यांचा श्याम व त्याची आईही मराठी वाङ्मयांत अजरामर होऊन बसलीं आहेत. त्याचें आदर्श बालक म्हणजे धडपडणारें मूल. बालकांच्या निष्पापतेची त्यांना मोहिनी पडते, नव्हे हेवा वाटतो. एकदां एक मुलगा त्याच्याकडे गंमत दाखवायला म्हणून आला असतां त्यानें आपल्या खिशांतून चार फुलें काढून त्याच्यापुढें धरिलीं. त्यातील तीन फुलें टवटवीत होतीं व चवथें मात्र मलूल व कोमजलेलें होते. परंतु तीं चारहि फुलें तो हर्षित होऊन दाखवीत होता. त्या तीन वर्षांच्या बालकाच्या मनांत 'फुले' म्हटलीं म्हणजे सारख्याच एकतानतेने बघावयाची प्रवृत्ति कशी साहजिकच होती, याचें चित्रण त्यांनीं—

'परी बाळाला सकळ तीं समान'

या भावकवितेंत केलेलें आहे. लहान मुलांच्या पाखरासारख्या जीवनाचा जिव्हाळा व खेळकरपणा आपल्या ठायीं सतत राहावा व प्रसंग प्राप्त झाल्यास आपलें ऊर्वरित आयुष्यहि त्यांना मिळावें अशी त्यांची आपल्या ह्या 'लहान मित्राबद्दल' मनीषा आहे. बालकाची दृष्टि निर्मळ व मुखमंडल प्रसन्न असतें, त्याच्या वाणींत सदोदित प्रेमगंगा वाहते. तें कधीं कोणाचा मनोभंग करीत नाहीं. त्याची कार्यशक्ति अदम्य असून हृदय हळुवार फुलाप्रमाणें रम्य असतें. त्याचें शील निष्कलंक असून त्याला रावरंक हे सारखे असतात. त्याला हेवादावा नसतो व स्वतःचा दर्पहि नसतो. त्याच्या अंतरंगांत सद्विचार व कृतींत सदाचार असतो. स्वतःचा अपराध घोर मानून दुसऱ्याचा तें पोटात घालतें. दुसऱ्याच्या गुणांचें गायन करून तें सदा सेवेला तत्पर असतें. सर्व बालकाच्या ह्या गुणामुळेंच त्याना तीं आवडतात व त्यांच्या सुखदुःखाशीं तन्मय होतांना ते आपणांस दिसतात. जगांत मुलें नसतीं तर काय झालें असतें, याबद्दल त्यांचे विचार 'कसें तरी मग जग दिसतें!' या कवितेंत स्पष्ट झाले आहेत.

नसतीं जगिं या जरी मुलें
नसतीं जगिं या जरी फुलें

नसते अंबरिं वरि तारे
नसते गाणारे वारे
कसें तरी मग जग दिसतें । हें मन्मतिला ना कळतें ॥ .

जगामध्यें जल, रवि, तरुवेल, दिनरजनी, ही पृथ्वी, धनधान्य, विहंगम कृषिवलांचे सोबती, प्रेमळ माता, प्रेमसुधेच्या सरिता, परोपकारी जीव, कृतज्ञता, बंधुभाव, अश्रु व हास्य इत्यादि गोष्टींची वानवा असती तर हें जगांतील जीवन रुक्ष झालें असतें. वरील अनंत गोष्टी जगांत आहेत म्हणूनच येथें जगणें आहे हें साने यांचें मत मुले व फुलें यांच्याबद्दल त्यांच्या मनः-कोषात वसत असलेल्या प्रेमामुळे झालेलें आहे. या साऱ्या गोष्टींनीं पृथ्वीवर रमणीयता आणली आहे. यांतील एखाद्या गोष्टीला जरी दंश झाला, तरी त्यांचें हळुवार मन कसें हळहळते याचीं मोजकीं दोन उदाहरणें येथें स्पष्ट-पणें देणें आवश्यक आहे. तीं म्हणजे त्यांची ‘ लहानपणची आठवण ’ व ‘गाईची करुण कहाणी’ हीं दोन होत.

एकदां ते लहानपणीं अंगणामध्यें आनंदानें खेळत असतांना एक पांखराचें पिलूं टपकन् अंगणांत पडलें. ते करुण दृश्य पाहून त्यांचे डोळे ओलावले. त्या आसन्नमरण पिलाला उचलून घरांत आणल्यावर त्याची त्यानीं सुश्रूषा केली. उंचावरून पडल्यामुळें तें चागलेंच हबकत होतें. त्याच्या यातना पाहून याना यातना सुरू झाल्या व त्या स्थितींतच त्या पिलाचा अंत झाला.

मृदुल ती मान । टाकून पडलें
हृदय रडलें । माझें किती ॥

एवढें झाल्यावर त्या पिलाची माता डहाळीवरून खालीं आली. तिनें माती हुंगली व पिलास प्रदक्षिणा घालून ती परत गेल्यावर झाडावरून तिनें आर्त स्वरांत टाहो फोडला. ज्या मोगऱ्याजवळ त्या पांखराला पुरलें होतें, तेथें ते दररोज जावयाचे. आणि त्या पाखराचें त्यांनीं दहा दिवस सुतक पण पाळिलें.

‘ गायीची करुण कहाणी ’ यांतहि त्यांचें विश्वप्रेमानें हळहळणारें नाजुक मन दिसतें. हा अंमळनेर स्टेशनजवळ घडलेला प्रसंग. गाय व्याल्यावर आपली चंगळ होईल या विचारांत घरांतील मुलें होतीं. तिच्या केंसासहि

कोणी धक्का लावावयास नको म्हणून तीं सारीं जपत होतीं. परंतु गाय फिरावयास गेली तर तिला चांगला चारा मिळून तिचें पोट चांगलें भरेल असे पित्याचें म्हणणें असल्यामुळें त्याने तिला चरावयास मोकळें सोडलें. रात्रीं दहाचा तो समय होता. प्रसवसमय जवळ आला. तिच्यानें पाऊल टाकवेना. वेगात धावत येणाऱ्या आगगाडीनें तिचा तिच्या कोंवळ्या पिलासह चेंदामेदा केला व तेथें फक्त रक्ताचें तळें तुंबलें ! त्या गाईची ती आपदा पाहून पत्थरालाहि पाझर फुटला असता, तर मग 'कसें तरी मग जग दिसते ?' असा प्रश्न विचारून जल, रवि, धन, धान्य, वृषभादिकाकडे कृतज्ञतेनें पाहणाऱ्या साऱ्याना किती दुःख झाले असेल याची केवळ कल्पनाच करणें बरें. सर्व प्राणिमात्रात संचार करणाऱ्या ईश्वराशावर आलेलें संकट पाहून ते स्वतःच असे हळहळतात. त्याना साऱ्या विश्वावर प्रेम करावेंसे वाटते. त्याचबरोबर विश्वांत पसरलेला विषमय द्वेष विषाद उत्पन्न केल्याशिवाय राहत नाहीं, हे तितकेच खरें. भूतकाळ 'भविष्यकाळाला गाणें' म्हणताना हेंच सुचवितो. 'प्रेमाचें गाणें' या कवितेत भविष्यकाळाला भूतकाळ 'तूं आपलें हृदय प्रेमानें शृंगार' असें सांगतो आहे. आतापर्यंत तर सूडबुद्धीने येथें थैमान घातलें. परंतु तूं येशील तेव्हां तरी प्रेमाचा सुकाळ कर ही त्याची व साने यांची इच्छा.

## जीवनविषयक दृष्टिकोन

'कशासाठीं जगावे ?' या आशयाची साने यांनीं एक इंग्रजी कविता वाचली होती तिचा त्यानीं आपल्या सुबोध भाषेंत अनुवाद केलेला आहे. त्या कवितेंत प्रतिपादन केलेलें तत्त्वज्ञान त्याचें स्वतःचें नसलें तरी तें त्यांना मान्य आहे म्हणूनच त्याचा उपयोग करून घेणे प्राप्त आहे. त्याशिवाय ते त्या कवितेचा अनुवाद करण्यास उद्युक्त झालेच नसते. जीवनात काहीं अर्थ आहे काय ? या प्रश्नाला 'आहे' असेंच उत्तर त्यांनीं दिलें आहे. जोंपर्यंत चिंता, व्याधि, दुर्दशा, अज्ञान, दारिद्र्य, उपासमार, मत्तजन, दुष्ट रूढी, धार्मिक छल याचें वास्तव्य जगांत आहे तोंपर्यंत हा, विपद्दुःखाब्दि तरण्यासाठीं स्वतःच्या जीवनाचा माणसानें सेतु उभारावयास हवाच हवा. सारें भुवन साने यांच्या दृष्टीला वरील करणानें भेसूर दिसतें व:त्यामुळेंच सर्वत्र ढोंगी-

पणा ठेंचून भरला असल्याबद्दल ते 'मयसभा राहिली भरून' या आपल्या कवितेंत तक्रार करीत असल्याचें दिसतें.

जें दिसत असे रूप वस्तुचें वरुन
तें आंत न येतें दिसुन.

हें त्यानीं जीवनाविषयी गाइलेल्या सारभूत काव्याचें धृपदच समजावे. जगाचा धर्म दंभ असून त्याचें कर्म उलटेंच आहे. ज्ञानदान करणारा आपणांस गुलामगिरीत लोटीत आहे. समत्वगीतें गाणारे स्वातंत्र्यवादी लोक आमच्या मातृभूमींत त्याच तत्त्वाने खून पाडीत आहेत. एकीकडे शांतीचीं सूत्रें गाणारे दुसरीकडे तोफाच्या गायनाचा सूर धरीत आहेत. तोंडानें स्वातंत्र्याचे पोवाडे गाणारे व एका हातानें स्वतंत्रतेचे पुतळे उभविणारे दुसऱ्या हातानें तिला थडग्यात कोंबताना दास्यत्वाचें मीठ तिच्या मढ्यांत भरीत आहेत. अशा भीषण परिस्थितींत सुंदर पुष्पहार म्हणून हात लावावयास जावें तर त्याचे प्राणघातक विषारी सर्प होणार. सुंदरशा सरितेंत निमज्जन करावयास जावें तों तेथें भोवऱ्याच्या चक्रांत सापडणार. अमृताचा पेला ओठाशीं लावावा तों त्याचें विष होणार. मखमाली हिरवळीवर पहुडावें तों तेथें गोखरानीं सारे अंग टोंचलें जावें, अशा ढोंगी जगांत जगावें कशासाठीं, तर परदुःखनिवारणार्थ आपल्या जीवाचा सेतु करण्यासाठीं. हें त्यांचें जीवनाविषयींचें तत्त्वज्ञान आहे. वागावें कसे तर मेघासारखें. 'मेघाचें जीवन' या कवितेंत त्यांचें हें मत अधिक स्पष्ट झालें आहे.

कधिं तरि पूर्णत्वा पाहीन
रसमय अंतर्बहि होईन
सेवा करुनी मग राहीन—

अंगावर दुःखाचें काळें कांबळें घेऊन हृदयामध्यें चिंताचपला जळत असलेल्या मेघाला क्षणाची तरी शांति लाभते काय ? मुळींच नाहीं. साने यांना मेघाचें जीवन हवें आहे. सेवा हाच मेघाचा धर्म. साने यांना मेघाचाच धर्म हवा आहे. सच्चित्पद हेंच मेघांचें ध्येय. साने यांचें तेंच ध्येय आहे.

गळेल शिणलेली तनु यदा
सिंधुंत बुडेल हा बुडबुडा
मिळविन मंगल सच्चित्पदा

आपलें जीवन कसें आहे याचें समर्पक उत्तर याहून निराळें असूं शकत नाहीं असेंच सान्यांना सुचवावयाचें आहे. हेंच त्यांचें कार्य.

'जीवनांतील दिव्यता' गातांना ते म्हणतात—

सुखास नाहीं मुळिं तोटा।
संसार नसे हा खोटा।
दृष्टि करावी निज पूत।
निराळेंच मग जग दिसत.

जीवनांत दिव्यता आहे. जीवनांत काव्य आहे. जीवन जगण्यांत मौज आहे. माणसानें मात्र अमोलिक माणिक मोतीं जमा केलीं पाहिजेत, तरच त्याचें जीवन सुखकर होईल. हीं माणकें कोणास पळवून न नेतां आलीं पाहिजेत. मुलावरील मातेचें व मातेवरील मुलाचें, बहिणीवरील भावाचें व भावावरील बहिणीचें, मित्रावरील मित्राचें, पत्नीवरील पतीचें व पतीवरील पत्नीचें, शिष्यावरील गुरूचें व गुरूवरील शिष्याचें, स्वामीवरील सेवकाचें व सेवकावरील स्वामीचें प्रेम हीं माणिकमोतीं डोळे उघडे ठेवून माणसानें जमा केलीं पाहिजेत. तृषार्ताला जर पेलाभर पाणी पाजलें, क्षुधार्ताला जर अन्नाचा कण दिला, ज्ञानपिपासूला आपल्याजवळ असलेलें ज्ञान जर सढळ हातानें दिलें, तर त्याच्या वदनावर जी कृतज्ञता नाचूं लागते व त्यामुळें जी भाषा तो बोलतो, तीहि माणिकमोतींच ! अशीं अमोलिक रत्नें माणसानें जीवनांत जमा केलीं पाहिजेत. परमेश्वराचा खरा हेतु जर पूर्ण करावयाचा असेल, तर माणसानें आपलें जीवन सत्य व मंगल अशा गोष्टी करून खुलविलें पाहिजे. हृदय सुविचारी ठेवून सारें विश्व सुखानें भरून टाकण्यासाठीं आपल्या जीवनाचें मोल द्यावयास तयार झालें पाहिजे. आपली दृष्टि सरळ केल्यावर आनंदाला तोटा नाहीं.

जीवन कसें जगावें हें पाहिलें. आतां साने याना कशा प्रकारचें वैयक्तिक जीवन हवें, हें पाहिलें म्हणजे झालें. त्यांच्या जीवनाचें 'विकास' हें प्रमुख ध्येय आहे. त्याकरतां ते सेवा अगर स्वतःच्या जीवनाचा होम करावयासहि तयार आहेत. परंतु विकास हवा असल्यावर तो सौख्यांत कसा होणार ? दुसऱ्याचें जीवन सुखी करतांना आपलें जीवन सुखी कसें करणार ? आपल्या

सौख्याचें मोल देऊनच परोपकारी लोकांना दुसऱ्याच्या जीवनांत फुलबाग फुलवावयाची असते.

फुले तरू सेवुन उष्णशीत।
जगीं असे हीच विकास रीत॥

आपल्या 'विपत्ति देतीहि हवी विकासा' या कवितेंत साने यांनीं स्वतःला कशा प्रकारचें जीवन हवें आहे याचा खुलासा केलेला आहे. पीक भरभरून यावयास उष्णतेची व पाण्याची जरूरी असते. बालकाचा मनोविकास करावयाचा असल्यास माता त्याला प्रसंगीं रागावते देखील. माणसावर प्रसंग आल्याशिवाय त्याला स्वतःच्या कार्यशक्तीची व इतरांना त्याच्या प्रामाणिकपणाची जाणीव तरी कशी होणार ? विपत्तींतच विकासाचें बीज असतें. नीलवर्ण मेघांतून ज्याप्रमाणें विद्युल्लतेचा लखलखाट होत असतो,त्याप्रमाणेंच विपत्तींतून खरे तेज प्रगट होत असते. विपत्ति जीवनाला रुचि आणते. विपत्ति स्फूर्ति देते. परंतु ती सदैव मात्र नको. माणसाच्या जीवनांत संकटांची जरूरी आहे, पण त्यांची परंपरा मात्र नको. नाहीं तर त्याला मान वर काढावयास अवसर सांपडणें अशक्य. विपत्तीची जीवनांत साने माफक प्रमाणांत मागणी करतात. आणि तेंच रास्त आहे. राष्ट्रावर आलेल्या विपत्तींतूनच नवें तेज निर्माण होतें हें त्यांच्या जीवनातील विपत्तींचें सारभूत तत्त्वज्ञान आहे.

## सामाजिक प्रश्न

हिंदुस्थानांतील सामाजिक प्रश्न हा राजकीय प्रश्नाइतकाच दुर्गम आहे. एवढेंच नव्हे, तर राजकीय प्रश्नसुद्धां, सामाजिक व धार्मिक प्रश्नांचा उकल होत नसल्याकारणाने, स्थगित होऊन बसला आहे. असंख्य जातिभेद, अस्पृश्यता, दारिद्र्य, भांडवलशाही विरुद्ध मजुरांचें व गरिबांचें जीवन, शेतकऱ्यांचें अज्ञानी व परंपरागत पराभूत जीवन, श्रमजीवि लोकांचें दैन्य, रूढी इत्यादि एक ना अनेक सामाजिक व तदंतर्भूत असलेलें कटकटीचें आर्थिक जीवन या साऱ्या काड्या आज राजकीय स्वातंत्र्यरथाच्या चक्रांत अडकून त्याची गति स्थगित करीत आहेत. सामान्य माणूस तर ही अनवस्था पाहून दिङ्मूढच होऊन जातो.

उदाहरणार्थ हिंदुमुसलमानांचा प्रश्न घ्या. हिंदूंचें व मुसलमानांचें जीवन हिंदुस्थानांत एकजीव झालें, संवादी झालें, तरच हिंदुस्थानचा तरणोपाय आहे. परंतु हा मोठाच अवघड प्रश्न होऊन बसला आहे. निदान तो तसा करण्यांत खास आला आहे. यांतून खरा मार्ग म्हणजे एकी. व एकी हा दोघांहि जमातींचा खरा मोक्ष आहे. खरा धर्म प्रेमांत आहे. भांडणांत नाहीं. हा आदर्श साने यांनीं 'प्रेमधर्म' या आपल्या कवितेंत प्रतिपादिला आहे.

तो एक खरा प्रसंग आहे. सायंकाळची गाडी गांठून साने प्रवासाला निघाले होते. गाडींत नाना जातींचे व पंथांचे लोक होते. एका मुसलमान बाईच्या शेजारीं एक गरीब कुणबीण बसली होती. तिचें एक लहान बालक होतें. तें अतिशय रडूं लागले. चहा, चिरुट, चिवडा, भजीं यांचे भक्त तिच्यावर गुरगुरूं लागले. परंतु त्या गरीब बिचाऱ्या कुणबिणीचा नाइलाज होता. तिला तें असह्य झाले व ती हताश झाली. मुलाचें रडणे मात्र चालूच होतें. हे करुणचित्र पाहून त्या मुसलमान स्त्रीचें मातेचे हृदय कळवळलें व तिनें त्या मुलाला कुणबिणीपासून घेतलें व थापटून थोपटून शांत केलें. तिनें त्या बालकाला समजूत पटावी म्हणून टिचक्या वाजविल्या, दिवे दाखविले, हातांनीं नाचविलें, त्याचे हातपाय खाजविले, भाडी वाजविलीं, त्याच्या कानांत ' कुर्र ' केलें आणि

' रो मत् उगि हां बेटा अबी '

असें बोलून, वात्सल्यानें त्याला खेळविल्यावर तें मूल रडावयाचें थांबलें व नंतर आनंदानें खेळूं सुद्धा लागले. त्या गरीब कुणबिणीचें अंतःकरण कृतज्ञतेनें भरून आलें व तिचे डोळे पाणरले. भावनेचा ओघ ओसरल्यावर कुणबिणीनें आपल्या कृतज्ञतेला मूर्त स्वरूप आणण्यासाठीं पदरच्या गांठीस बांधलेलें सुपारीचें खांड त्या अम्मेस दिलें. माणिक मोत्यांच्या राशीहून, फार काय पण त्रिभुवनलक्ष्मीहून मौल्यवान अशी ती कृतज्ञतेची खूण होती. त्या प्रसंगीं तूं हिंदु अगर मी मुसलमान ही भावना त्या दोघीहि स्त्रिया विसरल्या. माता येथून तेथून एक. त्यांचा प्रेमधर्महि एक. साऱ्यांचें हास्य अगर अश्रु साऱ्यांनाच समजतात अगर ते हृदयें जोडतात. सगळ्यांवर आलेलें संकट सारखेंच भीषण असतें. ही जाणीव होत नाहीं म्हणून तर सारा कलि

आहे. परस्पराचे वैर विसरून, परस्पराच्या संस्कृतींतील हितकर मागल्याची पूजा ज्या दिवशीं सुरू होईल तोच दिवस भाग्याचा. परंतु हे एवढें कधीं होईल, हे मोठ्या आशेने साने विचारीत आहेत. जुनी प्रेते उकरण्यात व आग लावण्यातच मोठेमोठे गढलेले दिसत आहेत. वणवा विझवायचा सोडून त्यात तेल टाकणारेच फार. खोट्या स्वाभिमानाच्या व धर्माच्या कल्पनांनी आज माणसे नंदनवनात उदास व भकास स्मशानशोभा आणीत आहेत. हे थांबावे कसे ? हा अनर्थ बंद व्हावा कसा ? शांतीचे साम्राज्य हिंदभूंत नांदावे कसे व कधी, याचाच सान्याना प्रश्न पडला आहे.

## देशभक्तिपर कविता

याऩंतरच्या जवळजवळ दोनशे पृष्ठांतून साने यांचे राष्ट्रीय काव्य आपणास दिसून येते. 'सत्याग्रही' या खंडकाव्यासह त्यांच्या देशभक्तिपर कवितेत मातृभूमीबद्दल त्याना वाटणारें प्रेम ही एकच एक भावना सर्वत्र दिसून येते. प्रो. वा. भा. पाटक म्हणतात, " आधी केले आणि मग सांगितलें हा रामदासाची दंडक त्यांच्या कवनास लागू पडतो. म्हणूनच त्यांचीं राष्ट्रीय कवने वैशिष्ट्यपूर्ण उतरली आहेत. दे. भ. सावरकर, सेनापति बापट किंवा कवि गोविंद ह्यांनी लिहिलेल्या कवनात जो आवेश व जी स्फूर्ति दृष्टीस पडते, तिचे प्रत्यंतर श्री. साने यांच्या 'जा रे पुढे व्हा रे पुढे' 'नवयुवक तुफान झालो' इत्यादि कवनांतून आपणास मिळते कै. श्री. नी. चाफेकर लिहितात, "स्वातंत्र्य, राष्ट्राची सद्यःस्थिति व मातृभूमीच्या उद्धाराविषयीं तळमळ यासंबंधाच्या कविता अलीकडच्या कित्येक पोषाखी व सुखलोलुप कवींच्या कवितांप्रमाणे वरपांगी कळकळीच्या नाहींत, किंवा टरीव साच्याच्या खोडसाळ व अतिशयोक्तिपूर्ण नाहीत; तर ज्यांचा वरील गोष्टींशीं जीवनकार्यद्वारा प्रत्यक्ष जिव्हाळ्याचा संबंध निगडित झालेला आहे आणि तत्प्रीत्यर्थ ज्या व्यक्तीने स्वतः देहकष्टादि द्वारा खस्ता खाऊन, आश्रमादि जनता–शिक्षणकार्याला स्वतःला वाहून घेऊन आत्मार्पण करण्याचा सक्रिय उपक्रम चालविला आहे, अशा कवीच्या या राष्ट्रीय कविता असल्यामुळे खरे औचित्य व स्वारस्य त्यात आहे."

बहु भाग्यानें बहु पुण्यानें झालो तव संतान
तव सेवा मम हातुन होता हरपो माझा प्राण

अशा प्रकारची साने यांची भारतमातेची सेवा करताना मनीषा आहे. तळहातावर स्वतःचे शिर घेऊन स्वातंत्र्याचे पोवाडे गाणाऱ्या शाहीरांपैकीच साने हे एक होत. साने स्वतः मातृभक्त आहेत. त्यांच्या अंत:करणात जन्मदात्री माता, अन्नवस्त्र पुरवून सुखी करणारी भारतमाता यांच्याबद्दल सारखेच प्रेम वसत असलेले दिसते. त्यांचेच गायन ते आपल्या काव्यातून करतात. मातृप्रेमाचे इतके गायन कोणत्याच इतर मराठी कवींपैकी कोणी केलेले आढळत नाही.–" दान देऊन दीन झालेली, गतेतिहास दिव्य असलेली, मांगल्य व पावित्र्याची पवित्र खाण असलेली ' भारतमाता ' सकल जगाची मायमाउली, सकल जगाला आपल्या अमृतोपम प्रेमळ हाताने कुरवाळून निवविणारी, स्वहृदयाचे मळे पिकवून प्रेमाने बाळांना रस पाजणारी, जिची सेवा हातून घडत असताना मरणही सुधारस वाटावे अशी मनमोहन मूर्ति ' असणारी ' जगन्माता ". श्रीरामांनी व सत्वाढ्य हरिश्चंद्रांनी भूपविलेली; शिबी, मांधातादि भूपांनी पालन केलेली; श्री शिव, बाजीगाजीदि रणशार्दूलांची क्रीडाभूमि झालेली; राजर्षीची, ऋषीश्वरांची, वीरांची परंतु सध्या निःसत्त्व झालली ही भूमि; लावण्याची खाण असलेली ही ' भूमि '; प्राणांचीहि प्राण असलेली ही ' भूमि ', विकल दिवसात अनाथ व दुबळी झालेली ही 'भूमि' तिच्याच दुःखाने त्यांचे हृदय पिळवटून येते व ते त्वेषाने गर्जना करतात :

स्वातंत्र्याचे अम्ही शिपायी।
सुखवूं प्रियतम भारतमायी ॥ ध्रु० ॥
देशभक्तिचा सुदिव्य सोम
पिउन करूं प्राणाचा होम
कष्ट हाल हे अमुचे भाई
सुखवू प्रियतम भारतमायी ॥ १ ॥

त्याकरता त्यांच्या प्रत्येक कवितेतून त्यांचा निश्चल निर्धार दृष्टोत्पत्तीस येतो.

' आमचे कार्य ' या कवितेचें ध्रुपद हें की;—

आम्ही मांडूं निर्भय ठाण। देऊं हो प्राण।
स्वातंत्र्य–सुधेचे निजजननीला घडवूं मंगल पान ॥ धृ० ॥

त्यानंतर तयारी ही की,

स्वार्थाची करुनी होळी
छातीवर झेलूं गोळी
करुं मृत्युशिं खेळीमेळी
मातृभूमिच्यासाठी मोदे करु सारे बलिदान ॥ १ ॥

एवढी तयारी दाखविल्यावर साने यांची आणखी वाक्ये गोळा करून आणावयाची जरूरी नाही. त्यांच्या देशभक्तिपर काव्याचा इथून तिथून एकच सूर आहे. मरणाशी खेळीमेळी करणाऱ्या स्वातंत्र्यवीराचें तेजहि तितकेंच और असतें. तो जे बोलतो तसें तो करून दाखवीत असतो व जे सांगतो तें त्याने केलेलें असते. तो वाचीवीर नसतो. मग त्याच्या सांगण्यांत कितीहि खडखडाट असला तरी चालेल. त्याचे बोल मोलाचे असतात; कारण ते अनुभवाच्या भट्टींतून सोज्ज्वल रूप घेऊन बाहेर पडलेले असतात. साने यांचे तसेंच आहे. आणि हे त्याचे श्रेय कोणीहि हिरावून घेऊं शकणार नाहीं. त्यांच्या 'भारतसेना,' 'बलसागर भारत होवो,' 'मरणही ये तरी वरिन मोदे' 'देशासाठी मरूं' 'मातृभूमिगान' 'ऊठ भारता,' 'महाराष्ट्रास,' 'राणा प्रताप,' 'महात्माजीस' वगैरे पुष्कळ कवितांतून देशभक्तिपर व देशभक्त वीराच्या कार्यस्तुतिपरच विचार आलेले आहेत. 'जा रे पुढे व्हा रे पुढे' किंवा 'तुफान झालों' वगैरे कवितांतून त्यांची त्यागाची भूमिका स्पष्ट होत असून त्यांच्या ठिकाणीं एक प्रकारची नेत्याची भूमिका वास करीत असल्याचे दिसून येतें. लाहोरला स्वातंत्र्याचा ठराव पास झाल्यावर १९३० सालच्या चळवळींत ते आपले सर्व पाश तडातड तोडून सामील झाले व आज पंधरा वर्षांनंतरहि त्यांची भारतमातेच्या दुःखाबद्दलची अहर्निश चिंता त्यांना जाळीत आहेच. ती त्यांना झोंप येऊं देणार नाहीं व तेहि विश्रांतीची कधींच याचना करीत नाहींत.

## 'सत्याग्रही' खंडकाव्य

मराठी कवितेंत खंडकाव्याचा प्रकार नवीन नाहीं. परंतु प्रदीर्घ रचना

करावयाची विशेष आवड पंडितकवीशिवाय इतरात फार करून दिसून येत नाही. रामायणमहाभारतादि मोठमोठ्या संस्कृतांतील काव्याइतकी प्रचंड महाकाव्ये मराठीत नाहीत हा एक पक्षी दोषच. शिवाय पंडितकवि सोडले, तरी आधुनिक मराठी कवीत त्या पद्धतीचे प्रदीर्घ लेखन कोणी केलेलें नाही. काही तसे लेखन करावयाचे असलेच, तर ग्रंथ शें-दीडशे पृष्ठातच आटोपते घेतलेले दिसतात. याची काही कारणे अशी असूं शकतील:- एक तर प्रदीर्घ रचनेला काही तरी सूत्रबद्ध कथा लागते. दुसरें, एकच एक नीरस असे वृत्त उगाळीत बसावे लागते. व तिसरे म्हणजे, स्फूर्तीला कामास लागावें लागते. त्रुटित अशी सरस रचना करणाऱ्या कवीला प्रदीर्घ अशी कथा कल्पून अगर ऐतिहासिक किंवा पौराणिक प्रसंग घेऊन लिहिणे अशक्य आहे असे नाही. कुंटे यांचे 'राजा शिवाजी' हे एक प्रदीर्घ खंडकाव्य म्हणून उल्लेखिता येईल. ऐतिहासिक विषयावर शाहीरानी गायिलेले सारे पोवाडे याच प्रदीर्घ रचनेंत घालावे लागतील. आधुनिक काळातहि ऐतिहासिक विषयांवर तडफदार रीतीने, शाहीर खाडिलकर, तिवारी, मुळे, मुचाटे, जामखेडकर, वगैरे शाहीरांनी खंडकाव्यात्मक रचना केलेली आहे. त्याच्या काव्याचें रूप प्रदीर्घ असले, त्यात तडफ असली, अगर त्यात काव्यगुण असले, तरी त्याचे बाह्य स्वरूप जुने असल्यामुळें प्रचाराचा हेतु वगळल्यास सामान्य वाचकातून या प्रकारच्या प्रदीर्घ रचनेस फारसा मान मिळत नाहीं. बुद्धिवादी माणसांच्या मतें त्याना त्यात भरपूर भावनाविष्कार व चित्रीकरण सापडत नाहीं. याचे मुख्य कारण म्हणजे त्याचे विषय जुने व तेच तेच असतात व त्यामुळेच ते मागे पडतात. ही सत्य स्थिति आहे.

खंडकाव्यास प्रचलित विषय नाहीत अगर नव्हते असे नाही. परंतु ते विषय काव्यातून सांगत बसणें या पद्धतीकडे आधुनिक कवींची प्रवृत्ति जोरकस रीतीने कधी झालीच नाही. एकच एक नीरस असे वृत्त उगाळीत बसण्यापेक्षा निरनिराळ्या भावकुशल वृत्तछंदातून आपल्या भावनाचा आविष्कार करून त्रुटित काव्योत्पत्ति करण्याकडेच त्यांचें अधिक लक्ष. शिवाय भावगीतांची सफाईदार रचना करणाऱ्या कारागीराला प्रदीर्घ

रचनाकौशल्याचा नयनमनोहर ताजमहाल बांधता येईलच असे निश्चित नाहीं. कवि यशवंत यांच्या मतें " भावगीताचा जन्म भावनेच्या उमाळ्यातून होत असल्यामुळें भावकविता ही ' राजापूरची गंगा ' आहे, तर महाकाव्य म्हणजे ' गंगावतरण ' होय. दोन्ही गंगाच. पण पहिल्या प्रकारात ' चमत्कार ' वाटतो, तर दुसऱ्या प्रकारात साक्षात्कार असतो. भावगीतापेक्षा कथानिर्मितीला अधिक कलाकौशल्याची व परिश्रमाची आवश्यकता असते. "

मुख्य कारण हेच की, विविध प्रकारचे सौंदर्य सुटसुटीत रीतीने मांडण्याची जी इंग्रजी पद्य प्रकारांची—वैणिक गीताची छाप आपल्या सुशिक्षित कवि वर्गावर पडली आहे, त्यामुळेच बहुविध असे प्रदीर्घ काव्य आधुनिक मराठी कवींत क्वचित् होते व क्वचितच झालेले आहे. परंतु निराश होण्याइतकी काही दुर्दशा नाहीं. ऐतिहासिक किंवा पौराणिक खंडकाव्ये जुन्या काळात जशीं लिहिली गेली, तशीं आधुनिक काळातसुद्धा लिहिली गेलीं आहेत. हिंगणेकराचे ' दख्खनचा वीर व पावनखिंड, ' निफाडकराचे ' सतीचा शाप आणि तारागड', तिवारी यांची ' संग्रामगीतें', सावरकरांचे ' गोमंतक', रेंदाळकराचे 'विरहिणी राधा', टिळकाचे 'ख्रिस्तायन', 'वनवासी फूल' वगैरे नावे प्रामुख्याने घेता येतील. सामाजिक जीवनावर लिहिलेली खंडकाव्ये म्हणजे, गिरीशाची 'अभागी कमल', 'आम्रराई', यशवंतांची 'बंदीशाळा' व 'जयमंगला' आणि माधवरावाचे 'विरहतरंग' इत्यादि नावे प्रामुख्याने घेता येतील.

साने यांच्या 'सत्याग्रही' या खंडकाव्याचे स्थान मात्र वैशिष्ट्यपूर्ण आहे. ते १९३० सालच्या राजकीय आंदोलनाचें व त्यागाचें चित्र असलें, तरी आज व पुढे ऐतिहासिक काव्य म्हणून त्याचा उल्लेख करावा लागेल. हें खंडकाव्य त्यांनीं १९३० मध्ये त्रिचनापल्लीस असताना लिहिलें व त्यातील त्याना हवा असलेला तेवढाच भाग 'पत्री'त समाविष्ट झालेला आहे.

'सत्याग्रही'चे कथानक असेः

" श्रीमंत आईबापांचा एकुलता एक मुलगा होता. त्याचें वय अठरा वर्षांचे होते. त्याचें आठ नऊ वर्षांच्या एका मुलीशी लग्न लागलेलें होते.

तो सत्याग्रहात स्वयंसेवक झाला होता. तो तुरुंगांत अतिसारानें मरण पावला. त्याच्या आजारीपणाची तारही खेड्यांत वेळेवर पोंचली नाहीं. मरणाचीच तार एकदम घरी गेली. आईबापांस जबर धक्का बसला. तो मृत पुत्र रात्रीच्या वेळीं दिव्य वेष धारण करून आईबापाची समजूत घालण्यासाठीं येतो. रात्रभर विचारवार्ता करून, त्याचे समाधान करून प्रभात होतांच परत जातो. ”

खरोखर या कथेंत घडामोड अशी नाहीच. ती अगोदरच झालेली असते. कथेच्या अनुसंधानानें त्यात कांहींच घडामोड नाही, पेचप्रसंग नाही, किंवा नीरगांठ व उकल नाहीं. काही नाहीं. ते एक प्रदीर्घ शोकगीत आहे. विलापिका आहे. रात्रीच्या वेळी गूढ रूप धारण करून येणारा मृत पुत्र हॅम्लेटच्या बापाच्या प्रवेशपद्धतीनेच प्रवेश करतो. फरक एवढाच की, हॅम्लेटचा बाप भीषण सत्य सागावयास येतो, तर येथे हा मृत पुत्र आपल्या मातापितरांचें सांत्वन करण्याच्या सोज्ज्वल उद्देशाने येतो व दोघेहि प्रभात होण्यापूर्वीच निघून जातात. हॅम्लेटच्या आईच्या विटंबनेचा हॅम्लेटच्या पित्याला तर भारतमातेच्या विटंबनेचा ह्या सत्याग्रही मृत पुत्राला सारखाच त्वेष आलेला दिसतो. शेक्सपियरला तो महाकाव्याला–नाटकाला विषय झाला. त्याच पद्धतीच्या प्रवेशाची कल्पना ‘सत्याग्रही’ या खंडकाव्यात सान्यांनीं घातली आहे.

‘सत्याग्रही’ ह्या खंडकाव्यात्मक विलापिकेंत पित्याचा शोक आहे, मातेचा शोक आहे, शेजाऱ्यापाजाऱ्यांचे सांत्वनपर बोल आहेत, अंधाऱ्या रात्रीचें भयानक सृष्टिवर्णन आहे, लोकाच्या मनोवृत्तीचें चित्रण आहे, स्पृश्यास्पृश्य प्रश्न आहे. मुसलमानाचा प्रश्न, धर्मातील उदात्त तत्त्वांचें गायन, ध्येयार्थी रवींद्रनाथ व मुनींद्र महात्मा गांधीचें कार्य, भारताच्या स्वातंत्र्याची तळमळ, एवढेंच नव्हे तर जगाला शाती व आनंद कसा मिळेल, यांवर चिंतनपर विचार आहेत. स्वातंत्र्यशाहीराच्या स्फूर्तिगीतांतील विचार पहा—

प्राण अर्पिलेल्या वीरांनीं त्यांना गुंफिन माझ्या कवनीं
स्वतंत्रतेचा मी शाहीर करीत आहें जगजाहीर

देशभक्तिचा प्रवाह पूर    खळखळाट वाहवीत धीर
देशभक्तिचा सागर खोल    हृदयी निर्मळ माझा बोल

' सत्याग्रही ' काव्याचे सार काढताना साने यानी सागितलेलें—

टवटवीत ती तरुची पाने    विहंग गाती मंजुळ गाणे
सृष्टि सागते दुःख गिळावें    कर्तव्यास्तव पुन्हा उठावें

हे तत्त्व हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यसंगरास किती तरी मोलाचे वाटते.

' सत्याग्रही ' या देशभक्तिपर खडकाव्यातून वीर, करुण, शाति इत्यादि रसाचा परिपोष त्याच्या इतर कवितापेक्षा चागला साधला आहे. प्रसंगास व रसास अनुसरून त्यांनी निरनिराळ्या वृत्ताची व छंदाची योजना केलेली आहे.

रात्रीच्या भयानक स्वरूपाचें—
रातकिडे । त्याचा कानी ध्वनी पडे
फाद्यात । वटवाघुळ ते फडफडत

अशा प्रकारच्या त्रुटित छंदातून वर्णन करतात, तर शोकाच्या प्रसंगीं ते आपल्या पुरातन करुणरम्य ' ओवी 'कडे धाव घेतात.

मोडिली हो मान    गोड या मैनेची
हृदयास जाची    शल्य तीव्र
करोनीया आम्ही    विवाहसोहोळा
दाबियेला गळा    कोकिळेचा.
फुटेल जैं कंठ    गावया स्फुरेल
मैना ना काढील    गोड शब्द

लहानपणी अजाणताच नऊ वर्षांच्या आपल्या सुनेवर आलेलें वैधव्यदुःख पाहून सासूसासऱ्याना झालेला पश्चात्ताप यापेक्षा अधिक करुण रीतीने वर्णन केलेला अन्यत्र सांपडणे कठीण.

## जातां जातां—

आतापर्यंत साने याच्या काव्यातील गुणाची आपण पारख केली. आतां जाता जाता त्यात असलेल्या दोषाचें स्पष्टीकरण करणें प्रस्तुत ठरतें. सान्यांच्या काव्यदेवीला सुंदरी म्हणता यावयाचे नाहीं. ती भारतांत वणवण करीत फिरणारी, भारताच्या दैन्यासाटी तळमळ करून देहत्यागाची तयारी करणारी योगिनी

आहे.योगिनी म्हटल्यावर तिला शृंगारसाज हवा तरी कशाला ? देहाचे सौंदर्य खुलविण्यापेक्षा मनाचे सौंदर्य खुलविण्याकडेच तिचें अधिक लक्ष. यापेक्षा, कामावरून दमून, थकून घराला परत चाललेली ती मजुरीण म्हणा. उद्वेगाने चित्त भरले आहे, पाठीमागे झोळींत पोर लोंबकळत आहे, डोक्यावरील हाऱ्यात कसले तरी शेतीचे साहित्य अस्ताव्यस्त पडले आहे, लक्ष घराकडे, बाळाकडे व पतीकडे आहे. सकाळीं टोपलीखालीं झाकून ठेविलेली भाकरी व कालवण पोरानी खाल्ले की नाही, का ती उपाशीपोटीच आपली वाट पाहत बसली आहेत,या चिंतेने मन ग्रस्त झालेले आहे, कोपरापर्यंत खणाची चोळी व गुडघ्यावर सरकणारे धिटुकले भुरके, ठिगळाचे लुगडे कमरेभोवती गुंडाळले आहे, असा त्याच्या कवितेचा साज आहे. काव्यानंदाविषयी उच्च अपेक्षा बाळगणाऱ्या कलावंताच्या दृष्टीस हे चित्र मोहक दिसत नाही. हाच त्यांच्या काव्याचा पहिला दोष.

एकच एक विचार साऱ्याच्या ह्या तीनशे अठ्ठ्याहत्तर पृष्ठातून आपणास आढळतो. भारतभक्तीचे गायन इतके होते की, त्यावाचून काव्याला इतर विषयच मिळत नाही कीं काय असा विचार काहीं लोकाच्या मनात उत्पन्न होतो. काव्यातून बोध मिळाल्यास तो हवाच, परतु साने यांचे काव्य केवळ बोधामृत पाजण्यासाठींच निर्माण झालेले आहे, हा त्याचा दुसरा दोष. त्यामुळे रसवैचित्र्यातील मनोरमता त्यांत नाहीं. सर्वत्र करुण, शात व वीर ह्या रसत्रयींचाच संचार आढळतो. ‘ वाक्य रसात्मकं काव्यम् ’ या न्यायाने ते सर्वांगपरिपूर्ण ठरत नाहीं हा त्याचा तिसरा दोष. त्याशिवाय रचनेबाबतचा ओबडधोबडपणा आहेच. त्याच्या काव्याची दिलखुलास, खुसखुशीत अशी रचना नाहीं हा त्याचा चवथा दोष. आणि पाचवा म्हणजे पाल्हाळ. वाचकांची जिज्ञासा जागृत करण्याचे कार्य त्याच्या काव्यात झालेले दिसत नाहीं व त्यामुळें ‘देवाजवळ,’ ‘लहानपणाची आठवण,’ ‘ जीवन मित्रास,’ ‘ बालवृद्धसंवाद ’ वगैरे कविता कंटाळवाण्या झालेल्या वाटतात.

दोषाचें दिग्दर्शन केल्यावर एवढेच सागावेसे वाटते कीं, त्यांच्या साहित्यांत ज्ञान असलें, तरी पांडित्य नाही. ते सर्वव्यापी व सर्वगामी प्रेमाने अपरंपार भरलें आहे. दु:खितांविषयीं वाटणारी दया, दीनाच्या अनवस्थेविषयी त्वेष, सेवापरायणता व त्यागाची तळमळ, प्रेरणा इत्यादि अनंत गुण-

समुच्चयानें त्याचे काव्यदोष झाकले जातात. ते महाराष्ट्रीय जीवनाशी समरस झालेले आहेत. त्याना वाङ्मयातील तंत्र माहित नाही असे नाहीं: परंतु तंत्राला प्राधान्य देऊन मंत्राला लपत छपत प्रकाशात आणणे त्याना आवडत नाहीं. ते स्वच्छ स्वच्छ काय ते सांगून टाकतात. त्याच्या काव्यात सत्य उघडे नागडे असते. सान्यानी त्याच्या कलाविषयक ज्ञानाचा भरपूर उपयोग केला तर त्याना द्यावयाचा मंत्र जास्त आकर्षक रीतीने ते देऊं शकणार नाहीत असे नाहीं. परंतु हे होईपर्यंत सुशिक्षित बुद्धिवादी लोकावर त्याच्या काव्याचा विशेष पगडा बसणार नाहीं. सान्याना ज्या सामान्य जनतेत जागृति करावयाची आहे त्या त्याच्या ध्येयाला अनुरूप असेच वाङ्मयीन कार्य ते करीत आहेत व कदाचित् पुढेहि ते तसेच करीत राहतील.



## लघुकथा

सानेगुरुजींनी मराठी वाङ्मयात एक विशिष्ट असें महत्त्वाचे स्थान मिळविलें आहे. आधीं राजकारण व मग फावल्या वेळीं वाङ्मयकारण हे त्याचे ध्येय. अर्थात् केवळ लालित्याला वाहिलेल्या वाङ्मयनिर्मितीचा त्यांनी कधींच ध्यास घेतलेला नाहीं. त्यांना जे स्फुरले, जे सांगावेसे वाटलें तें त्यानीं लिहिले व तेंहि भारतीय समाजाच्या भल्याकरिताच. तेव्हा, आधुनिक टीकाशास्त्राचीं मूल्यें त्याच्या वाङ्मयास लावून ते श्रेष्ठ की कनिष्ठ हे ठरविणें मोठे विचित्र आहे. कारण वाङ्मयनिर्मितीच्या त्याच्या कल्पना अत्यंत भिन्न आहेत. कलेचे ध्येय एकमेव आनंद देणे होय हे तत्त्व ते अमान्य करतात. त्याच्या मते वाङ्मय हे प्रभावी साधन असल्यावर त्याचा उपयोग समाजाला उदात्ततेचे व पावित्र्याचे शिक्षण देण्याकडेच करण्यात आला पाहिजे, असे आहे.

वरील गोष्टी लक्षांत घेऊनच त्याच्या लघुकथाचा विचार करणे प्रस्तुत ठरतें.

राजकारण हा त्यांच्या जीवनाचा आत्मा आहे. समाजाभिमुख वाङ्मयनिर्मिति हा त्यांतीलच एक सहाय्यक असा भाग ते समजतात. राजकारणांत त्यांनीं महात्मा गांधींचा आदर्श आपणापुढे ठेवला आहे. महात्मा गांधींचे साहित्य अंतःस्फूर्त व कळकळीनें असें लिहिलेलें आहे

याबद्दल तज्ज्ञ लोक साक्ष देतात. ' काही तरी लिहावयाचे, ' ' लिहिलेच पाहिजे म्हणून लिहावयाचे' असे ते वाङ्मय नाहीं. असे सारस्वत केव्हाहि उत्कृष्ट साहित्य म्हणून मान्यता पावते. केवळ राजकारणातील पुरुष लिहितो अतएव ते त्याज्य असा दंडक आपणास निर्माण करता येणार नाहीं. त्याने कोणत्या मानसिक अवस्थेंत आपलें लिखाण केले आहे याचा विचार करणे आवश्यक आहे. त्याला जास्त महत्त्व आहे. आपण एक मोठा लेखक व्हावे या हेतूने म. गांधींनी लिहावयास सुरुवात केली नाही. उलट त्याना जे राजकारण खेळावयाचे होते ते बहुजनसमाजाला नीट कळावे याकरता त्यानी लेखणीचा अवलंब केला. भाषा ही एक साधन झाली. ती विकसत गेली, तीत उदात्तत्व येत गेले व शेवटीं जे सांगितलें त्याच्या पावित्र्याने गांधीजींचे सर्वच वाङ्मय परमोच्च कोटीला गेले. गांधीजींनीं ज्या पवित्र हेतूने लेखणी हातात घेतली, त्याच हेतूने सानेगुरुजींनीं आपल्या लेखणीला हात घातला व आज त्याचे वाङ्मय अनंत गुणानी परमोच्च कोटीस गेलेले दिसत आहे.

आधीं लेखन व फावल्या वेळात राजकारण असे गुरुजींनी कधीच केलें नाहीं. १९३० सालच्या सामुदायिक आंदोलनात त्यांनीं धडाडीने भाग घेतला. तन–मन–धन यातील कशाचीहि पर्वा न करता ते राष्ट्राची सेवा करावयास पुढे सरसावले. त्या वेळीं राजकीय आंदोलनाच्या गगनचुंबी लाटेचे पडसाद सानासमुद्रापर्यंत उमटले व ती लाट तेथे जाऊन धडकली. देशाच्या दैन्यावस्थेने अस्वस्थ होणारे गुरुजी त्या कार्यात पडले. त्यांना जें हवे होते, तेच त्याना मिळाले. जणूं ' हरपले श्रेय ' त्याना गवसले. अशा रीतीने एक नेकीचा देशसेवक म्हणूनच ते जनतेसमोर सुमारे पंधरा वर्षांपूर्वी आले. एक निःस्वार्थी व धडाडीचा त्यागी देशसेवक याच स्वरूपात ते आजहि आहेत. जवळ सहृदयता व कळकळ असल्यामुळे ते आदर्श वाङ्मय निर्माण करू शकले आहेत. महात्माजी, टॉलस्टॉय, विनोबाजी भावे इत्यादि विशुद्ध चारित्र्याच्या महान् पुरुषाचा त्यांच्या मनावर खोल ठसा उमटलेला आहे. त्याचाच आदर्श त्यांनीं आपल्या लेखनव्यवसायांत आपल्यापुढें ठेवला आहे यात नवल नव्हे. जातिवंत कळकळ व सहृदयता हाच त्याच्या लघुकथालेखनातील मुख्य विशेष आहे. ते वाङ्मयांतील तंत्राच्या डोलाऱ्याला

महत्त्व देत नाहीत. केवळ तंत्राकडेच लक्ष पुरविल्याने काहीं कोणताहि वाङ्मयसेवक आदर्श ठरत नाही, नव्हे त्याचे वाङ्मयहि अद्वितीय ठरत नाहीं. नुसते तंत्र–विशारद वाङ्मयसेवक काय आपणांकडे थोडे आहेत? परंतु शरीर सुंदर तऱ्हेनें सजविलेले असून आत मात्र कुवासनाची बजबज असली, तर कोण विचारणार त्या शरीराला आणि कोण त्या सुंदर शरीराला पावित्र्यपूर्ण नजरेने पाहणार? उपवन मोठे सुंदर व रमणीय आहे, वृक्षलता फुललेल्या आहेत, पक्षीगण किलबिलत आहेत—पण जर का तेथे भुजंगस्थान असले, तर कोण फिरकणार त्या रम्य व आनंददायी म्हटल्या गेलेल्या स्थानाकडे? वाङ्मयाचेहि नेमके तसेच आहे. त्यात शुद्धता पाहिजे, त्यात उदात्तता पाहिजे. असे असेल तरच ते वाङ्मय स्वत: टिकते व लोकानाहि टिकवितें. ज्या वाङ्मयांत कोठेच पोटतिडिक नाहीं तें कसे टिकणार, चिरंजीव होणार? नुसती साफसफाई केलेली आहे; वरून भपकेदार रंगरंगोटी केलेली आहे; पण आतून मात्र साऱ्या भिंती पोखरलेल्या असल्या, तर किती काळ तें घर टिकणार व आतील आश्रिताना आश्रय देणार?

आणि म्हणूनच आधुनिक टीकाशास्त्राप्रमाणे जर आपण गुरुजींच्या लेखनाचें महत्त्वमापन करावयास सुरुवात केली, तर मोठा अनवस्था प्रसंग ओढवेल. तंत्रविशारद लेखक लोकाना जे पटेल तेच सांगावयास पुढे सरसावत असतात व ते सांगत असताना बाह्य थाट असा करतात कीं ज्याचे नाव तें! त्यांना बहुतेक कांहींच सांगावयाचें नसतें हेहि तितकेच खरें. जें लोकाना पटतें तेंच पुनः पुन्हा सांगण्यात काय हंशील? गुरुजी मात्र जें सांगितलेंच पाहिजे असे त्याना वाटते, तेंच सांगतात. कांहीं तरी सांगितलेच पाहिजे, अवश्य आहे म्हणून ते कालापव्यय करीत नाहीत. आणि म्हणूनच त्यांचें वाङ्मय अस्सल असतें व त्याना स्वत:ला जे सांगावयाचे तें सांगत असताना त्याना तंत्राची मुळींच गरज पडत नाही. जो जातिवंत गवई असेल त्याला इतर साधनसामुग्रीची तितकीशी गरज नसते. परंतु जो यथातथाच गाणारा असतो त्याचें मात्र या सर्व गोष्टींवाचून अडून बसतें. पेटी जरा जुनी असली कीं त्याला गातां येत नाहीं–निदान तशी बतावणी करावयास तो सुरुवात करतो. चेहऱ्यावरून तो बिचारा इतका निराश दिसायला लागतो, की आपल्याला वाटतें, "अरे अरे, काय बिचाऱ्याची तडाखेबंद निराशा झाली आहे!"

परंतु ‘ नाचता येत नाही, अंगण वाकडें ’ अशीच वस्तुस्थिति ह्या वेळीं झालेली असते. उलट अभिजात गायकाला तुमची ही साधनसामुग्री कांहीहि नको. तो त्याचा खरा ‘आवाज’ ह्या गलबल्यात बुडवून टाकावयास तयार नसतो. त्याला खऱ्या अर्थी गायला व्हायला लागलें म्हणजे तो गातो. त्याच्या ह्या स्वयंस्फूर्त गायनाने मग सारे मंत्रमुग्ध होतात. त्याचप्रमाणे सान्यासारख्या प्रतिभावान लेखकाचे आहे. ते स्वतःचे असे एक तंत्र मानीत असतात व त्याच्या मागोमाग जातात. त्याच्या बाबतीत ‘वाचमर्थोनुधावति’ असेच नेहमी होत असते. हे त्याचे ‘स्वतंत्र’ त्यानाच साधते व पेलता पण येते; येरा गबाळ्याचे ते काम नव्हे !

परमेश्वराने पुष्कळ अवतार घेतले, खूप लीला केल्या; परंतु त्या सर्वांमागे जसे परमेश्वरत्व एकच, त्याप्रमाणे सानेगुरुजींनी उपयोजिलेल्या अनेक वाङ्मयप्रकाराच्या मागे त्याना जें सांगावयाचें, ते तत्त्वही एकच आहे. त्यांना सर्व ठिकाणीं एकच असा राष्ट्रीय संदेश द्यावयाचा आहे. त्याच संदेशाचा त्यानी निरनिराळे वाङ्मयप्रकार उपयोजून विस्तार केलेला आहे. लघुकथांविषयीं लिहिताना त्याच हकीगतीचा पुनरुच्चार होणे अपरिहार्य होय. ‘विश्राम’, ‘त्रिवेणी’ व ‘अमोल गोष्टी’ हीं तीन एकूण त्याची लघुकथेचीं पुस्तके; पैकीं ‘अमोल गोष्टींत’ तर सरास उपदेशप्रधान गोष्टींचाच भरणा अधिक.

उपदेशप्रधान व प्रदीर्घ लघुकथालेखनाची सुरुवात साधारणपणे कै. ह. ना. आपटे ह्यानी केली. तत्पूर्वी आपणाकडे लघुकथा अशा नव्हत्याच. आपटे कालातील कथाचा विशेष म्हणजे उपदेशप्राधान्य व पाल्हाळ हेच होत. पुढे गुर्जर, गोखले, दिवाकर कृष्ण याच्या युगात लघुकथा सुटसुटीत व कलापूर्ण अशी होऊं लागली. याहि वेळी लिहावयाचे म्हणजे काही तरी उपदेश केलाच पाहिजे अशी सर्व लेखकांची प्रामाणिक समजूत होती. फडके–खाडेकराच्या काळांत लघुकथेंतील कला जास्त जास्त पूर्णावस्थेप्रत पोहोंचली व उपदेश प्रथम मग कला हा शिरस्ता मागें पडत चालला. अर्थात् कलेला व गोंडस ऐटबाजपणाला खरें महत्त्वाचे स्थान प्रा. फडके यानींच प्राप्त करून दिलें. रा. खांडेकर हे लघुकथा–वाङ्मयाचे जरी खरे मानकरी असले, तरी सुरुवातीला त्यांच्या

कथाहि बोजड व फार अलंकृत असत. पुढें पुढे त्याची दृष्टि जेव्हां जास्त ध्येयप्रवण व साम्यवादी होत गेली, तेव्हा अगदी अप्रत्यक्षपणें का होईना पण उपदेश त्याच्या वाङ्मयात डोकावूं लागला. अशा प्रकारे गेल्या पन्नास-साठ वर्षात लघुकथालेखनकलेच्या पद्धतीत कसकसे महत्त्वाचे फेरबदल होत गेले ह्या गोष्टी गुरुजींच्या गावीही नाहीत. त्याचे धोरण व ध्येय एकच. जें सागावयाचे ते अत्यंत कळकळीने सागावयाचे, ज्याच्याविषयीं सागावयाचे त्याच्याशी समरस होऊन सागावयाचे, आणि ते सागितले जात असतांना ज्याना सागावयाचे त्याना रुचेल व पचेल इतपत रसाळ व साधी भाषा वापरून सागावयाचे, हेच त्याचे धोरण व हेच त्याचे तत्र!

वर उल्लेखिल्याप्रमाणे त्याच्या ‘ अमोल गोष्टी ’त सर्वत्र उपदेशालाच प्राधान्य दिले गेले आहे. उपदेश करणे ही गोष्ट त्याना अत्यंत महत्त्वाची वाटते व म्हणूनच त्यानीं ह्या संग्रहाला ‘ अमोल ’ म्हटले आहे. उपदेशप्रवण कथा त्याज्य मानणे, झिडकारणे हा एक अतिरेकीपणाच होय. जगातील सर्व लोक काहीं सुज्ञ व रसिक नसतात. ज्या बहुजनसमाजाला अजून बरेच शिकावयाचें आहे, त्याच्यासाठीं उपदेशप्रधान गोष्टी लिहिणे आवश्यक आहे व अशा कथांचे वाङ्मयात एक स्वतंत्र स्थान आहे, ही गोष्ट दुर्लक्षून चालावयाचे नाहीं. आधुनिक वाङ्मयतंत्रानुसार उपदेशप्रधान कथा नीरस वाटूं लागते, असा तत्रवाद्याचा दावा आहे. त्याच्या मते कलेला पूर्ण अवसर देऊन तिच्या सावलीत उपदेशाचें रोपटे वाढले तर ना नाही. ‘ उपदेशाचे ’ नाव काढल्याबरोबर अंगावर शहारे आणणाऱ्या रसज्ञांना अत्याग्रही म्हणावें असेंच येथे वाटते. खरें म्हटलें म्हणजे स्पष्टास्पष्ट उपदेश हा प्रत्येक गोष्टींत असणारच. प्रश्न एवढाच आहे की, तो कोणत्या पद्धतीनें समाजापुढें मांडावा व त्याला किती महत्त्वाचे व मानाचे स्थान द्यावे. कलावाल्यांच्या दृष्टीने गुरुजींकडून आपली निराशा होईल. कारण त्यांचे मन हे आईचें मन आहे, त्यांना सर्व ठिकाणी समता व बंधुभाव दृग्गोचर होतात. त्याना आपण सांगितले की “गुरुजी, आपण प्रत्यक्ष उपदेश करूं नका ’ तर ते म्हणतील; ‘मग मी लेखनच बंद करतो कसा. कारण मला जें सागावयाचे आहे तें मला मानवेल, रुचेल असेंच सागूं द्या!’

'बुद्ध आणि बेटा', 'आईचें हृदय,' 'समाजाचे प्राण' 'खरा कलावान,' 'बच्चुखाची बकरी' ह्या व इतर कोणत्याही गोष्टी घेतल्या तरी या ना त्या उदात्त उपदेशाने त्या ओथंबलेल्या दिसतीलच. कथावस्तूचा शेवट निदान वाचकानें कल्पनेनें ताडावा अशीही सोय ते ठेवीत नाहीत. कथेचा शेवट मोठा संयमी व कलात्मक पाहिजे इकडे गुरुजी लक्ष देतांना दिसत नाहींत असे वरील गोष्टींच्या वाचनावरून खास लक्षांत येते. त्यांतून वर सांगितल्या-प्रमाणे 'अमोल गोष्टी' हा तर अमोल अशा उपदेशाचा ठेवाच असल्यामुळें उपदेशालाच जास्त प्राधान्य देण्यात आलेले आहे.

पुढील पुस्तक 'विश्राम' हें होय. या पुस्तकांत चार कथा असून गुरु-जींनी त्या चारहि गोष्टींचें कथा-उद्दिष्ट प्रस्तावनेत विस्तारपूर्वक चर्चा करून सागून टाकल्याकारणानें गोष्टी वाचण्याकरतां लागणारें औत्सुक्य पार लयास जाते. कथाविषयाचा आधींच परिचय करून द्यावयाचा मग ती कथा लिहावयाची तरी कशाकरता असा प्रश्न येथें उत्पन्न होतो. कथा-विषयातील खरी गंमत निश्चितपणे निघून जाते.

या संग्रहातील पहिली गोष्ट 'मोलकरीण' ही आहे. कथाविषय असा. एक गृहस्थ शिकून फार मोठे अधिकारी होतात आणि ज्या मातापितरांनीं आपल्या रक्ताचें पाणी करून त्याना पोसलें, शिकविलें त्याना हे अधिकारी सपशेल विसरतात. केवढा जिव्हाळ्याचा हा गुरुजींचा विषय! मनुष्य शिकूनसवरून मोठा झाला म्हणून का तो आपल्या आईबापांना विसरेल? ही गुरुजीची दृढ निष्ठा. असे जरी असलें, तरी अशा प्रकारच्या बेइमान मुलाच्या कथा पुष्कळ वेळीं कानावर येतात असें त्याचें म्हणणें आहे. या कथेत त्या सुशिक्षित (!) माणसाला पश्चात्ताप घडवून ते आईबापांची थोरवी वर्णन करितात. ह्या कथेतील नायक बाळासाहेब हा प्रथम सत्तांध व विद्यांध असतो व त्यांच्याच जोडीला प्रणय त्याचेवर सत्ता चालवितो. ह्या सर्व गोष्टींचा संगम झाल्यावर आईबापांना विसरणें खरोखर कांहीं अशक्य गोष्ट नव्हे. गुरुजी तेवढयावर थांबले नाहीत. एका तेलंगी ब्राह्म-णाला मध्यें आणून त्याच्यामार्फत त्यांनीं नायकाला त्याच्या पित्याची जबर आठवण करून दिली; जी राजीखुषीनें व प्रेमानें बघितल्यास खरी मोलकरीण असते, व तसें असण्यांत जी सारसर्वस्व मानते, अशा आईला कामाकष्टाची

मोलकरीण बनवून तिचें निःस्वार्थी प्रेम त्यांनीं नायकाला पटविलें आहे. आणि मग आस्ते आस्ते त्याच्या मनांत पश्चात्तापाची धग निर्माण करून त्याला पावन करून घेतलें आहे.

विषय अगोदरच जिव्हाळ्याचा व सर्वांनाच थोर असा वाटणारा आणि कथनकार तर गुरुजीसारखे खंदे लेखक; त्यामुळें 'मोलकरीण' ही गोष्ट फारच सरस उतरली आहे. .कथानायकाला ज्या वेळीं पश्चात्ताप होतो, त्या वेळीं तर डोळे अश्रूंनीं भरून येतात. प्रत्येक वाक्य न् वाक्य वाचकाच्या हृदयाला जाऊन भिडणारे ! खुद्द लेखकाच्या अंतःकरणातून निघालेलीं तीं वाक्यें. त्यांना भरींवपणा फार. त्याच्यांतून निर्मळ व उदात्तता सारखी स्रवते. विद्वत्ता दृग्गोचर होते. आणि हें सारें घडतें तेही ओघाओघानेंच.

सदर गोष्टीतून पाल्हाळ फार. कोणतीही गोष्ट थोडक्यांत त्यांना सांगतां येत नाहीं. किती सागूं व किती नाहीं असें त्यांना होते. त्यांचें भाषेवर व निवेदनावर मोठे प्रभुत्व असल्याकारणानें चार–दोन पानात सहज संपणारी कथा वीस–पंचवीस पानांपर्यंत पसरते. पुन्हा दुसरा एक दोष म्हणजे कथानकांचा व कथनपद्धतीचा तोचतोचपणा हा होय. परंतु एकूण त्याची भाषासरणी फार त्रुटित व रसाळ असून सर्व लिहिणेंच कळकळीचें असल्याकारणानें त्याची कोणतीहि कथा कंटाळवाणी होत नाहीं. वर दाखविलेले दोष ह्या गुणानीं झांकले जातात.

दुसरी गोष्ट 'श्यामची आत्या.' कथानक अगदीं सोपें व साधेंसुधें. त्यांनीं स्वतःच म्हटलें आहे कीं, ही कथा हें एक सहृदय 'शब्दचित्र' आहे. या कथेंत मानवाची—विशेषतः स्त्रीच्या वात्सल्याची अमर भूक यांत वर्णन केलेली आहे. श्यामची आत्या प्रथम श्रीमंत असून ती नंतर दरिद्री झाली. तिला संतान झालेले नव्हतें व पुढेंहि होत नाही. गाईवासरांवर ती आपल्या वात्सल्याची भूक भागवते. ह्या विचित्र दैवघटनेमुळें या गोष्टींत एक प्रकारचें करुणरसपूर्ण वातावरण गुरुजींनीं उत्पन्न केलें आहे.

तिसरी गोष्ट 'शशीची.' ह्या कथेचा साराश गुरुजींच्या भाषेंत असा. "काही मुलांच्या भावना लहानपणींच विकसित झालेल्या असतात. पण त्यांच्या पालकाना किंवा गुरुजनांना त्या बिलकुल कळत नाहींत.........

हृदयाचा, मनाचा, आत्म्याचा विकास होण्याऐवजीं संकोचच होतो. मनुष्यांतील आत्मा सर्व विश्वास कवटाळूं पहातो. पण शिकवून, मारून मुटकून ह्या उड्डाण करणाऱ्या आत्म्याला......ह्या शरीरांत कोंडून आनंद मानावयाला लावीत असतो!" ही गोष्ट वाचतांना रवींद्रांच्या Home-Coming ह्या गोष्टीची आठवण होते व बरेंचसें साम्य प्रतीत होतें. या गोष्टीत बालहृदय कसें असतें व त्याचा एकंदर कारभार कसा चालतो याबद्दल गुरुजींच्या ज्या कल्पना आहेत त्यांची ओळख होते. शशीच्या बालमनाच्या विविध छटा त्यांनीं अत्यंत हळुवार हातानीं रंगविल्या आहेत. स्वतःच्या सदऱ्यात पिलाला घेणें, मुंग्याच्या रांगेचें उत्सुकतेनें कौतुक करणें, तसबीर फुटली असतांना टोपी देऊन टाकून नवीन तसबीर खरेदी करणें, स्वतःचा खाऊ अमीनकरता राखून ठेवणे वगैरे कित्येक मोहक छटा ह्या गोष्टींत आलेल्या आहेत. शशीला मारणारे वडील, मास्तर व त्याची आत्या ह्या खलव्यक्ति गुरुजींनीं ह्या गोष्टींत रंगविल्या आहेत मात्र! एकंदरीनें पाहतां कथा चागलीच वाचनीय झालेली आहे. ओघाओघानें चालू शिक्षणपद्धति किती सदोष आहे आणि जें करावयाला हवें असतें त्याच्या अगदीं उलट तऱ्हेनें कसे शिक्षण देण्यांत येतें, याचेही मोठ्या मार्मिकतेनें त्यांनीं विवेचन केलेलें आहे. केवळ धाकदडपशाहीच्या जोरावर आपणांस बालमन कधींहि जिंकतां येणार नाहीं उलट त्याचा विपरीत परिणाम होईल. मुलाला मुलासारखें होऊनच शिकविलें पाहिजे. बालमनाला आपल्याला वाटतें त्यापेक्षां किती तरी जास्त कळतें. तेव्हां ह्या गोष्टींकडे डोळेझांक करून कसे चालणार नाहीं याबाबत त्यांनीं फार मौलिक विचार या गोष्टींत सांगितले आहेत.

या गोष्टींत कॉंग्रेसनें पुरस्कारित केलेला हिंदु-मुसलमान ऐक्याचा प्रश्न गुरुजींनीं हाताळला आहे. त्याचें लेखनध्येय प्रसिद्धि किंवा लोकरंजन नसून मतप्रचार हेंच आहे. आणि त्यांच्यामतें साहित्य हें प्रभावी साधन मान्य केल्यावर त्याचा सदुपयोग करून घेणें वाजवी होय. ते एक निष्ठावंत व त्यागी कॉंग्रेससेवक असल्यानें त्यानीं आपल्या वाङ्मयांत कॉंग्रेसमान्य तत्त्वांचा जो पुरस्कार केला आहे, त्यांतीलच हिंदु-मुसलमान ऐक्याचा हा प्रश्न आहे. प्रश्न अवघड तर खराच. काम मोठें कठिण आहे याची जाणीव सर्व ऐक्य-

वादी लोकांनाहि आहे. या गोष्टींतूनहि त्यांनीं हा प्रचार सद्धेतूनें केलेला आहे. अर्थात् ललितवाङ्मयाच्या सहाय्याने हा प्रश्न सुटूं शकेल कीं नाहीं यांत विचारवंत लोकांत मतभेद होण्यास पूर्ण वाव आहे एवढेच येथें नम्रतेनें सुचवावेंसें वाटतें.

'विश्राम' या गोष्टींत 'सावकार' हा समाजांतील अस्सल खलपुरुष होय हें गुरुजींनीं दाखविलें आहे. ते स्वतः म्हणतात कीं त्याना खलपुरुषाचें चित्रच रंगवितां येत नाही आणि खरोखरच त्याच्या कादंबऱ्यांतून तर खलपुरुषांच्या मनाचा पालट झाल्याचेच त्यांनीं दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

परंतु सावकारांविषयीं त्यानीं जे जें काहीं तळमळून, खवळून व उद्वेगून लिहिलें आहे तें पाहिले म्हणजे त्याच्या दृष्टीने 'सावकार' हे खरोखरच खलपुरुष आहेत व त्याच्या खलत्वाचे त्यांनी केलेले चित्रण अत्यंत स्पर्शी झालेलें आहे हें पटावयास लागतें. 'विश्राम' या कथेंतील दिनकर सावकार मोठा निर्दय आहे. जिवापाड मेहनत करणाऱ्या विश्रामला तो धड पोटभर अन्नहि देत नाहीं. परंतु तोच विश्राम बाका प्रसंग आल्यावर आपले प्राण धोक्यांत घालून मालकाला प्राणदान देतो आणि मग मात्र त्या फत्तराला पाझर फुटतो. गुरुजी खरा खलपुरुष निर्माण करूं शकत नाहींत, एवढेच नव्हे तर त्यांना तो तसा रहावा असें वाटत नाहीं, हेंच खरें सार त्यातून निघतें.

'त्रिवेणी' हें त्यांच्या लघुकथांचें तिसरें पुस्तक होय. ह्यांतील पहिली गोष्ट 'शबरी' ही आहे. रामायणांतील शबरीचा कथा गोड, अमर व भक्तिमार्गाचा सोज्ज्वल, निर्मळ प्रसार करणारी आहे. शबरीला रामाचा केवढा ध्यास! ऐक्याची केवढी उज्ज्वल पायरी तिनें गांठली होती! अशा प्रकारचा निर्मळ विषय गुरुजींना मोह पाडणारच. ध्येयाचा ध्यास धरणें हेंच गुरुजींचें जीवन. मात्र 'पिछेसे आई और आगे धकाई' या थाटांत त्यांनीं शबरीची गोष्ट सांगितलेली नाहीं. मुळातला विषयच मुळीं काव्यरस-पूर्ण व प्रतिभेचा प्रक्षोभ करणारा असा आहे. गुरुजींनीं ही गोष्ट आर्यसमाजी दृष्टीनें लिहिली आहे आणि ज्या अर्थी एक यःकश्चित भिल्लकन्या एवढी वैराग्यसंपन्न होते, त्या अर्थी तिला सत्समागम व सद्विद्या मिळालीच असली पाहिजे हा निष्कर्ष ह्या कथेचा पाया बनविला आहे. हिंदुस्थानांत आर्य लोक

कसे प्रसृत आणि बद्धमूल झाले येथून कथेला सुरुवात करून गुरुजींनीं शबरी आत्मयज्ञ करीत आहे येथपर्यंत कथा ओढिली आहे. ही कथा यथासांग व परिपूर्ण रीतीनें त्यांनीं सांगितली आहे. एवढया पाल्हाळाची खरोखर कांहीं जरूर नव्हती. प्रमुख धागे घेऊनहि कथाविषय फुलवितां आला असता. आर्य लोक हिंदुस्थानांत कसे व कोठें बद्धमूल झाले या वर्णनाचा कथेच्या उद्दिष्टाशीं बिलकूल सबंध नाहीं. लग्नाच्या वेळेस हत्याकांड पाहून शबरीचें मन द्रवतें, उद्वेगतें हें अगदीं मोजक्या पण समर्पक शब्दांत सांगता आलें असतें आणि मतंग मुनींच्या मृत्यूनंतर शबरी एकटीच राहते त्या वेळचें वर्णनहि कथापरिपोषदृष्टया अगदीं अनवश्यक आहे. पण वाणी गंगौघाप्रमाणें अस्खलित आणि प्रभावी आहे. ती थांबणार कोठें व कशी ? सांगावयाचे पूर्णपणे सांगून झाल्याखेरीज ते कधीच थांबावयाचे नाहींत.

या गोष्टीला त्यांनीं जो आर्यसमाजी नवीन दृष्टिकोन दिलेला आहे, तो मात्र स्तुत्य आणि विचारार्ह आहे. या पाल्हाळांतच अनेक विचारमौक्तिकें इतस्ततः विखुरलेलीं आहेत. पाल्हाळांतूनहि कधीं कधीं चांगलें निघतें तें असें.

गुरुजी मृत्यूसबंधीं म्हणतातः " मृत्यु हा कठोर वाटला तरी कठोर नाहीं. मृत्यु नसता तर या जगात प्रेम नि स्नेह दिसतीं ना. मृत्यूमुळें जगाला रमणीयता आली आहे. हे मृत्यो ! तूं जगाची जननी आहेस....अमर जीवनाच्या सागरात नेऊन सोडणारी मृत्युगंगा पवित्र आहे." ते सत्तत्त्वाविषयीं म्हणतात, "शबरी, परमेश्वर जरी सर्व चराचरांत भरून राहिला असला तरी कांहीं वस्तूंत त्याचें वैभव जास्त स्पष्टपणें प्रतीत होतें व आपलें मन त्या ठिकाणीं विनम्र होतें." दलितमानवांविषयीं ते लिहितातः " खरेंच, पडित जमिनींत खत घालून, तिची नीट मशागत करून जसें उत्कृष्ट पीक काढतां येतें, जेथें दगडधोंडे, कांटेकुटे आहेत तेथेंहि प्रयत्न केले, तर फुलांफळांनीं, सस्यांकुरांनीं नटलेली सुंदर सृष्टि जशी शोभूं शकते, तसेंच मानवी मनाचेंहि आहे. या जगांत प्रयत्न हा परीस आहे. प्रयत्नानें नरकाचें नंदनवन होतें, कोळशाचीं माणकें होतात. आपण शेताभातांची निगा राखून पीक काढतो पण मानवी मनाची अमोल शेती मात्र आपण करीत नाहीं. " अशीं कित्येक विचारमौक्तिकें 'शबरी' याच कथेंत इतस्ततः विखुरलेलीं आहेत.

एकंदरींत ही गोष्ट नितांतरम्य साधली आहे.

या कथाभागांतील दुसरी गोष्ट 'यज्ञ' ही आहे. यज्ञ ही सर्वश्रेष्ठ ईश्वरोपासना आहे. परंतु मानवानें यज्ञोपासना सोडल्यामुळें परमेश्वरानें त्याची परीक्षा घेऊन व दधीचि ऋषीच्या यज्ञमय शरीरानेंच जग कसें वांचूं शकलें हें दाखवून गुरुजींनीं यज्ञमहति वर्णन केलेली आहे. अर्थात् नेहमींच्याच पाल्हाळानें आणि यथासाग वर्णनानें हीहि गोष्ट पुरी करण्यांत आली आहे. ही गोष्ट कथन करण्यांत दुसराहि एक हेतु त्याचें मनांत होता. ज्या साबरमतीच्या पवित्र तीरावर दधीचि ऋषींनीं यज्ञमार्ग अवलंबून परमोच्च पावित्र्य प्राप्त करून घेतलें त्याच ठिकाणीं, त्याच तत्त्वांचा अंगीकार करणारा एक महान् मानव आजहि वास्तव्य करीत आहे. तेव्हा गुरुजींनीं दधीचिमहात्म्य यथासांग वर्णन करून यज्ञ हा किती आवश्यक आहे हें पटवून ही गोष्ट महात्मा गांधींपर्यंत आणून सोडिली आहे; त्याशिवाय या अतिप्राचीन व अर्वाचीन गोष्टींची तुलना करून आजहि स्वार्थाचा, संकुचितपणाचा, द्वेषाचा बळी देऊन यज्ञपूजा हवी आहे हा सारांश काढला आहे.

ठिकठिकाणीं मार्मिक संवाद व उठावदार वर्णने आलीं आहेत. आपल्याहून श्रेष्ठ अशा इंद्रदेवाची जेव्हां वरुणदेव कानउघाडणी करतो, तेव्हांचा संवाद मोठा वाचनीय आहे. आजहि त्याच्यापासून बोध घेण्यासारखा आहे. वरुणदेव म्हणतात, " तुम्हांला उगीच का देवेंद्र केलें ? मोठें पद म्हणजे मोठी जबाबदारी ! पण तुम्ही स्वस्थ व सुस्त राहिलेत ! कर्तव्य हें कठोर असतें. देवांनाहि कर्तव्यपराङ्मुख होऊन चालत नाहीं."

इंद्राणी इंद्रास म्हणते, " ... दुर्दैवी आहेत स्त्रिया झालें ! तुम्ही पुरुष मात्र निर्दोषी, होय ना ? आम्ही मोहमाया नि तुम्ही ? मोह पाडीतच नसाल ? आम्ही जणूं पुरुषांच्या जीवनांत विषयाचे विषकंद लावतों."

दधीचि व त्याच्या पत्नीमधील उत्साहवर्धक संवाद असाच आहे.

" जातों, मुलांना जप."

" जा, विजयी व्हा, कृतकृत्य व्हा."

" जा आतां मागें !"

" तुम्ही जा आतां पुढें." वगैरे.

आणखी एक विचाररत्न तळपत आहे. ते एके ठिकाणीं म्हणतात, " ही सारी पृथ्वी बलवंतांची आहे. दुबळ्यांना काहींएक मिळावयाचें नाहीं. दुबळ्यांना पदोपदीं भीति. दुबळ्याना ना मान, ना स्थान; ना विद्या, ना धन... बलवंत व्हा. जो निर्भय आहे, तोच मुक्त आहे!" या गोष्टीच्या शेवटीं गुरुजी म्हणतात, " संयमाची आज टिंगल होत आहे. वासनांना ऊत आला आहे... खरी संस्कृति लोपली आहे. मानव्य मेलें आहे. जिकडे तिकडे भेद, मत्सर, कलह, द्वेष... " यज्ञाची महति सांगतांना ते म्हणतात, " यज्ञ हाच तुमचा परमेश्वर. यज्ञ हा सखा. यज्ञ ही कामधेनु. यज्ञ हा कल्पवृक्ष. यज्ञ म्हणजे चिंतामणि. यज्ञ म्हणजे स्पर्शमणि..."

वरील विचारमौक्तिकें अशीं अधून–मधून आढळल्यामुळें त्यांनीं केलेल्या पाल्हाळालाहि सरसपणा आलेला आहे व ही सर्व प्रदीर्घता सह्य झाली आहे. केवढे तरी उदात्त विचार सहजतेनें, लीलया पसरविले जात आहेत. हे उदात्त विचार पसरवीत असतांना त्यांच्या गोष्टींतील सर्व भाषा अत्यंत त्रोटकवाक्यपूर्ण व अर्थपूर्ण अशीच असलेली दिसते. शब्दांचें जंजाळ न पसरवितां मोजक्या शब्दांत सर्व चित्र उभें करणें हें त्यांना साधतें. अर्थात् जें सांगावयाचें त्याबद्दल ते फारसा संयम बाळगीत नाहींत; परंतु जें सांगितलें जातें तें मात्र रसपूर्ण व परिपूर्ण असतें.

परमेश्वर जेव्हां यज्ञ करा असें सांगतो, तेव्हां तो म्हणतो, " जा आतां सारीं. खेळ:सुरू करा. प्रयोग सुरू करा. पडा, चढा, रडा, हंसा..." ज्या वेळीं वृत्रानें सूर्य गिळला आणि सर्व पृथ्वीवर अंधाराचें व निवृत्तीचें साम्राज्य पसरलें, त्यावेळचें वर्णनहि बहारदार आहे. " परंतु पुढें भयंकर स्थिति झाली. कोणास बाहेर पडवेना–हातपाय गारठून गेले. असह्य गारठा, पांखरें मेल्यासारखीं झालीं. माद्या पिलांना पंखांत घेत होत्या. पांखरें एकमेकांचीं वैरें विसरून एकमेकांच्या जवळ आलीं. एकमेकांच्या अंगांशीं ऊब एकमेकांस देऊं लागलीं. पशूही तसेंच करूं लागले. सिंह गारठले, ते हरणांच्या अंगांना चिकटून बसले. हरणांनीं आपलीं अंगें सिंहाच्या आयाळींत घुसवलीं. लांडग्यांच्या जवळ ससे येऊन राहिले. संकटांत प्रेमधर्म आला!!

दधीचीची समाधि पूर्ण साधल्यानंतरचें वर्णन पाहण्यासारखें आहे. "दधीचीचा देह पाहून पांखरें वेडीं होत. हरणें वेडीं होत. त्याचे ते डोळे आणि

त्यांतील ते बुब्रुळ...शक्तिपुटांतून काळ्या रंगाचीं निर्मळ मोतींच बाहेर पडत आहेत असें वाटे...दांत म्हणजे जणूं हिऱ्यांची पंक्ति, मोत्यांची आवलि!"

ह्या कथासंग्रहाची शेवटली गोष्ट 'त्यागातील वैभव' ही होय. हीत लक्ष्मीचा गर्वहरण करणारी कथा सांगून त्यागातच खरे वैभव कसें असते हे दर्शविलें आहे. सरस्वती, पार्वती, सावित्री ह्या जेव्हां आपापल्या पतीजवळ हट्ट घेऊन वैकुंठास उत्सवासाठीं जाण्याची परवानगी काढतात, त्या वेळीं मोठे वस्तुस्थितिनिदर्शक व नर्म विनोद करणारे संवाद योजिले आहेत. सावित्री हंसावर बसून जाण्याची तयारी करते, तेव्हां ती ब्रह्मदेवास म्हणते, "मला बसवा ना. जरा हात द्या. असें काय अगदीं करता तें?"

"तुम्ही बायका म्हणजे अगदीं गांठोडीं. बस पटकन्. मार उडी. जेथें तेथें तुमचा हात धरायला हवा." ब्रह्मदेवाचें उत्तर.

"तुम्हींच ही संवय लावलीत. तुम्हींच आम्हाला अबला केलेंत—"

"तूं माझ्या मूषकावर बैस." गणपति म्हणाले.

"तुमची नेहमीं उठून थट्टा!" सरस्वती म्हणाली.

"यांत काय थट्टा? हा उंदीर टुणटुण उड्या मारीत जाईल."

"उंदीर ओंगळ आहे. त्याच्यावर तुम्हीच शोभतां."

"म्हणजे मी वाटतें ओंगळ?"

"ओंगळ नाहीं तर काय? नीटनेटकें राहतांच येत नाहीं. अघळपघळ सारें काम. उगीच का तो चंद्र मागं हंसला?"...इत्यादि.

देवांगना जरी झाल्या, तरी त्यांना मत्सर थोडाच सुटला आहे? सरस्वती शंकराच्या जटेतील एक केस उपटून घेऊन आली, तेव्हाचे टोमणे बघण्यासारखे आहेत. "पार्वतीनेंच शंकराला सतावले असेल. हें द्या, तें द्या म्हटलें असेल. मग लागला नवरा विष प्यायला. म्हणे जगाच्या कल्याणासाठीं विष प्याले! सारे देखावे. घरांत असतील रोज उठून झगडे. निघाले जीव द्यायला—"

सरस्वतीला इतर देवांगनांनीं विचारलें, "काय आणलेंस ग?" ती उत्तरली, "जटेंतील केंस." "अय्या, तो कशाला?"

"पत्नीने केंसानें गळा कापावा म्हणून...." एकूण बायकांचा स्वभाव इथून तिथून एकच.

ह्या समारंभाकरतां वैकुंठास बनविलेल्या प्रासादाचें वर्णन पाहण्यासारखें आहे. "...समुद्राच्या निर्मळ फेंसापासून प्रासाद उभारण्याचें त्यानें योजिलें. शुभ्र स्वच्छ प्रासाद. मधूनमधून हिरे, माणकें, पांचू, इंद्रनीळ वगैरे रत्नें बसविण्यांत आलीं होती. पोंवळयाचे नयनमनोहर वेल ठायीं ठायीं सोडण्यांत आले होते. शेषाने सर्पोच्या मस्तकावरचे कोट्यवधि तेजस्वी मणि पाठवून दिले; ते मणि सर्पाकार असे भिंतीतून बसविण्यांत आले...नंदनवनांतील कल्पवृक्षांचे पल्लव आणून तेही मधून मधून लावण्यांत आले..." वैकुंठाचें त्याचप्रमाणे तेथील सोहळयाचें वर्णन जितके विस्तारपूर्ण आहे, तितकेंच आल्हाददायकहि आहे. शेवटीं लक्ष्मीच्या शब्दांनींच गुरुजींनीं गोष्टीचा शेवट केलेला आहे व तो ध्यानांत ठेवण्यासारखा असा आहे. ते शब्द असे—
" खरें भाग्य विभूतीचें. त्यागाचा दागिना खरा. जगाची सेवा करतां करतां ज्यानें सर्वस्वाचा त्याग केला, तोच खरा भाग्यवान. जेथें त्याग तेथें वैभव-"

गुरुजीच्या ह्या थोडयाशाच लघुकथेंत पुष्कळ ठिकाणीं पाल्हाळ, तंत्र-हीनता, जिज्ञासेचा अभाव, उपदेशकथन इत्यादि दोष दिसत असले, तरी ते जें सांगतात, जे कथन करतात ते अत्यंत जिव्हाळ्यानें, कळकळीनें, कोणत्याहि प्रकारचें ढोगसोंग न करतां सांगत असले, तरी त्याचा एक विशिष्ट ठसा वाचकाच्या मनावर उमटल्याशिवाय राहत नाहीं. हाच कार्य-भाग त्याना त्यातून साधावयाचा असल्याकारणानें ते एक निष्ठावंत कथा-लेखक आहेत असेंच म्हणावेसें वाटतें.



## बालवाङ्मय

“ करी मनोरंजन जो मुलांचें
जडेल नातें प्रभुशीं तयाचें ”

वरील पद्ययुग्म गुरुजींनीं प्रसिद्ध केलेल्या प्रत्येक गोड गोष्टीवर छापलें आहे. आणि तें तसें छापून एक प्रकारें त्यांनीं आपलें बालवाङ्मय लिहिण्याचें मनोगत विशद केलेलें आहे. आणि खरेंच हा एक मोठा बिकट प्रश्न आहे. बालगोपालांकरितां लिहिलेल्या वाङ्मयाचा प्रधान हेतु काय असावा ? कारण, त्याच्याकरितां लिहिलें जाणारें वाङ्मय मनोरंजक तर हवेंच, त्याशिवाय मुलांना त्याची कशी गोडी उत्पन्न होणार ? पण केवळ मुलांचे मनोरंजन हें एकच ध्येय डोळ्यांसमोर ठेवून बालवाङ्मयनिर्मिति करावी का, हा एक मननीय प्रश्न आहे. आणि म्हणूनच या महान प्रश्नाचें साधें पण तत्त्वगंभीर असें उत्तर गुरुजींनीं या पद्ययुग्माच्या रूपानें देऊन टाकिलें आहे.

केवढा थोर विचार या दोन ओळींत भरला आहे पहा—! मुलांबाळां-करितां वाङ्मय लिहावयाचें, आपली लेखणी झिजवायची, अलभ्य अशा प्रतिभेचा व्यय करावयाचा, आणि देह आणि काळ दवडायचा तो काय फक्त चार मुलांचें मनोरंजन होईल एवढ्याच हेतूनें ? का आणखी कांहीं श्रेष्ठ श्रेयस् त्याच्यापासून मिळतें ? आणि तसें कांहीं ‘ विशेष ’ मिळत असेल तरच ही सेवा करण्यांत कांहीं अर्थ ? गुरुजींनीं विचार व अनु-

भवपूर्वक असें ठाम मत दर्शविलें कीं, 'बाबांनो ! संशयांत पडूं नका. खात्री बाळगा, कीं, जर तुम्हीं बालगोपालांचें मनोरंजन केलें, तर साक्षात् परमेश्वराशीं तुमचें नातें जडेल. तुम्ही त्याचे व्हाल. तो तुम्हांला जवळ करील, धन्य करील.' याहून आणखीं कोणतें मोठें बक्षिस लेखकाला हवें असणार ?

तेव्हा मनोमनी अशी पूर्ण खात्री बाळगूनच गुरुजींनीं अहोरात्र खपून विशिष्ट दर्जाचे व पद्धतीचे बालवाङ्मय निर्माण केलें आहे. पण हें झालें गुरुजींचें मत. त्यांनी व्यक्तिशः आपल्याला काय वाटते तें या पद्ययुग्माच्या द्वारें दिग्दर्शित केलें आहे. बालवाङ्मयाचें शिष्टसंमत असें ध्येय कोणतें, तें कां लिहिले जावे, ते लिहिले जात असताना कोणकोणत्या मूलभूत तत्त्वांकडे लेखकानें लक्ष पुरविले पाहिजे याहि गोष्टी आपणास आधीं लक्षांत घ्याव्या लागतील. मग शिष्टसंमत अशीं जी चार तत्त्वें बालवाङ्मयाला मूलभूत म्हणून आपण ठरवूं, त्याच्या कसोटीला गुरुजींचें बालवाङ्मय कितपत उतरते ते पाहूं.

इंग्रजाचें राज्य हिंदुस्थानात रूढमूल होण्यापूर्वी आपल्याकडील वाङ्मय अगदीं ठरीव सांच्याचे असे. आंग्लपूर्वक काळात पद्यच फार. गद्य जवळ-जवळ नव्हतेंच. आणि ते पद्यहि सर्व ईशस्तुतिप्रीत्यर्थ वाहिलेलें. वर्ण्य विषय निवडावयाचे ते कथापुराणातून आणि त्या विषयांना अध्यात्माची जोड देऊन मगच ते विषय जनतेसमोर ठेवावयाचे. तेव्हां भक्तिकाव्य हें आंग्ल-पूर्व काळाचें वैशिष्ट्य म्हणतां येईल. आंग्लकाळांत गद्य लिहिण्याकडे बऱ्याच लोकांचा कल झुकूं लागला. पण हे सर्व प्रथमारंभीचे लेखक, पंडित होते आणि त्यांची लेखनशैली साहेबी वळणावर झुकत चाललेली होती. बरेंचसें शालोपयोगी वाङ्मयच या काळांत निर्माण होऊं शकलें. थोडा काळ गेल्यानंतर कै. छत्रे यानीं केवळ मुलांकरता 'वेताळ पंचविशी' व 'सिंहासन बत्तिशी' हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. मराठी वाङ्मयांतील संकलित अशा ह्याच पहिल्या बालकथा होत. पुढें १९ व्या शतकांत व विसाव्या शतकाच्या प्रारंभीं जास्त सुजाण असा प्रयत्न केला गेला. कै. विनायक कोंडदेव ओक यांनीं इ. स. १८४० मध्यें 'बालबोध' हें बालगोपालांसाठीं एक मासिक सुरू केलें. त्यांतील जवळ जवळ सर्वच लिखाण त्यांनीं एकट्यानें केलें

असल्यामुळें आणि बालमनाचा योग्य अदमास त्या काळीं त्यांना आलेला नसल्यामुळें हें मासिक तितकेसें लोकप्रिय होऊं शकलें नाहीं.

१९०६ च्या ऑगस्ट महिन्यांत कै. वा. गो. आपटे यांनीं 'बालबोध' मासिकांतला एकांगीपणा नष्ट करणारें आणि विविध व विचित्र दालनांनीं नटलेलें असें 'आनंद' मासिक सुरू केलें. केवळ मुलांकरिता व त्यांना पूर्णपणें रुचेल अशा रीतीनें केलेला हाच पहिलावहिला स्तुत्य प्रयत्न होय. पद्याच्या बाबतींत, विशेषतः प्रो. मायदेव यांनीं अत्यंत स्तुत्य अशी कामगिरी केलेली आहे, आणि केवळ मुलांकरितां अशा त्यांनीं अनेक कविता रचिल्या आहेत. नागपुरास प्रो. बेहेर व प्रो. पंडित यांनीं शिशुगीताचे सुंदर नमुने निर्माण केलेले आहेत.

बालमनाची घडण ही कांहीं औरच असते. पुष्कळांस असें वाटतें, कीं मुलांचें मन म्हणजे मोठ्या माणसाच्या मनाची छोटी आवृत्ति—नव्हे कांहीं काहीं लोकाना तर असेंहि वाटतें, कीं लहानमुलाना कसलें आलें आहे मन? त्यांच्या शारीरिक गरजा भागल्या कीं पुरे. मग त्यांना आणखी कसलीहि गरज नसते. परंतु ही गोष्ट साफ चूक आहे. बालमनाचा ज्यांनीं अभ्यास केला आहे ते असें म्हणतात, कीं मुलांस थेट जन्मल्यापासून मन असतें. पण त्याची स्पष्ट जाणीव मूल जसजसें मोठें होत जातें तसतशी आपणांस होते. अगदीं लहान मूलहि आईवर संतापतें, चिडतें आणि प्रेम करतें. त्या बालकालाहि राग, द्वेष, मत्सर, भीति हे विकार असतातच. याचा अनुभव आपणांस नित्यशः येतोही. लहानग्याला एखादें नाजुक भडक रंगाचें खेळणें दिलें कीं तें किती आनंदून जातें! आणि तेंच त्याच्या हातांतलें खेळणें तुम्हीं हिसका बघूं–अरे बाप रे! तें किती चिडतें व केवढी धुसपूस करतें!

आहेत कीं नाहीं त्याला प्रेम नी राग वगैरे भावना? आहेत तर. आणि या सर्व भावना म्हणजेच मनोविकार होत. तेव्हां अगदीं लहान मुलांनासुद्धां मन असतें हें आपण पक्कें ध्यानांत धरावयास पाहिजे. परंतु बालमनांत आणि प्रौढ मनांत फरक मात्र विलक्षण असतो. तुम्हां आम्हांला जें आवडेल तेंच त्यांना आवडतें—आवडावें ही समजूत पूर्ण चुकीची आहे. कारण या दोन मनांची ठेवण पूर्णपणें निराळी आहे. बालमनाला कोणतीहि कल्पना

चटकन समजावी लागते, दिरंगाई चालत नाहीं, कोणताहि अडथळा मध्यें येतां कामां नये. त्यांना सर्व झटपट समजलें व उमजलें पाहिजे तरच त्यांना त्या गोष्टीपासून बोध व आनंद होतो. आणखी एक महत्वाची गोष्ट म्हणजे त्यांना अद्भुतरम्यतेची विलक्षण आवड असते. प्रत्येक कथेमध्यें कांहीं तरी अद्भुत व रम्य पाहिजे आणि त्याशिवाय सांगितलेली प्रत्येक गोष्ट जरा भडकच पाहिजे तरच बालमन तेथें गुंतेल व रंगेल.

बालमनाला आवडणारी ही अद्भुतरम्यता वारंवार सांपडणार तरी कोठें, हा एक मोठा बिकट प्रश्न आहे. तसे पाहिलें तर आपल्याकडे विपुल असें 'लोकवाङ्मय' आहे. त्यातही अद्भुतरम्यता ओतप्रोत भरलेली असते. दंतकथाही या दृष्टीनें उल्लेखनीय आहेत. तेव्हां ज्या कथांतून काहीं तरी विस्मयकारक आणि रम्य असेल त्याच कथा मुलाना आवडणार. तत्त्वगंभीर कथा तुम्हांआम्हांला कितीहि रमणीय आणि मननीय वाटल्या, तरी बालमनाला त्यांचा यत्किंचित्‌हि मोह पडणार नाहीं. 'अरबी भाषेतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टी', 'इसापच्या गोष्टी', 'परींच्या गोष्टी', 'राक्षसांच्या कथा' या आणि असल्याच तऱ्हेच्या कथा बालकांना प्रिय होऊं शकतात. मात्र त्यांतील प्रत्येक कथा अवश्यमेव सुरसहि पाहिजे आणि चमत्कारिकहि पाहिजे. नाहीं तर त्या कथांकडे मुलें ढुंकूनहि पाहणार नाहींत.

येथें असा एक प्रश्न उद्भवतो, कीं परींच्या आणि राक्षसांच्या केवळ काल्पनिक गोष्टीच कां मुलांसमोर ठेवावयाच्या ? आणि असलें ते कल्पनारम्य वाङ्मय वाचून त्यांची सत्याची चाड कमी नाहीं का होणार ? परंतु हा भ्रम निरर्थक आहे. उलट त्यांच्या बालमनाला हेंच काल्पनिक वाङ्मय जास्त पोषक असतें व त्याना कल्पनाविलास करावयास शिकवून तें त्यांचा कल्पनाविकास करतें. अर्थात् प्रत्येक नियमास अपवाद हा असतोच.

बालमनाला कोणत्या मूलभूत भावना जास्त जाणवतात व त्यावर त्यांचें कथावाङ्मय कसें रचिले गेलें पाहिजे हें आपण पाहिलें. आतां एकच मुख्य गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. बालमनाचा विकास व्हावयाचा असतो. तेव्हां त्या विकासावस्थेंत त्यांच्यासमोर अत्यंत उत्कृष्ट व सुंदर असाच आदर्श ठेविला पाहिजे. त्यांना सुरस आणि चमत्कारिक आवडतें म्हणून वाटल तें

दुष्ट वाङ्मय त्यांच्यासमोर ठेवून उपयोगी नाहीं. कारण तसें करण्यानें त्यांचा सर्वनाश होण्याची भीति असते. पाश्चिमात्य मुलांचीच हकीकत पहा ना. 'मॅडोना', 'मोनालिसा' इत्यादि सौंदर्य व सामर्थ्य यांचे अतिश्रेष्ठ असे नमुने त्यां मुलांपुढें नेहमी ठेविले जातात. तिकडील मुलांना आंग्ल श्रेष्ठ कवि शेक्सिपयर आणि त्याच्या भव्य कृति याची अगदी लहानपणापासूनच ओळख करून दिली जाते. प्रत्यक्ष सृष्टींत कितीहि घाण असो, डबडब असो, बाल-मनाला नेहमी 'भव्य नि दिव्य' असाच आदर्श दृष्टीसमोर दिसला पाहिजे; तरच त्याची मानसिक अधोगति थाबून उन्नति होईल. आपल्याकडील जें जें म्हणून 'भव्य नि दिव्य' असेल, ते ते त्याच्या समोर ठेविले गेले पाहिजे; मग त्या गोष्टींतील 'रहस्य' आज त्याला न समजलें तरी चालेल. असे कर-तांना अन्यदेशीय 'भव्य नि दिव्य' अशा लोककथा भाषांतरित करून आपण त्यांच्यासमोर ठेविल्या पाहिजेत.

वर चर्चिलेलीं तत्त्वें गुरुजींनीं लिहिलेल्या बालवाङ्मयांत कितपत योजिलीं गेलीं आहेत, याचा विचार करून त्यांच्या बालवाङ्मयास वरील कस लावून पाहणें अत्यंत आवश्यक होय.

गुरुजींनी 'बालवाङ्मय' विपुल लिहिलें आहे. त्या बाबतींत ते कै. वा. गो. आपटे व कै. 'बालबोध'कार ओक यांचीच बरोबरी करू शकतील. त्यांचा उद्योग प्रचंड आहे व त्याची प्रतिभा अखंड आणि उदंड आहे. म्हणूनच त्यांना हें सर्व साधलें. गुरुजींनीं मुलांकरितां खूपशा 'गोड गोष्टी' लिहिल्या असून त्यांचे एकदर दहा भाग आहेत. नंतर 'सोन साखळी', 'श्रीशिवराय चरित्र', 'दासचरित्र' 'गाधीचरित्र' इत्यादि आणखी दोन चांर पुस्तकें आहेत. असे असलें, तरी त्यांच्या बालवाङ्मयांत मानाचें स्थान मिळतें व मिळेल त्यांच्या 'गोड गोष्टी'ना आणि या गोष्टी खरोखरच गोड आहेत. त्यांनीं स्वतःच ते नांव सुचविलेलें आहे. अर्थात् या गोड गोष्टीत कांहीं दोषहि प्रामुख्यानें डोकावतात. एकंदरींत पाहतां त्या गोष्टी गोड आहेत हें मात्र निःसंशय. कसे तें पाहा:

ह्या गोड गोष्टी लिहितांना एक गोष्ट मोठी छान केली आहे. त्यांनीं आपल्या मनाचें मोठें औदार्य दाखवून अन्यदेशीय व अन्य संस्कृतींतील अनेक 'भव्य नि दिव्य' कथा आपल्या मुलांसमोर ठेविल्या आहेत. अपल्या

भाषेतहि अशा अनेक कथा आहेतच. परंतु अन्यदेशीय उत्कृष्ट लोककथा केव्हां तरी त्यांनी आत्मसात् केल्या आणि आपल्या बालगोपालाचा फायदा व्हावा म्हणून त्यांची वैशिष्टयपूर्ण अशी भाषा वापरून निवेदिल्या. असें करीत असताना लेखकाचें मन मोठें सहिष्णु असावे लागते. आपलें बालमन अतिसमृद्ध झाले पाहिजे हीच त्याची सदिच्छा. मात्र दोष असा म्हणतां येईल कीं, ह्या सर्वच कथा अन्यदेशीय नको होत्या. हे असे कां व्हावे—कांही सागता येणे शक्य नाहीं. परंतु गोड गोष्टींकरता गुरुजींनीं ज्या कथा निवडल्या, त्या जवळजवळ सर्वच अन्यदेशीय आहेत हे मात्र खरें. पण अन्यदेशीय का असेनात, त्या कथाच्या रूपाने उदात्त असे आदर्शच त्यानीं बालगोपालासमोर ठेविले आहेत, हे केव्हाहि उत्तमच झाले.

'मनुबाबा' ही जॉर्ज इलियट हिच्या 'सिलास मॉर्नर' यावरून सुचलेली कथा होय; तर 'फुलाचा प्रयोग' ही ड्युमाच्या 'Black Tulip' वर आधारलेली. 'नदी शेवटीं सागराला मिळेल' ही कथा गटेच्या 'फौस्ट' ने सुचविलेली, तर 'दुःखी' ही कथा व्हिक्टर ह्यूगोच्या 'Les Miserables' वर आधारलेली. 'चित्रा नि चारू' व 'बेबी सरोजा' ह्या तामीळ लोककथावरून सुचलेल्या, तर 'करुणादेवी' ही एका चिनी नाटकावर आधारलेली. साऱ्याच कथा अन्यदेशीय असल्या, तरी त्यांचा स्वैरानुवाद भारतीय संस्कृतीला पोषक असाच झालेला आहे. इतरहि बारीक सारीक गोष्टीपैकी काही बंगालीतून घेतलेल्या, तर काहीं खाजगी मित्राने सागितलेल्या. या सर्व कथापैकीं केवळ स्वकपोलकल्पित अशी एकहि गोष्ट नव्हे. परंतु कथाभाग दुसऱ्या कथावरून सुचला असला, तरी तो बालगोपालांसमोर मायबोलींतून माडतांना केलेली सारी करामत मात्र गुरुजींची. 'भव्य नि दिव्य' याचा आदर्श बालगोपालासमोर मांडताना अद्भुतता, सुरसता व विस्मयकारकता यांचा त्यांनी भरपूर प्रमाणात उपयोग करून घेतला आहे. मुलांना विस्मय हवा असला, तरी तो शक्य कोटीतील हवा असतो. गुरुजींनीं ज्या ज्या विस्मयकारक गोष्टी वर्णिलेल्या आहेत, त्या सर्वच शक्य कोटींतल्या आहेत. त्यामुळें तो चमत्कार मुलाना ग्राह्य व हृद्य वाटतो.

'भिकंभट' ही गोष्ट पाहा. त्या गोष्टींत असल्याच प्रकारचा चमत्कार वर्णन केलेला आहे. गरीब असतो बिचारा तो भिकंभट. परंतु असल्या गरीब

ब्राह्मणांच्या बायका बहुधा मोठ्या आणि दक्ष असतात. तिच्या तगाद्यावरून तो रानावनांत धरणें धरून बसतो. तिथें त्याला भगवान् शंकर प्रसन्न होतात आणि एकामागून एक अशा तीन मडक्यांचा वर देतात. पहिल्या मडक्यातून ‘ चुरमुरे ’ बाहेर पडतात, तर दुसऱ्यातून धिप्पाड असे राक्षस बाहेर पडतात, तर तिसऱ्यातून श्रीखंड बाहेर पडतें. लक्षात ठेवा, साध्या अशा मडक्यातून ह्या गोष्टी बाहेर पडतात बरें का ! आहे कीं नाहीं चमत्कार ? परंतु हे सर्व चमत्कार भगवान् शंकर करीत आहेत हें मुलाना माहित असतें व त्यामुळेच त्याचा त्यांवर विश्वास बसतो व तीं प्रमुदित होतात.

चमत्कार करणें ही एक अतिमानुष गोष्ट आहे हें मुलानाहि उमजत असतें. सामान्य माणसाने चमत्कार केल्याचें त्यांना माहित नसतें, अगर त्याच्या तें ऐकिवात नसते. समजा, सामान्य माणसानें चमत्कार केलाच, तर तो माणूस त्या चमत्काराला ‘ केवळ निमित्तमात्र ’ कारण झालेला असतो व त्या सर्व चमत्काराच्या मागें खुद्द परमेश्वर अगर अशीच एखादी अतिमानुष शक्ति असते. म्हणूनच साधुसंतांनीं केलेल्या चमत्कारांवर बालकांचाच काय, परंतु थोर माणसाचाहि विश्वास बसतो हें लक्षांत घ्यावयास हवे आहे.

‘ आवडती–नावडती’ ह्या गोष्टींत बघा. ती नावडती एका साधूच्या सांगण्यावरून एका विशिष्ट तळ्यात तीनदां स्नान करते. एकदम कुरूप असलेली ती सुरूप होते. त्याच्या उलट प्रथम आवडती असलेली स्त्री जेव्हां त्याच तळ्यात अधाशीपणाने चवथ्यादा उडी मारते, तेव्हां मात्र तिचे असलेलें लावण्य ती गमावून बसते ! आहे कीं नाहीं चमत्कार ? मुलाना यांत आनंद झालाच पाहिजे. ‘न्याय देणारा गुराखी’ या गोष्टींत एक छोटासा अज्ञ गुराखी महान् राजालाहि न जमणारा असा न्यायनिवाडा देतो आणि गोष्टीच्या शेवटी तें त्रिंबक भटजीचें भूत एका बाटलींत शिरतें ! या वेळीं मुलाच्या अंगावर खासच रोमाच उभे राहत असले पाहिजेत. राजा-राणीला मूल होत नसेल म्हणून जर ते अति दुःखी असतील, तर गुरुजींनीं सांगितलेल्या अनेक गोष्टींतून एकादा साधु येतो, कांहीं तरी जडीबुट्टी देऊन जातो आणि काय आश्चर्य, त्या राणीला मूल होतें ! मुलांना मोठीच गंमत वाटत असेल या वेळीं. ( उदा. गोसावी, सोन्याची सांखळी इत्यादि ).

अशा स्वरूपाचे चमत्कार चितारीत असतांना गुरुजींनी आणखी एक वैशिष्ट्य दाखविलें आहे. तें असेः–चमत्कार तर वर्णन करावयाचाच; परंतु तो वर्णन करीत असताना हळूच एखादें महान् तत्त्व त्यात गुंफून द्यावयाचे. अशा पद्धतीनें थोर तत्त्वाचे आकलन लहान मुलाना अवश्य होते. केवळ तत्त्वगंभीर अशाच गोष्टी त्याना सागण्यात आल्या, तर तात्त्विक गोष्टींविषयीं त्याच्या मनात विलक्षण अढी बसते. तसे हाऊं नये म्हणून गुरुजींनीं अवलंबिलेलें तंत्रच शास्त्रशुद्ध होय.

'स्वर्गातील माळ' या गोष्टीतहि चमत्कार आलेला आहेच. त्या चमत्कारामागील कल्पना अशी. आमोदे नावाचे एक गांव असते. तेथील नागरिकांत जो कोणी सर्वोत्कृष्ट दान करील, त्याच्या गळ्यात दिवाळीस स्वर्गातून येणारी एक माळ पडत असे. एके वर्षीं ही माळ एका अनाथ, दरिद्री मुलीच्या गळ्यात पडली. केवढा चमत्कार ! पण तिच्याच गळ्यात का पडली ? त्याचें कारण असे कीं, तिने एका अनाथ बालकाला मदत केली होती, आसरा दिला होता. एका अनाथाने केलेली दुसऱ्या अनाथाला मदत ! केवढा उदात्त व गंभीर विचार ! 'एकमेका सहाय्य करूं 'अवघे धरूं सुपंथ' हें एक महान् तत्त्व गुरुजींनीं त्या गोष्टीतून किती हळुवारपणें गुंफिलें आहे बरे ? शिवाय बालकाना ते सहज पटेल. बक्षिसाची आवड मुलांना फार. तें कसें मिळतें ते पाहिलें कीं त्याच्या या कौशल्याची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. 'खरा मित्र' या गोष्टींतहि असेच. एक राजपुत्र असतो व दुसरा प्रधानपुत्र असतो. हा प्रधान–पुत्र म्हणजेच खरा मित्र. अनेक चमत्कार व घडामोडींनंतर असे मुलांच्या मनावर बिंबविलें जातें कीं, खरा मित्र असावा तर असाच.

'अश्रूंचें तळें' ही गोष्ट जरा निराळ्या तऱ्हेची आहे. या गोष्टीची कल्पना एका हिंदी गोष्टीवरून गुरुजींना सुचली आहे. गोष्टीचें नांव मोठें सूचक व रमणीय तर खरेच. दरिद्री लोकाना रडण्याशिवाय दुसरें कोणतें समाधानाचें साधन असणार ? अशा रडणाऱ्याच्या अश्रूंचें एक तळें बनलेले आहे ही केवढी रमणीय पण उदास–गंभीर कल्पना ! बापाच्या उरलेल्या चिंधीला 'धर्मा' नांवाचा एक मुलगा प्राणापलीकडे जपतो. केवढी पितृभक्ति ! जेवणाच्या वेळचीं 'दोन दृश्यें' वर्णन करतांना गुरुजींनीं 'आत्म-

वत् सर्वभूतानि ' हें महान् तत्त्व बालकांसमोर मोठ्या सहृदयतेनें माडलें आहे. ' घामाचीं फुले ' या रामायणातील एका प्रसंगावर आधारलेल्या मार्मिक गोष्टीत, त्याच्या मनांत अलीकडे घोटाळणाऱ्या ' समाजसत्तावादाचें ' तत्त्व, त्यांनी मोठ्या आस्तिकपणे, मुलाच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केलेला आहे असें दिसते. ' श्रमांचा तिरस्कार करूं नका. जो श्रम करतो तोच देयाला आवडतो,' ' न हि श्रान्तस्य ऋते सख्याय देवाः ' हें उदात्त वेदवाक्य येथे उद्धृत करून अत्यंत चतुराईने त्यानी त्या वाक्यांतील मर्म मुलाना विशद केले आहे.

आणखी एक तिसरा प्रकार ह्या गोष्टींतून डोकावत आहे. ह्या गोष्टी कथन करताना गुरुजींनी असे ठासून सागितले आहे की, त्या कथा म्हणजे जवळ जवळ सत्यकथा होत. परंतु बालमनाला सुद्धा त्या जरा अतिशयोक्तिपूर्ण वाटतील अशी मला भीति वाटते. परंतु एखादी गोष्ट पटवितांना काही वेळां अतिशयोक्तीचा अवलंब केल्यास दोषास्पद होत नाहीं, हेहि तितकेच खरे.

' बकुळा गाय ' ही गोष्ट बघा. तींत बकुळा गाईची भगवान् श्रीकृष्णा-वरील अनन्यसाधारण भक्ति वर्णन करून पशुपक्षी सुद्धां महान् देवभक्त असूं शकतात असें अतिशयोक्तिपूर्ण वर्णन आहे. ' वामन भटजीची गाय ' हीहि गोष्ट अशाच मासल्याची आहे. एक भाकड ठरलेली गाय, तिच्या धन्याचा हात लागल्याबरोबर पान्हवते व एकदोन चरव्या दूध झराझर देते. ' उदारांचा राणा ' या गोष्टींत दगडधोंड्यांना सुद्धा दयार्द्र अंतःकरणें दाखवून अधून मधून चमत्कारांची सरमिसळ केलेली आहे. मधूनच त्यांचा 'समाज-सत्तावादी' दृष्टिकोन दृष्टीस पडतो, ही या गोष्टींतील आनंदाची गोष्ट होय.

आतां आपण त्यानीं रूपांतरित केलेल्या अन्यदेशीय गोष्टींचा साकल्यानें विचार करूं.

'सोराब व रुस्तुम', 'यति कीं पति', 'मनुबाबा', 'दुःखी' ह्या गोष्टी त्यांना आवडल्या व त्या दुसऱ्यांना आवडाव्यात म्हणूनच मोठ्या कुशलतेनें त्यांनीं त्यांच्यावर मराठीचें लेणें चढविलें आहे. मुलाबाळांपुढें काहीं तरी 'भव्य नि दिव्य' ठेवावें, आदर्श ठेवावेत याच उदात्त हेतूनें त्यांनीं हे श्रम केले. बालमनाला अगोदरच करुण, वीर किंवा अद्भुत ह्या रसांची ओढ

फार. हे सारे रस प्रकर्षानें कोठे दिसत असतील, तर 'सोराब व रुस्तुम' या गोष्टींतच.

ही गोष्ट फिर्दोसी या प्रसिद्ध फारशी महाकवीच्या 'शहानामा' यातील. मुळातील विषय महाकाव्याला साजेल व शोभेल असा. नवरसांची जणूं तेथे अहमहमिका लागलेली. शिवाय त्याना गुरुजींसारखा प्रेमळ, सहृदय व चोखंदळ असा प्रवक्ता मिळाल्यावर त्यांचा विलास काय विचारावयाचा? सोराब जितका अतुल योद्धा तितकाच पितृभक्त. वीर आणि करुणगंभीर प्रसंगाची या कथेंत केवढी ठेचाठेच! कथेचा शेवट शोकमय आहे. तो तसा होण्यास किती क्षुल्लक चूक कारणीभूत होते! ती चूक जितकी क्षुल्लक तितकीच नैसर्गिक. सोराबची आई त्याला त्याच्या पित्याकडे पाठवीत नाहीं. ती म्हणते, " नका कळवूं मुलगा झाला म्हणून. रुस्तुम कठोर आहे, उग्र आहे. ' ती त्या उग्र व तामसी पित्याकडे त्याला पाठवीत नाहीं. सोराबच्या मागे त्याचे सवंगडी एक दिवस लागतात व म्हणतात, " लोक नाना शंका घेतात, जा. आपल्या पित्याचा शोध कर. " लगेच पितृभक्त सोराब आईची समजूत घालून पितृ-शोधार्थ बाहेर पडतो. योगायोग असा, कीं त्याचे व त्याच्या पित्याचेंच द्वद्वयुद्ध ठरतें. इराणच्या शेजारच्या राजाच्या पदरीं सोराब असतो, इराणशी कलह करून तेथील राजाचा निःपात करण्याचें सोराबचा धनि ठरवितो व नंतर सहाजिकच ह्या दोन महायोद्धयांचें युद्ध जुंपते. केवढा करुणगंभीर प्रसंग हा.

रुस्तुमचे वर्णन म्हणजे, " तो पहा त्याचा उग्र, भीषण, राकट चेहरा! त्याचे ते मासल खांदे, रुंद छाती, पीळदार दंड, जणूं तो मूर्तिमंत सामर्थ्यच आहे असे वाटेल. सूर्यासमोर का काजवा टिकेल? सागरासमोर का थिल्लर गर्जेल...... " असे वीररसपूर्ण. " चावट, वात्रट पोर. तू गप्पा मारायला आला आहेस की मरणाला?...... बायकात जाऊन बैस. तेथें नाच, खेळ, मौज कर, नाच्या पोऱ्या दिसतोस—" हें वीरश्री चेतविणारें भाषण.

का कोणास ठाऊक, पण सोराब भयाकुल, शंकाकुल होतो. तो घाव करावयास धजत नाही. रुस्तुमच्या भयंकर घावानें तो धाडदिशीं धरणीमातेवर कोसळतो. आणि येथेच करुणरसाला उठाव येतो. सोराब म्हणतो, "माझ्या

मरणाचा सूड रुस्तुम घेईल." हळुहळुं रुस्तुमला कळून येते कीं, सोराब हा त्याचाच मुलगा. अरेरे, केवढी दुःखद घटना ही. रुस्तुम म्हणतो, "सोराब, सोराब, अरे तूंच का माझा पुत्र ? मीच तो रुस्तुम. मीच तुला मारलें. पित्याने पुत्राला मारले! सोराब, बाळ, अरेरे, कसारे मीं घाव घातला ! कसा भाला मारला...सोराब, सोराब!!"

कुणाहि वाचकाचे डोळे हे शब्द वाचून पाणावतील मग बालगोपालाची गोष्टच कशाला ? केवढा करुण गंभीर प्रसग हा ! नुसत्या वर्णनानेच आपलें हृदय थरारतें, कांपते.

'दुःखी' ही कथा व्हिक्टर ह्युगोच्या 'Les Miserables' ह्या उत्कृष्ट कादंबरीवर आधारलेली आहे. 'जीन व्हाल्जिन्'चा गुरुजींनी बनविला आहे 'वालजी.' हा वालजी एक 'थोर चोर' असतो, अनेक संकटें व हालअपेष्टा सहन करून गरिबाना विशेषतः सुखी करणे ह्या आपल्या ध्येयाकरतां तो धडपडत असतो. मुळांत ही कादबरी फारच अप्रतिम आहे. गुरुजी व्हिक्टर ह्युगोविषयीं म्हणतात, "त्याची प्रतिभा अपूर्व आहे. त्याच्या वर्णनशक्तीस तुलना नाहीं. भावनाचा कल्लोळ तो नाचवतो—" आणि कथेच्या शेवटीं वालजी त्याच्या लिलीस म्हणतो; "परस्परांवर प्रेम करा. संशय नका एकमेकांचा घेऊं...जगाला प्रेम द्या. चोर, दरोडेखोर, खुनी तेही थोर असतात...त्याच्यातून कधीं कधी दिव्यता प्रगट होते..." केवढें विचारशील, थोर अंतःकरण त्या चोराचे ! गुरुजींनीं हा 'आदर्श' मुलांसमोर ठेऊन त्यास अप्रत्यक्षपणें असे सुचविलें आहे कीं, "चोर म्हणूनच हेटाळणी करूं नका. ते सुद्धां थोर असतात. त्यांच्यापासूनसुद्धां पुष्कळ शिकण्यासारखें असतें."

'नदी शेवटीं सागराला मिळेल.' ही कथा विश्वविख्यात जर्मन कवि गटे याच्या "फौस्ट" या महाकाव्यांतील सूत्रावर आधारलेली आहे. गटेचें हें महाकाव्य अमर आहे. गटेपूर्वीच्या काळांत हा फौस्ट सैतानाशीं बारा वर्षांचा करार करतो. त्यानंतर तो त्या सैतानाचा कायमचा गुलाम होतो. म्हणजे शेवटीं विषयीपणा जिंकतो. गटेच्या वेळीं उदारमतवाद संचरूं लागला असल्यामुळें गटे या अमर व अग्रगण्य अशा पौराणिक कथेंत एक महत्त्वाचा बदल करतो. करार तसाच ठरतो, पण त्या बारा वर्षांचे काळांत ज्या वेळीं

' हा क्षण अमर होवो ' असे फास्टच्या तोंडांतून उद्गार निघतील, तेव्हां तो त्या सैतानाचा कायमचा गुलाम व्हावयाचा असतो. खरी गंमत तर येथेंच आहे. केवळ विकारी विषयांना सर्वज्ञ फौस्ट चिकटत नाही. शेवटीं पश्चात्ताप होऊन ' लोकसेवेचा क्षण हाच अमर होवो ' असे तो मनोमनीं ठरवितो व तत्क्षणी मरतो. गुरुजींनीं फौस्टचें मराठी नांव ठेविलें आहे माधव. किती सयुक्तिक नांव आहे हें ! यादव काळांत माधवाचार्य हा मोठा सर्वज्ञ, राजकारणी व धर्मकारणी पुरुष होऊन गेला. त्याचे बाबतींत 'सर्वज्ञः स हि माधवः' अशी म्हण प्रचलित झाली होती. गुरुजींनीं शेवटी निष्कर्ष काढला आहे तो असा. ते म्हणतात, " शेवटीं समाधान समाजाच्या सेवेत आहे. तुम्ही कितीहि ज्ञान मिळवा, अगर कांहींहि करा, तुम्हाला त्याने समाधान मिळणार नाही. समाधान दुसऱ्यासाठीं झिजण्यांत आहे. दुसऱ्याचें जीवन सुखी करण्यात आहे.... मनुष्यानें शक्तीबाहेरचे ध्येय ठेवूं नये. अमर्याद ध्येय हातीं कधी येत नाही. मग निराशा पदरी येते. आणि निराशा म्हणजेच सर्वनाश. " तेव्हा या सर्वज्ञ माधवाचें सुरस चित्र गुरुजींनीं बालकांपुढें ठेविलें आणि त्यांना वरील धडा समजावून सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे.

'फुलांचा प्रयोग' ही कथा 'ड्यूमा'च्या Black Tulips वर आधारलेली आहे. कितीहि अडचणी आल्या तरी मनुष्यानें स्वकर्तव्यापासून अणुमात्रहि च्युत होऊं नये हाच धडा गुरुजींनीं ह्या कथेत शिकविला आहे. 'मनुबाबा' ही गोष्ट 'जॉर्ज ईलियट'च्या 'सिलास मार्नर' वर आधारलेली आहे. हा प्राणी सुरुवातीला अत्यंत प्रेमळ आणि सचोटीचा परंतु परिस्थितीनें त्याला निष्ठुर व निरस बनविलें. प्रथम तो त्याचा मित्र विनू हेंच सर्वस्व मानतो. नतर पैसा हें त्याचें दैवत बनतें व अखेर 'सोनी' नांवाची एक अनाथ कन्या त्याचें जीवन-सर्वस्व बनतें. याचा अर्थ असा–मनुष्याला आत्मार्पण करावयाला दुसरें कांहीं तरी लागत असतें. तें दुसरें मात्र अवश्यमेव पाहिजे. नाहीं तर जीवन केवळ असह्य होते. गुरुजी ह्या कथेसंबंधीं म्हणतात, " मनुष्याचा विकास स्वतःपलीकडे जाण्यांत आहे. ज्या वेळेस जीवनाचा उपयोग एखाद्या ध्येयासाठी होऊं शकतो, तेव्हांच जीवनाचा विकास होऊं लागतो... ध्येयहीन जीवन कसें अर्थहीन, नीरस,

यंत्रमय कंटाळवाणें होतें. ध्येयार्थी जीवन कसें रसमय, प्रेममय, त्यागमय होतें." असा हा आदर्श 'मनुबाबा'च्या रूपानें मुलापुढें ठेविला गेला आहे.

हेंच तत्त्व 'बेबी सरोजा' व 'चारु नि चित्रा' या कथांनाहि लागू आहे. प्रत्येक कथेतून एक विशिष्ट ध्येय गुरुजींना मुलासमोर ठेवावयाचें आहे. 'बेबी सरोजा' या कथेंत हरिजनोद्धार व देशसेवा ह्या गोष्टी पुढें मांडल्या गेल्या आहेत, तर ' चारु नि चित्रा ' ह्यात हिंदुमुसलमानाचे ऐक्य किती अवश्य आहे हे दर्शविले आहे. 'यति कीं पति' या कथेंत Cloister and Hearth' या कादंबरीचा उपयोग केला आहे. याबाबत गुरुजी म्हणतातः– " ज्याच्या वृत्ति कोंवळ्या, प्रेमळ, भावनोत्कट आहेत, अशानी पति होऊनच, संसारात राहूनच यति होण्याची खटपट करावी. त्यानी संसारांत संन्यास आणावा." "करुणादेवी" ही कथा एका प्राचीनतम अशा चिनी नाटकावर आधारलेली आहे. गुरुजी म्हणतात, " हे नाटक पांच सहाशें वर्षांपूर्वीचें असावे. अतिउत्कृष्ट असे हे नाटक आहे. चिनी संस्कृति कौटुंबिक गुणावर फार भर देते. या नाटकात कर्तव्यपालन शिकविलें आहे." "मुलासाठीं फुले" "सोनसांखळी" इत्यादि अनेक छोटया गोष्टीहि आहेत. प्रत्येक गोष्ट सागताना मुलाना कांही तरी चागले, पौष्टिक सागितले गेलेच पाहिजे, हा गुरुजीचा कटाक्ष सर्वत्र दिसून येतो. 'सोराब रुस्तुम' ही कथा मुद्दाम सविस्तर रीतीने परीक्षिली आहे. इतर कथाहि श्रेष्ठ आहेतच, परंतु त्या सर्वांचे यथासाग परीक्षण करणे म्हणजे विस्ताराच्या भरीस पडणे होय.

आतापर्यंत गुरुजीनी लिहिलेल्या जवळ जवळ सर्व कथाच्या उल्लेख आलेला आहे. त्याचप्रमाणे प्रत्येक कथेचें वैशिष्टय काय आहे, ते पण पाहिलें आहे. ह्या सर्व कथावरून गुरुजींचे बालवाङ्मयात कोणते स्थान आहे हे पाहिले पाहिजे. बालवाङ्मयात त्यानी अद्भुतरम्यता ठिकठिकाणी आणिली आहे. त्याचप्रमाणे सुरस व चमत्कारिक अशाच कथा त्यानीं बालकासमोर ठेविल्या आहेत. करुण, वीर वगैरे बालकाना आवडणाऱ्या सर्व रसांचा यथायोग्य परिपोष केलेला सर्वत्र आढळतो. 'भव्य नि दिव्य' अशीं अनेक महान् ध्येये त्यानी बालकासमोर ठेविली आहेत. त्यांपैकीं कांही आदर्श कदाचित् बालमनाला आकलन करता येणार नाहीत. उदाहरणार्थ 'सर्वज्ञ माधव,' 'फुलांचा प्रयोग,' 'दुःखी' इत्यादि. परंतु हा

दोष आहे असें म्हणता येणार नाही. कदाचित् या आदर्शांची योग्य कल्पना मुलाना पुढें येईल, परंतु त्यांच्यापुढे उत्कृष्ट आदर्श ठेवून त्याचीं मने समृद्ध करणे हें लेखकाचे आद्य कर्तव्य होय. ह्या दृष्टीने 'बालवाङ्मय' लेखकात गुरुजींचे स्थान उच्च ठरते.

थोडा पाल्हाळ, तीच तीच वर्णने, स्वभाववर्णनाची तीच ती हातोटी, तींच ती प्रमेये वाचकासमोर पुनः पुन्हां माडणे इत्यादि दोष ह्या कथांतून डोकावतात. त्यामुळे या कथाचे वाचन काहींसे कंटाळवाणे होते. एकाद्या चागल्या गांवाचे वर्णन करीत असताना तेथें रोगराई नाहीं, भांडणे नाहीत, असंतोष नाहीं, वगैरे ठरीव मुद्दे ठरलेलेच. "कुठल्याही वाईट गांवाचें वर्णनहि ठराविकच. तेथें रोगराई आहे, भाडणें आहेत, असंतोष आहे. हरिजन, हिंदुमुसलमान ऐक्य, सूत कांतणें, काँग्रेसनिष्ठा इत्यादि ठराविक प्रमेयेहि या ना त्या रूपानें अनेक कथातून पुनः पुन्हां डोकावतात. पण गुरुजींना जरी तेच ते सागावयाचे असले, तरी अत्यत भावनोत्कट व कळकळीच्या भाषेत ते सांगतात. अर्थात् त्यामुळे त्यांचे वरील दोष बरेचसे झाकले जातात. गुरुजींची एक विशिष्ट अशी ठराविक भाषा-शैली आहे. ती त्याची त्यानाच साधते. पुष्कळानीं अलीकडे तिची नक्कल उठविण्याचा प्रयत्न चालविला आहे. परंतु तो इतराना कितपत साधेल हा एक प्रश्नच आहे. त्यांची वाक्ये त्रोटक, अर्थगर्भ आणि रसरशीत असतात. 'का' शब्द प्रश्नार्थी वाक्यात वापरून थेट भावनेला भिडणारी प्रश्न विचारण्याची पद्धत, ज्या ठिकाणी सडेतोड व्हावें लागते, त्या ठिकाणीं तसे होऊन वेळ पडल्यास अश्रूंचे संमार्जन करून पावित्र्य आणि गाभीर्य निर्माण करणे यांत त्याचा हात कोणीहि धरूं शकणार नाही.



## साने गुरुजींचें चरित्रवाङ्मय

मराठींतील चरित्र वाङ्मय हे इतर भाषांतील चरित्र वाङ्मयाशीं तुलना करताना काहीं बाबतीत कमी ठरते, असा थोरामोठ्याचा दावा आहे. मराठींतील चरित्रवाङ्मयाचा आढावा घेताना प्रो. बनहट्टी लिहितातः–"दोन प्रकारच्या दोषांनी आमचें चरित्रवाङ्मय खुरटविलें आहे. जिज्ञासा किंवा निरपेक्ष कुतूहलबुद्धि या अत्यंत उन्नतिकारक वृत्तीचा आम्हांमध्ये फारसा मागमूस नाही...आमच्या वाङ्मयातील सर्व चरित्रे आमच्या भावनात्मकतेमुळे निर्माण झालीं आहेत. देशभक्तीची भावना, पूर्वज गौरवाची व स्वजनगौरवाची भावना, नाहीं तर पारमार्थिक भाविकपणा अशा काही विशिष्ट भावना ज्यांच्या बुडाशी नाहीत अशीं चरित्रे आपल्यात फारच अल्प आहेत." प्रो. बनहट्टी यांच्या म्हणण्याप्रमाणें केवळ जिज्ञासाबुद्धीनें प्रेरित होऊन एकाद्या व्यक्तीचें चरित्र रंगविल्याची उदाहरणे क्वचित्च सापडतील हेंहि तितकेंच खरें. थोर व्यक्तीच्या थोर कार्याच्या गौरवार्थच चरित्रवाङ्मयाचा मराठीत विलास झालेला आपणास दिसून येतो. त्यांतून निघणारा बोधवाद हाच या प्रवृत्तींच्या मुळाशीं आहे. ह.भ.प. पांगारकरानीं लिहिलेलीं, 'मोरोपंत चरित्र व काव्यविवेचन,' 'तुकारामचरित्र,' 'एकनाथचरित्र,' 'ज्ञानेश्वरचरित्र,' 'मुक्तेश्वरचरित्र व काव्यविवेचन' इत्यादि चरित्रें अगर श्री.ज.र. अजगांवकर यांच्या 'महाराष्ट्र कविचरित्रां'चे प्रसिद्ध झालेले आठ

भाग इत्यादि चरित्रें म्हणजे पारमार्थिक भाविकपणाचीं दर्शनेंच होत. इ. स. १८९० पूर्वीचा काळ लक्षात घेतल्यास आपणांस भाषांतरित चरित्रें व धार्मिक भावनेनें प्रेरित झालेलीं चरित्रें यांचाच सर्वत्र सुकाळ झालेला दृष्टीस पडतो. व्यक्तीच्या दोषदिग्दर्शनाचें तर वावडेंच; परंतु गुणदिग्दर्शन मात्र इतकें झालेलें दिसतें कीं, त्यामुळे ज्या व्यक्तीचें चित्र डोळ्यासमोर उभे केलेलें असतें, तिला देवत्त्व प्राप्त व्हावे ! मनुष्यस्वभावाचें सखोल ज्ञान चरित्रवाङ्मयातून त्यापूर्वी फारच क्वचित् उपयोगास आणलेलें दिसून येतें. कोणत्याहि व्यक्तीचें चित्र रंगवावयाचें झाल्यास तिचे फक्त गुणमंडनच करण्यानें तिचे खरे स्वरूप लक्षात येत नाहीं. हे तत्त्व फार अलीकडच्या म्हणजे पाच पंचवीस वर्षांच्या काळांतच मराठी-चरित्रवाङ्मयांत पुढें आलेले आहे व त्या तत्वानुसार विविध चरित्र–वाङ्मय अजून निर्माण व्हावयाचे आहे. थोरांपासून बोध घ्यावयाचा याच पवित्र व उदात्त हेतूनें मराठींत बहुतेक सर्व चरित्र-वाङ्मय रेखाटले गेलें आहे असे विधान केल्यास तें अप्रस्तुत ठरेल असें वाटत नाहीं. तो बोध मग धार्मिक असो, सामाजिक असो वा राजकीय असो. मराठीतील चरित्र-वाङ्मयाचा बोधवाद हा मूळ आत्मा आहे. ह्या ध्रुवताऱ्याकडे लक्ष ठेऊन सारीं चरित्रें लिहिण्यांत आलीं आहेत. गुरुजींनी लिहिलेलीं चरित्रेंहि या बोधवादास अपवाद नाहीत.

मराठींत माझ्या मतें चांगलीं उतरलेली चरित्रें म्हणजे खालीं दिलेल्या, यादींत समाविष्ट झालेलीं त्या त्या लेखकांनीं लिहिलेली चरित्रें होत. ही यादी अपूर्ण असूं शकेल किंवा दोषमयहि असूं शकेल. परंतु, साधारणतः मराठी चरित्र-वाङ्मयाची प्रतिष्ठा वाढविण्याचें कार्य सदर चरित्रांनीं केलेलें आहे.

| | |
|---|---|
| १ मोरोपंत चरित्र | —कै. पांगारकर |
| २ टिळक चरित्र | —न. चिं. केळकर |
| ३ रानडे चरित्र | —न. र. फाटक |
| ४ सावरकर चरित्र | —शि. ल. करंदीकर |
| ५ आगरकर चरित्र | —आळतेकर |
| ६ ,, ,, | —खांडेकर |
| ७ अण्णासाहेब पटवर्धन | —अप्रबुद्ध |

| | |
|---|---|
| ८ डी. व्हॅलेरा | —प्रो. फडके. |
| ९ टिळक चरित्र | —आपटे गुरुजी |
| १० आनंदीबाई जोशी | —सौ. कानिटकर |
| ११ म. गाधी चरित्र | —सी. के. दामले |
| १२ मॅझिनी | —सावरकर |
| १३ नाना फडणवीस | —खरे शास्त्री |
| १४ नेपोलियन | —वि. ल. भावे |
| १५ पहिले बाजीराव | —प्रो. बेहेरे |
| १६ मुसोलिनी | —ताम्हनकर |
| १७ विष्णुशास्त्री चिपळूणकर | —ल. कृ. चिपळूणकर |
| १८ वि. गो. विजापूरकर | —कानडे |
| १९ ह. ना. आपटे | —कु. पानसे |
| २० सेनापति बापट | —सेवक सेवानंद |
| २१ भारतवर्षीय नररत्नमाला | —प्र. भावे मंडळी |
| २२ ,, ,, युवति ,, | —चितळे |
| २३ ऐतिहासिक स्त्रीरत्नें | —यशोदाबाई भट |
| २४ पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ | —प्रो. माटे |
| २५ गोपाळ कृष्ण गोखले | —पारसनीस |
| २६ आजकालच्या थोर विभूति | —कुळकर्णी |
| २७ आशियाचे धर्मदीप | —तळवलकर |
| २८ तात्या टोपे | —डॉ. सावरकर |
| २९ हिटलर | —आशावादी |
| ३० गोष्टीरूप गांधीजी | —साने गुरुजी |

वरील पंचवीस तीस अगर आणखी कांहीं विस्मरणानें राहून गेलेल्या चरित्रांनीं मराठींतील चरित्र-वाङ्मय पुष्ट केलें आहे. तें पाश्चात्य राष्ट्रांतून 'व्यक्तिदर्शन हेंच चरित्र-वाङ्मयांतील थोर तत्त्व होय' या तत्त्वापासून पुष्कळ दूर असूं शकेल; परंतु ज्या बोधवादास महाराष्ट्र चिकटून आहे, त्यांस अनुलक्षून मात्र पूर्णावस्थेस गेलेलें दिसते. अजून तें फोंफावतें आहे. निरनिराळ्या परदेशीय थोर पुरुषांचीं चरित्रें मराठींत यशस्वी रीतीनें आणण्याचा खटा-

टोपी चालू आहे. मराठी चरित्रलेखन वाढतें आहे, पुष्ट होतें आहे, याचें गमक म्हणजे मराठींतील चरित्रलेखनांत जी विविधता आणि नाविन्य येत आहे, ते होय. थोर व्यक्तीचे गुणदोष समजून घेऊन त्याचें यथातथ्य चित्र वाचकांपुढे उभें करावयाचें तंत्र अजून आपणाकडे पूर्णावस्थेस गेलेले नाही. तें होते आहे. सत्यचित्रण करीत असतांना एकच एक ठोकळेबाज पद्धतीनें करावयाचे या रूढ मार्गापासून मराठी चरित्रलेखन हळू हळू दूर जात आहे, ही अभिमानाची गोष्ट नव्हे काय? चरित्रविषय रंगविताना भाषा-विलासानें जो त्यात रंग भरतां येतो व जे नाविन्य त्यात ओततां येते, याची खरी कल्पना हळूं हळूं प्रसृत होत असून मराठींतील चरित्रलेखन हे हळूं हळूं निराळ्या चाकोरीवरून आपला मार्ग आक्रमूं लागले आहे. चरित्र-लेखनास लागणारा जिव्हाळा, ओलावा ओतण्याचें कार्य त्यात होत आहे. सान्यानी लिहिलेल्या चरित्रातून आपणांस हाच गुण प्रामुख्याने दिसून येतो.

व्यक्तीचा पूर्ण परिचय, त्याच्या कामगिरीचें प्रदीर्घ आलोडन व त्या व्यक्तीचें जिव्हाळ्यानें घेतलेलें दर्शन हे गुण प्रामुख्यानें सानेगुरुजींनीं लिहि-लेल्या चरित्रातून दिसून येतात. सान्याना मराठींतील चरित्र-वाङ्मयांत मानाचे स्थान आहे, हे त्यांच्या 'गोष्टीरूप गांधीजी' या एका नाविन्यपूर्ण चरित्राने सिद्ध केलें आहे. महात्मा गांधी ही व्यक्ति थोर खरी; परंतु तिचें इतक्या जवळून दर्शन घेणें अजून कोणालाच जमलें नव्हतें; देवळाच्या गाभाऱ्यात बसल्यावर देवाचं गांभीर्यच प्रामुख्याने प्रतीत होतें, तद्वत् पूर्वीची तऱ्हा होती. देवाशीं मैत्री करणें हेंच तर चरित्र-वाङ्मयाचें मुख्य ध्येय होय. म. गांधी हे थोर खरे, परंतु त्याचें खरें दर्शन घेणे म्हणजे त्यांच्या गुण-दोषांचें जास्त जवळून जिव्हाळ्यानें दर्शन घेणें होय. तें कार्य साने यांनीं मोठ्या तन्मयतेनें केलें आहे. इतकें संपूर्ण दर्शन स्वत: 'सत्याचे प्रयोग' च करूं शकले, इतर कोणीहि नाहीं. आणि म्हणूनच असें म्हणावेंसें वाटतें कीं, साने यांचें चरित्रलेखन अजून पूर्णावस्थेंस गेलेलें नाहीं. ते अजून उत्कृष्ट चरित्रलेखन करतील व मराठी चरित्रकारांत मानाचें स्थान मिळवितील.

सान्यांनीं लिहिलेल्या चरित्रांतील उत्कृष्ट चरित्रें म्हणजे गोखले, ईश्वरचंद्र विद्यासागर, गोष्टीरूप गांधीजी व विनोबाजी भावे हीं होत. जिव्हाळा, माहिती, उद्‌बोधाची दृष्टि, समरसता व भाषाविलासाचा ओघ या सर्व

दृष्टींनीं हीं चरित्रे उत्कृष्ट वठली आहेत. सान्यानीं एकूण बारा चरित्रें लिहिली आहेत. त्यापैकीं जी माहिती उपलब्ध आहे, त्यावरून त्यांनीं लिहिलेलीं दोन चरित्रें प्रकाश पावूं शकलीं नाहींत व बाकीचीं मात्र उपलब्ध असून मराठी साहित्यात योग्य स्थान पावलीं आहेत. कित्येकाच्या अधिक आवृत्त्याहि निघाल्या आहेत व कित्येक पुस्तके आज उपलब्ध नसल्यामुळे त्यांच्या पुनर्मुद्रणाची पुन्हा व्यवस्था होणे आवश्यक होऊन बसलें आहे. याखेरीज त्याच्या 'कॉंग्रेस' या सुप्रसिद्ध माजी साप्ताहिकातून व क्वचित् इतर वर्तमानपत्रातून त्यांनी प्रासंगिक असे चरित्रलेखन केलेलें आहे. श्यामचे तीन खंड व श्यामची आई या त्याच्या पुस्तकातूनहि पुष्कळसे आत्म-चरित्राचे धागे ओवले गेले आहेत, हें येथें नमूद करण्यास हरकत नाहीं.

१९२४–२५ च्या सुमारास सान्यांनीं चरित्र–लेखनास पहिल्याने हात घातला ! चरित्र–लेखक म्हणून सान्यानीं प्रारंभ करावयास आज एक पिढी लोटली आहे. त्या काळात मराठी भाषेंत लेखन करणारे व्यासंगी व जबरे लेखक पुष्कळच होते. चरित्रवाङ्मयांत झपाट्याने भर पडत होती. राष्ट्रीय वृत्तींना पोषक असलेल्या थोर थोर पुरुषांच्या कार्याचा व्याप मराठी वाचकां-पुढें साकल्यानें दिग्दर्शन करण्याचे कार्य थोर थोर लेखक करीत होते. याच सुमारास रियासतकार गोविंद सखाराम सरदेसाई याची 'नानासाहेब पेशवे याचें चरित्र' ( १९२६ ), व 'पहिले बाजीराव' ( १९३० ), हीं चरित्रें, त्याचप्रमाणे नारायण दामोदर सावरकर याचें 'तात्या टोपे'(१९३२)' दु. आ. तिवारी यांचें 'रजपूत वीरांगना' ( १९३२ ) श्री. लक्ष्मण नारायण जोशी यांचें 'महाराणा प्रतापसिंह' ( १९२२ ), श्री. केशव नागेश बापट यांचें '' चक्रवर्ती नेपोलियन '' ( १९२४ ), प्रो. ना. सी. फडके यांचें 'डी व्हॅलेरा' ( १९२३ ), केळकरांचें 'टिळकचरित्र' ( १९२३ ), प्रो. न. र. फाटक यांचें 'न्या. मू. रानडे यांचें चरित्र' ( १९२४ ), श्री. श्रीनिवास नारायण कर्नाटकी यांचीं डॉ. भांडारकर ( १९२७ ), न्या. तेलंग (१९२९), व डॉ. भाऊ दाजी लाड ( १९३० ) हीं चरित्रें, अप्रबुद्धांचें 'अण्णासाहेब पटवर्धनाचें चरित्र' ( १९२६ ), श्री. रा. गो. कानडे यांचें 'रवींद्रनाथ टागोर, चरित्र आणि वाङ्मय' हें चरित्र, इत्यादि थोर थोर व्यक्तींचीं चरित्रें प्रका-शांत येत होतीं व आलीं होतीं. राष्ट्रीय वृत्तींना पोषक, सामाजिक सुधारणांना

प्रेरक व धार्मिक भावनांच्या उदात्तीकरणाला अनुरूप अशा प्रवृत्तींची शिकवण महाराष्ट्राला हळूं हळूं देण्यात येत होती. सान्यांनींहि हें कार्य करावयाचें ठरविलें. सान्यांनी पहिले 'लोकहितवादी यांचें चरित्र' लिहिलें. तें चरित्र कांहीं कारणानें प्रसिद्ध होऊं शकलें नाहीं. प्रो. ग. ह. केळकर याचा 'लोकहितवादी' वरील निबंध नुकताच (१९२३) प्रसिद्ध झालेला होता. साने त्या वेळी कॉलेजमधील शिक्षणक्रम पुरा करीत होते. लोकहितवादीसारख्या सुधारकाच्या व स्पष्टवक्ता असलेल्या व्यक्तीचा त्याच्या पत्रांच्या वाचनानें साने यांच्या भावनाशील मनावर परिणाम होणे अगदीं साहजिक होतें. परंतु ते चरित्र आज दुर्लभ असल्याकारणानें त्याबाबत कांहींच लिहितां–बोलता येत नाहीं.

१९२५ साली त्यानीं गोपाळ कृष्ण गोखले याचें चरित्र लिहिलें व तें प्रसिद्ध झाले. साने याचे हे पहिलेंच पुस्तक. प्रो. कर्वे यानीं असा हवाला दिला आहे की, हे पुस्तक विद्वानाच्या स्तुतीस पात्र आहे. आणि ही गोष्ट खरी आहे. या चरित्राची मांडणी, भाषाशैली, त्यांनी चरित्रास उपयुक्त अशी जमविलेली माहिती व साहित्यसामुग्री व एकंदरीने कोठेच न्यून राहूं नये म्हणून त्यांनी घेतलेली काळजी इत्यादि गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे, कोणालाहि कबूल करावें लागेल की, मान्यवर साहित्यिकाच्या त्या मेळाव्यात सान्यांसारख्या एका नूतन पदवीधराने त्या काळांत केलेले हे साहस निःसंशय फार मोठे होते. गोपाळ कृष्ण गोखले याच्या चरित्रानें साने हे चरित्रकार म्हणून प्रख्यात झाले. याच सुमारास त्यानी 'देशबंधु दास' याचें विस्तृत चरित्र लिहिले व नवलाची गोष्ट ही कीं, तें मूळ पुस्तक अजून सान्यांच्या जवळ हस्तलिखित स्वरूपांतच पडून राहिलें आहे ! 'ईश्वरचंद्र विद्यासागर' हें चरित्रहि त्यानीं याच सुमारास लिहिलें आहे. ईश्वरचंद्र विद्यासागर हा एक फार मोठा बहुविध चळवळींचा नेता १९ व्या शतकांत होऊन गेला. विद्वत्ता आणि समाजसेवा या त्यांच्या थोर गुणांवर लुब्ध होऊन साने यानीं आपल्या एका बगाली मित्राच्या सहाय्यानें हें बहुमोल व विचारप्रवर्तक चरित्र लिहिलें आहे.

१९२६ सालीं राजवाडे दिवंगत झाल्यावर सर्वसंग्राहक स्वरूपाचा इस्लामपूरचे 'ब्राह्मण पत्रिके' चे संपादक रा. मुंडले यांनीं एक निबंध प्रसिद्ध केला

होता. त्याच्यांतून माहिती गोळा करून स्वतःच्या दृष्टिकोनाने त्रोटक परंतु पद्धतशीर मांडणी केलेलें असें साने यानी १९२८ सालीं 'राजवाडे यांचें चरित्र' लिहिलें. इंग्रजींत चरित्रलेखनात संक्षिप्त स्वरूपाच्या चरित्रलेखनाची एक पद्धत आहे. त्या मांडणीला अनुसरून त्यांनीं हें चरित्र लिहिले आहे. गोखले किंवा ईश्वरचंद्र विद्यासागर याच्या चरित्रलेखनानंतर हे चरित्र प्रसिद्ध झालें. मध्यंतरींचा काळ अर्थात् पुढील साहित्याच्या तयारीप्रीत्यर्थ गेला असावा. या पुस्तकांतून त्यानी एक मित्रकार्य केलेंच; परंतु त्याची विचक्षण दृष्टि आणि लेखनचातुर्य पुन्हा एकदा प्रत्ययास आले. १९२९ साली त्यांना बालगोपालाकरिता म्हणून काही त्रोटक चरित्रे प्रसिद्ध केली. त्यापैकीं 'बेंजामिन फ्रँकलिन' हे चरित्र एका इंग्रजी चरित्राच्या आधाराने परंतु मुलाना गोडवा वाटेल अशा तऱ्हेनें, रसपूर्ण पद्धतीने लिहिले आहे. राष्ट्राची भावी पिढी निर्माण करण्याकरिता ज्या ज्या सद्गुणाची व वीर वृत्तीची जोपासना करणें आवश्यक आहे, त्या त्या गुणाची जेथें जेथें साक्ष पटेल, तेथून ते वेंचून काढून बालगोपालांपुढें माडण्याचें कार्यच साने यानीं आपल्यापुढे ठेवल्याचें दिसतें. त्यानीं एका अर्थी आदर्श शिक्षकाचा पेशा यापुढे स्वीकारला व तें कार्य त्यांनीं मोठया तन्मयतेनें व हिरीरीने हातीं घेतलें.

याच सुमारास त्यानीं 'विद्यार्थी' या पत्रांतून लिहिलेले लहान लहान चरित्रलेख पडताळून पहाण्यासारखे आहेत. थोर पुरुषांचें गुणगान करीत आणि त्याच्यापासून मिळणाऱ्या स्फूर्तीचे लोण लहान मुलाच्या मनावर बिंबवीत असतांना साने यानीं फार थोर राष्ट्रकार्य केलेले आहे. त्यांतहि माहिती नवनवीन, भाषाशैली नवीन आणि उद्बोधन ठासून भरलेले लक्षात येतें.

बेंजामिन फ्रँकलिन चरित्राप्रमाणें रवींद्रनाथ टागोर अणि शिशिरकुमार घोष यांचींहि छोटी चरित्रे त्यानी याच काळांत लिहिलीं आहेत. मात्र परीक्षण करण्यास तीं आज उपलब्ध नाहींत. यापुढें साने यांच्या आयुष्याला निराळें वळण लागलें. आपली विद्यार्थी दशा व शिक्षकाचा पेशा सपवून १९३० नंतर साने निराळया मार्गावर पावलें टाकूं लागले. ते या वेळीं स्वत: आचारक झाले. विचार आणि उच्चार यांची जपणूक पूर्वीच झाली होती; त्याची संगति लावण्याचें कार्य प्रत्यक्ष करण्यास ते सिद्ध झाले व त्यानंतरचें त्यांचें कार्य निरलसपणें व सततोद्योगपूर्वक आजपर्यंत चालू आहे.

१९३७ मध्यें आणखी एक नवीन चरित्रात्मक पुस्तक लिहून सान्यानीं चरित्रवाङ्मयांत एक नवीन शैली रूढ केली. 'जीवन प्रकाश' म्हणून तें पुस्तक होय. शब्दचित्र किंवा व्यक्तिरेखा लेखनपद्धति असलेलीं अशी तीन चरित्रें या पुस्तकांत सामाविलीं आहेत. 'जीवन प्रकाश' या शब्दसमुच्चयानें त्यांच्या लेखनाचा आत्मा ओळखण्यास आपणास मदत होते. मानवी-जीवन प्रकाशमय, चैतन्यमय आणि सर्वगुणसंपन्न अतएव तेजस्वी करण्या-करितां जन्मभर सान्यानी लेखनाची आटाआटी चालविली आहे. 'जीवन' हा शब्द अनेक बाजूंनीं आणि अनेक रीतीने मांडता येणे शक्य आहे हें जाणत्याना सागावयास नकोच. टिळक, गाधी, दासादि थोर व्यक्तींची चित्रें श्रद्धापूर्वक, सेवाबुद्धीनें आणि मोठ्या जिव्हाळ्यानें या पुस्तकांत रंगविलेलीं दिसतात. त्याच्या या लेखनपद्धतीनें तर या थोर पुरुषाबद्दलचा आदर आणखी दुणावतो.

शेवटच्या म्हणजे चालू टप्प्यांत तर आचाराबरोबर साने यांच्यात विचार-क्रांतीहि झालेली दिसते. १९४४ मध्यें ' सेवादलचरित्र ' मालेतर्फे 'दास-चरित्र' 'विनोबाजी भावे चरित्र' व 'गोष्टीरूप गांधीजी' ही तीन चरित्रें प्रसिद्ध झालीं. या चरित्रात नेहमीपेक्षां निराळी व नावीन्यपूर्ण अशी प्रवचन-पद्धति अवलंबिली आहे ! दासचरित्र एका गुजराती चरित्राच्या स्मरणानें लिहिलें आहे व विनोबाजींचे चरित्र प्रत्यक्ष अवलोकनानें, अभ्यासानें व प्रत्यक्ष माहिती ऐकून लिहिलें आहे. गाधीच्या चरित्रात तर गुरुजींच्या सर्व लेखनकसबाचा प्रकर्ष झालेला दिसतो ! आजवर गाधी-चरित्रसपदा इतकी विपुल झालेली आहे, की सर्वोचा गोषवारा आणि तोहि नेटकेपणाने एकत्रित आणणें ही कांहीं सोपी गोष्ट नव्हे. ती अतिशय सिद्ध हस्तानें आणि लीलया गुरुजींनीं यशस्वी करून दाखविली आहे. मराठी चरित्रांत इतके सुंदर बोल-पट लेखनाचें तंत्र अवलंबून लिहिलेलें हे पहिलेच गोड व चरित्रलेखकाची ऐपत दाखविणारें पुस्तक आहे.

सारांश, सान्यांना चरित्रलेखक म्हणून स्वतंत्र असे स्थान आहे व यापुढें ते आपलें स्थान जास्त जास्त उंच करणार. आबालवृद्धाना उपयुक्त अशा जातिवंत चरित्रलेखनाचें मोठें कार्य त्यांनीं केलेले आहे. कोणत्याहि चरित्र-लेखनाकरिता सत्य प्रतिपादन, मोहक भाषा, तत्त्वपूर्ण प्रतिपादन, सुरेख मांडणी,

व्यवस्थित माहिती व बोध ह्या षडालंकारांची जरूरी असते. या अलंकारांना जिव्हाळ्याच्या सूत्रांतून ओंवून काढले कीं, कोणतेंहि चरित्र आदर्श झाल्यावांचून राहत नाहीं. साने यांच्या अल्प परंतु गुणसंपन्न चरित्रग्रंथातून हे गुण उतरल्याचें सिद्ध होतें. कळकळ व जिव्हाळा हा त्यांचा सर्व लेखनाचा आत्माच आहे.

त्याच्या कांहीं चरित्रग्रंथावर आक्षेपहि आहेत. उदाहरणार्थ 'ईश्वरचंद्र विद्यासागर' ह्या चरित्रावर अशुद्ध भाषेबाबत आरोप करण्यात आलेला आहे. परंतु तो तितकासा खरा नाहीं. विनोबाजी भावे यांचें चरित्र माझ्या मतें पुष्कळमें सत्यास सोडून लिहिले गेले आहे. परंतु या पुस्तकाच्या नवीन आवृत्तीच्या वेळीं हे दोष गुरुजींनी काढून टाकावयास पाहिजेत म्हणजे त्यांचें चरित्रवाङ्मय अधिक सत्यान्वेषी होईल. महाराष्ट्रीयाचे परीक्षण सकस, निर्भीड व सत्यान्वेषणी असावयास पाहिजे असा मराठी साहित्याचा लौकिक आहे. तेव्हा गुणाबरोबर थोडें दोषदिग्दर्शनहि हवेंच.

असो; साराश चरित्रलेखन करून गुरुजींनी मराठी शारदेची विविध आणि मान्यवर सेवा केली आहे ती तशीच अखंड चालू राहो व एक दिवस शुद्ध व निर्मळ चरित्रलेखनाचा आदर्श गुरुजींच्या हातून बाहेर पडो ही प्रामाणिक इच्छा आहे.



## निबंधात्मक वाङ्मय

सानेगुरुजींचें निबंधाच्या स्वरूपांतच प्रसिद्ध झालेलें वाङ्मय अफाट आहे. सुमारें १५०० पानांचा मजकूर गेल्या १०।१२ वर्षांच्या अवधींत प्रसिद्ध झालेला आहे. या मजकुरापैकीं निम्मा भाग गुरुजींच्या स्वतंत्र विचाराचा व निम्मा अनुवादित आहे. या सर्व अफाट वाङ्मयविस्तारांत भारतांतील व परदेशांतील कोणच्या नररत्नांचें तेज चमकत आहे, कोणच्या महाग्रंथांतील निवडक रत्नें येथे पुन: प्रकाशमान होत आहेत, याचा विचार केल्यास गुरुजींच्या विशाल वाचनाची व सर्वसंग्राहकतेची खात्री पटते. गुरुजीसारख्या प्रसिद्धिपराङ्मुख लेखकाने हा जिवाचा आटापिटा कां केला, जेथून मिळतील तेथून हे 'ज्ञानाचे कण' महाराष्ट्रवाचकांपुढें कां ठेवले, याचा विचार करतांना १९२० ते ३५ हा काळ आपल्या डोळ्यांसमोर येतो व त्या काळातील रोमहर्षणपर प्रसंग एकामागून एक आपल्या नजरेसमोरून धांवत जातात.

१९२० ते ३५ या १५ वर्षांतील कालखंडानें काय काय पाहिलें नाहीं ? स्वातंत्र्याची अनिवार्य पिपासा लागलेल्या हिंदी जनतेचीं दोन आंदोलनें या काळाने पाहिलीं. या काळांतच महात्माजींच्या सत्याच्या खडतर प्रयोगांनीं जनतेचे डोळे दिपवून टाकले. त्यांच्या निस्सीम देशप्रेमाची, त्यागाची, स्वावलंबनी जीवनाची शिकवण राष्ट्रापुढें या काळांतच त्यांना 'प्रतिगामी'

म्हणून हिणविण्यांत येत असताना सुद्धा–त्याच्या शुद्ध चारित्र्यानें जणूं उभी होती. स्वातंत्र्याच्या चळवळीचा एक अपरिहार्य परिपाक म्हणजे दलित-वर्गाची जागृति. तेव्हा, या दहाबारा वर्षांत हरिजन, मजूर व अखिल भारतातील स्त्रीसमाज आपापल्या हक्कांच्या मागण्या करू लागले यांत नवल नाहीं. या सर्व विविध आंदोलनामुळे भारताचें सास्कृतिक जीवन जणूं काहीं तळापासून घुसळलें गेले. जुन्या तत्त्वाची उजळणी व फेरतपासणी होऊं लागली, नवीं मूल्ये भारतीय जीवनाच्या अग्रभागीं चमकूं लागलीं. नवे विचार, नव्या आशा, नव्या आकाक्षा व भारतीय जीवनाला आधारभूत झालेलीं सनातन मूल्ये याच्यांत प्रचंड संघर्ष सुरू झाला. “ सर्वेषामविरोधेन ब्रह्मकर्म समारभे ” असे उद्‌घोषिणारी समन्वयात्मक ‘भारतीय संस्कृति’ खरी, कीं ‘वर्गविग्रह हाच भौतिक जडवादाचा आत्मा आहे’ असे सागणारी, साम्यवादी संस्कृति खरी, ‘ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या ’ हे अध्यात्मिक तत्त्वज्ञान श्रेष्ठ, कीं भौतिक सुधारणेच्या मागे प्रचंड वेगानें धावणाऱ्या पाश्चात्य राष्ट्रांचे तत्त्वज्ञान श्रेष्ठ असे गहन प्रश्न प्रत्येक भारतीयाच्या अंतःकरणात विचाराचें एकच काहूर माजवू लागले. अशा या सामाजिक, राजकीय, आर्थिक खळबळीच्या आघाताचे परिणाम गुरुजींच्या मनावर, विचार-प्रणालीवर आणि तत्त्वज्ञानावर कोणते झाले हे पाहावयाचे झाल्यास गुरुजींचे वैशिष्टयपूर्ण व्यक्तित्व आपणांस सूत्ररूपानें लक्षात ठेविलें पाहिजे. या व्यक्तित्वाच्या पार्श्वभूमीवरच त्यानी भारतीय समाजाला या खळबळींच्या काळात दिलेला संदेश अधिक उठून दिसतो.

गुरुजींना ज्यांनी जवळून पाहिले आहे, त्याचीं भावनोद्दीपक व्याख्याने ज्यांनीं ऐकलीं आहेत, त्याना त्याचे हृदय भारताच्या सर्वांगीण पारतंत्र्यामुळे कसे हळहळत असते, याचा प्रत्यय अचूक आलेला आहे. गेल्या पाच सहा वर्षांत त्यांच्या विचाराचा कल समाजसत्तावादाकडे झुकत आहे. अर्थात्, अशा विचारांची ही व्यक्ति पूर्वखान्देशच्या वतीनें सुरू झालेल्या सर्वराष्ट्रीय व दलित वर्गाच्या उद्धाराच्या चळवळींच्या अग्रभागी असावी, हें साहजिकच आहे. या चळवळींत त्यानीं सोसलेल्या हालअपेष्टा, त्यांनीं केलेला त्याग–हा सर्व त्यांच्या वाङ्मयांत उतरलेल्या विचारांचा मूर्तिमंत आचार होय. “ आधीं केलें मग सांगितलें ” ही उक्ति तर त्यांनीं अक्षरशः पाळलीच,

पण जें काहीं ‘ सांगितलें ’ त्याच्या आधीं, बरोबर व नंतर त्यांची दिव्य कृति महाराष्ट्राच्या आदरास पात्र होत होती. शिवाय, जें जें कांहीं त्यांनीं सागितलें तें सुद्धा, “ उत्कट भव्य तें घ्यावे। मिळमिळीत अवघेंचि टाकावें ” या समर्थोक्तीप्रमाणे तंतोतंत आहे हें त्याच्या निबंधांच्या पुढील चर्चेवरून दिसून येईल.

साने गुरुजीचे निबंधात्मक ग्रंथ पाच विभागात विभागता येतील. ते असेः—

( १ ) सास्कृतिक, ( २ ) धार्मिक, ( ३ ) प्रचारात्मक, ( ४ ) कलात्मक, व ( ५ ) चरित्रात्मक.

या विभागात त्यांच्या दहा निबंधात्मक ग्रंथाची खालीलप्रमाणें वाटणी करतां येईल.

- ( १ ) सास्कृतिकः—( १ ) भारतीय संस्कृति.
  ( २ ) संस्कृतीचे भवितव्य. ❀
- ( २ ) तत्त्वज्ञानपर अगर धार्मिकः—( १ ) गीताहृदय.
  ( २ ) राष्ट्रीय हिंदु धर्म. ❀
  ( ३ ) समाजधर्म. ❀
- ( ३ ) प्रचारात्मकः—( १ ) स्वदेशी समाज. ❀
  ( २ ) खेड्यात जाऊन काय करणार ? ❀
  ( ३ ) गोड निबंध भाग १ ते ३.
- ( ४ ) कलात्मकः—( १ ) कला म्हणजे काय ? ❀
- ( ५ ) चरित्रात्मकः–( १ ) श्रीशिवराय.

भारतीय संस्कृतिः—हा ग्रंथ एका विशिष्ट दृष्टीनें लिहिला आहे असें गुरुजींनीं स्वतःच प्रस्तावनेत सागितले आहे. ते म्हणतातः “ भारतीय संस्कृतीच्या आत्म्याशीं येथें भेट आहे. तिच्या अंतरंगाचे येथे दर्शन आहे.” हें दर्शनसुद्धा ‘ अर्धस्फुट ’ आहे असे त्यानीं मोठ्या विनम्रपणें म्हटलें आहे. परंतु गुरुजींच्या प्रसादपूर्ण लेखणींतून जें दर्शन आपणास मिळते, त्यावरूनच त्यांना अशी विनंति करावीशी वाटतें कीं, “ गुरुजी, आपल्या ‘ अर्धस्फुट ’

---

❀ हे ग्रंथ अनुवादित आहेत.

दर्शनानें आमची तृप्ति होत नाहीं; तरी कृपा करून आपण भारतीय संस्कृतीचे पूर्ण दर्शन महाराष्ट्र वाचकाना घडवा." तथापि या अर्धस्फुट दर्शनातच आपणास भारतीय संस्कृतींतील कोणत्या विविध अंगोपागाचा परिचय होत आहे, हे आपण आता पाहूं.

या ग्रथातील २३ प्रकरणापैकी ११ प्रकरणांत या संस्कृतीच्या मूलभूत तत्त्वज्ञानाची चर्चा आहे. प्रथमतःच अद्वैत तत्त्वज्ञानाचा त्यानी ऊहापोह केला आहे. परंतु या प्रकरणात ज्ञानेश्वर, रामदास इत्यादि तत्त्ववेत्त्या संत-कवींप्रमाणे जीवशिवाच्या ऐक्याची तात्त्विक चर्चा वाचावयास मिळेल, अशी कल्पना करणाऱ्याची मात्र पूर्ण निराशा होईल. अद्वैत याचा सरळ व्यावहारिक अर्थ त्यानी 'माझ्यासारखाच दुसरा आहे ही भावना' असा केला आहे. पुढे, अशा तऱ्हेचे अद्वैत ज्यानी जाणले व आचरणात आणले, अशा भारतीय संस्कृतीच्या उपासकाची महति त्यानी वर्णन केली आहे. अशा उपासकात जनमेजयाला अद्वैताचा धडा शिकविणाऱ्या आस्तिका-पासून राष्ट्रासाठी 'पावनभिक्षा' मागणाऱ्या रामदासाचा त्यानी समावेश केला आहे. अद्वैतासंबंधींच्या याच प्रकरणात जागोजागी भारताच्या सद्यः-स्थितीबद्दलचे उल्लेख आले आहेत. विशेषतः सध्या जे द्वैत माजले आहे, त्याबद्दल " अद्वैताचा आज संपूर्ण अस्त झाला आहे " अशा विषादपूर्ण उल्लेखानीं त्यानी आपली हळहळ व्यक्त केली आहे.

अशा तऱ्हेने अद्वैत तत्त्वज्ञानाची ओळख करून दिल्यावर याच पायावर रचलेल्या कर्म, भक्ति, ज्ञान, कर्मफल-त्याग, चार पुरुषार्थ इत्यादि तात्त्विक मजल्याचे सुंदर दर्शन आपणास होत आहे. पण हे मजले चढताना आपल्या बुद्धीला यत्किंचितहि श्रम पडूं नयेत अशी दक्षता त्यांनी घेतली आहे. या विषयाची माडणी अत्यंत सुबोध आहे. या चारी विषयाच्या चर्चेला श्रीमत् भगवद्गीता हा ग्रंथ आधारभूत आहे हे कोणीहि सहज ओळखील. येथे माड-लेल्या विचारसरणींचा थोडाबहुत पुनरुच्चार त्यानी ' गीताहृदय ' या त्यांच्या ग्रंथात केला आहे. 'कर्म' या प्रकरणात कर्माची व्याख्या समाज-सेवा अशी केलेली दिसते. या व्याख्येच्या आधारावर त्याना अत्यंत प्रिय असलेल्या उपसिद्धाताची त्यांनीं माडणी केलेली आहे. ते सिद्धान्त म्हणजे:—

( १ ) सर्व कर्में समान दर्जाची आहेत.

( २ ) श्रीकृष्णानें व संतानीं ही कर्माची समानता शिकविली आहे.

( ३ ) कर्माच्या सजीव व निर्जीव साधनांपैकीं आपण फक्त सजीव साधनांची काळजी घेतो.

अशा समाजसेवेच्या साधनांचा ध्यास घेणें, यालाच ते भक्ति मानतात व अशा भक्तीला आध्यात्मिक ज्ञान व विज्ञान ह्या दोघाचीही कशी जरुरी आहे हे त्यानी ज्ञान या प्रकरणात विशद केलें आहे. अशा तऱ्हेची विज्ञानयुक्त समाजसेवा करण्यास आहार-विहारांचा संयम व मतभेद नष्ट करणारा संयम जरूर आहे, असे प्रतिपादन करून कर्मफलत्यागाच्या विचाराची अत्यंत सुबोध माडणी सूर्य, नदी इत्यादि रोजच्या अनुभवातील दाखल्याच्या आधाराने त्यानी मार्मिकतेने केली आहे. अशा रीतीने मूलभूत तत्त्वज्ञान सागितल्यावर इतर कांहीं तात्त्विक विचाराची त्यानीं चर्चा केली आहे. या चर्चेत चारी पुरुषार्थ कसे साधावेत याचे विवेचन, ज्याला त्यानीं भारतीय संस्कृतीचे जीवनभूत तत्त्वज्ञान म्हटलें आहे, ते अहिंसेचें तत्त्वज्ञान भारतात कसे उत्क्रात झाले, या विषयीची चर्चा व एका देवाच्या मूर्तीपासून अनंत विश्वातील अनंत मूर्तींकडे नेणारी चर्चा इत्यादींबद्दल त्यानीं केलेला ऊहापोह विशेष उल्लेखनीय आहे.

भारतीय संस्कृतीच्या तत्त्वज्ञानपर अंगाचे गुरुजींनीं आपणास कसें दर्शन घडविले आहे, हे पाहिल्यावर भारतीय समाजपद्धतीच्या त्यांनीं केलेल्या ऊहापोहाची थोडीशी चव घेऊं. भारतीय समाजपद्धतीचें मुख्य लक्षण वर्णाश्रमधर्म, असें मानण्यांत येते. या वर्णाश्रमपद्धतीचें गुरुजीचें विवेचन क्रातिकारक व अभिनव असे आहे. वर्ण याचा अर्थ रंग असा घेऊन प्रत्येकानें आपल्या उपजत स्वभावाप्रमाणें कर्म करावें, असा निष्कर्ष त्यांनीं काढला आहे. परंतु हा उपजत स्वभावधर्म ओळखून विकसित केला गेला पाहिजे व याकरतां साम्यवादी समाजरचनेवर आधारलेलें स्वराज्य पाहिजे असा एक उपसिद्धान्त त्यानी मांडला आहे. यानंतर आश्रमांतील ब्रह्मचर्याश्रमांत सर्व नवीन विषयांचे ज्ञान मिळविणे, गृहस्थाश्रमांत गृहस्थानें आपल्या कुटुंबांतील सर्व व्यक्तींना त्यागाची शिकवण देणें, वानप्रस्थाश्रमांत शिक्षणाचा प्रसार करणें, संन्यासाश्रमांत अखिल मानवजातीची सेवा करणें अशा तऱ्हेचीं चारी आश्रमाचीं त्यांनीं अभिनव लक्षणें सांगितलीं आहेत.

वरील विवेचनाशिवाय भारतीय संस्कृतींत समाविष्ट होणाऱ्या अनेक सुंदर व मौलिक विचारांचा ऊहापोह त्यानी आणखी काहीं प्रकरणातून केलेला आहे. हे विचार म्हणजे भारतीय संस्कृतींतील विचाररत्नभाडारातून निवडलेली रत्ने होत. अशी किती तरी सद्विचारांची यादी येथे देता येईल. त्यांतल्या त्यांत भारतीय संस्कृतीशीं निगडित असे अनेक सद्विचार आहेत, यात मुळींच शंका नाहीं. मात्र त्या विचारांवर भारतीय संस्कृतीलाच आपला अविभक्त हक्क कितपत सागता येईल हा विषय वादग्रस्त होण्यासारखा आहे.

( १ ) श्रीकृष्ण व त्याची मुरली यावर आजपर्यंत विविध काव्ये झालीं आहेत. परतु याच विषयावर सान्यानी रचलेले रूपक अत्यत हृदयंगम असे आहे. श्रीकृष्ण व त्याची मुरली यांच्याशी संबंध येणाऱ्या गोष्टीला कशाचे तरी त्यानी रूपक दिले आहे. उदाहरणार्थ, गोकुळ म्हणजे इंद्रियाचा समुदाय, कृष्ण म्हणजे व्यवस्था लावणारा, गोपी म्हणजे मनःप्रवृत्ति, गोपीचें वस्त्रहरण म्हणजे मनःप्रवृत्तीचे खरे ओगळ स्वरूप प्रकट करणे. हे सबंध रूपकच वाचनीय असे आहे. किंबहुना या प्रकरणात 'श्रीकृष्ण' या एकाच देवतेवर अनेक रूपके रचून सानेगुरुजींनी आपल्या प्रतिभेचा व निरतिशय कृष्णप्रेमाचा प्रत्यय वाचकांना आणून दिला आहे. खरे पाहू गेले असता, भारतीय संस्कृतीचे सर्वच उपासक कृष्णभक्त किंवा रामभक्त असतात व होते. परंतु अशा उपासकांतील सानेगुरुजींच्या ठिकाणी दिसणारे उपास्य देवतेबद्दलचें प्रेम व काव्यशक्ति याचा समन्वय असामान्य होय.

( २ ) दुसरा विचार मृत्यूबद्दलचा होय. साने म्हणतात, " भारतीय संस्कृतींत मृत्यूविषयींचे ठिकठिकाणी जे विचार आहेत, ते किती गोड आहेत व किती भव्य आहेत." या विचाराची गोडी व भव्यता दाखविण्याकरता भारतीय वाङ्मयात मृत्यूचे जे अनेक अर्थ लावलेले आढळतात, त्यातील काहीं नमुने त्यानीं दिले आहेत. मृत्यु या शब्दाचे अर्थ खालीलप्रमाणे होत. मृत्यु म्हणजे:—

( १ ) ईश्वराचेंच एक स्वरूप. ( २ ) वस्त्र फेंकणें. ( ३ ) महायात्रा ( ४ ) आईच्या कुशींत जाऊन झोपणे. ( ५ ) माहेरीं जाऊन येणें. ( ६ ) अनंतांत स्नान. ( ७ ) विस्मरण. ( ८ ) अमर प्रकाश.

मृत्यूविषयीं सानेगुरुजीनी केलेली चर्चा अत्यंत रम्य असली, तरी ती पूर्ण आहे असे म्हणवत नाहीं. मृत्यूची भयानकता व त्याचा निःपक्षपातीपणा या दोन्हीं लक्षणासबंधी भारतीय वाङ्मयात आणखी पुष्कळच विवेचन आढळूं शकेल. रामदासस्वामींनीं आपल्या श्रीमत् दासबोधाच्या दशक ३, समास ९ मध्ये या दोन्हीहि लक्षणाचे विवेचन विस्तृत रीतीने केले आहे. रामदासस्वामी व साने याचे निष्कर्ष निरनिराळ्या शब्दात मांडलेले असले, तरी मूलतः सारखेच वाटतात. रामदासस्वामी मृत्यूच्या भक्ष्यस्थानी कोण-कोण पडतात याची विस्तृत यादी देऊन म्हणतातः—

ऐसे जाणोनिया जीवे । याचे सार्थकचि करावे !
जनी मरोन उरवावें । कीर्तिरूपे ॥ ४४ द. ३, स. ९

मृत्यूचे काव्य या प्रकरणाच्या शेवटी सानेगुरुजी म्हणतातः—

" भारतांतील सर्व प्रकारे दैन्यदास्य, सर्व प्रकारचे विषयवैषम्य, सर्व प्रकारचा अंधार दूर करण्यासाठीं देहाची बलिदाने करावयास लाखों कन्या पुत्र उठतील, त्या वेळेसच भारतीय संस्कृतीचा सुगंध दिगंत जाईल व भारत नवतेजाने फुलेल. "

या निष्कर्षात फरक असेल तर तो एवढाच की, रामदासाच्या दृष्टीनें ' आत्मज्ञान हेच देहाचे सार्थक ' तर गुरुजींच्या दृष्टीनें ' देहाचे ध्येयाकरतां बलिदान ' हे सार्थक होय.

सामान्यतः ' भारतीय संस्कृति ' या ग्रंथाकडे पाहिल्यास त्यातील विचार-सरणीचा मथितार्थ थोडक्यात असा सागता येईलः—

( १ ) भारतीय संस्कृति ही समन्वय करणारी संस्कृति आहे.

( २ ) भारतीय सस्कृति ही एका काळीं उच्च दर्जाला पोहोंचलेली होती; परंतु ती आज हीनावस्थेला पोहोंचली आहे.

( ३ ) भारतीय संस्कृति प्रेमावर, त्यागावर, अहिंसेवर अधिष्ठित झाली आहे. साराश, गांधीवाद हा त्या संस्कृतीचा उत्कृष्ट परिपाक आहे.

( ४ ) भारतीय समाजरचना व साम्यवादी समाजरचना ही परस्पर सुसंगत आहे.

हीं सर्व प्रमेये निरनिराळ्या शब्दांत गुरुजींनीं अनेक ठिकाणीं या ग्रंथांत मांडिलीं आहेत. त्यांची विस्तृत चर्चा करणें या निबंधाच्या कक्षेच्या बाहेर

जाईल. तथापि, या ग्रंथात न आलेले भारतीय संस्कृतीबद्दलचे विषय येथे नमूद करण्यास हरकत नाही.

( १ ) भारतीय संस्कृतीचा सुसंगत इतिहास. ( २ ) भारतीय संस्कृतीशीं संलग्न असलेल्या अद्वैत तत्त्वज्ञानाशिवाय इतर तत्त्वज्ञानाचा परामर्ष. ( ३ ) इतर संस्कृतींशीं तुलना व त्या दृष्टीनें मूल्य. ( ४ ) संस्कृति म्हणजे काय ? याबद्दलच्या जुन्या व नव्या कल्पना, या सर्व विषयांचा ऊहापोह करण्यास गुरुजींना आणखी ३०० पानाचा ग्रंथ लिहावा लागेल, हें स्पष्ट आहे. तथापि 'भारतीय संस्कृति' या महत्त्वपूर्ण ग्रंथाच्या लेखनावरून असें म्हणावेसे वाटते कीं, या उरलेल्या सर्व विषयाची मांडणी करण्याचा अधिकार भारतीय वाङ्मयाच्या विविध व्यासंगामुळें त्यानीं प्रस्थापित केलेला आहे.

संस्कृतीचे भवितव्यः—सांस्कृतिक विभागातील सानेगुरुजींचा हा दुसरा ग्रंथ होय. हा डॉ. राधाकृष्णन् यांच्या The Future of Civilisation ' या इंग्रजी ग्रंथाचा अनुवाद आहे. या ग्रंथातील दृष्टि जागतिक असल्यामुळें हा ग्रंथ पहिल्याला पूरक असा मानावा. प्रथमतः प्रास्ताविक भागात जगात चाललेल्या निरनिराळ्या घडामोडींमुळे जग कसे एक होत आहे याचें विवेचन असून विविधतेंतील अविरोधातून निर्माण झालेल्या जागतिक संस्कृतीचा काळ येत आहे असा निष्कर्ष काढण्यात आला आहे. परंतु हा अविरोध शोधून काढणे किती कठीण आहे हे सुचविण्याकरिताच की काय सद्यःस्थितीत धर्म, कौटुंबिक जीवन, आर्थिक जीवन इत्यादि क्षेत्रात कसा विस्कळितपणा आला आहे याचें विवेचन दुसऱ्या प्रकरणात केलें आहे. तिसऱ्या प्रकरणांत, गेल्या ६००० वर्षांत झालेल्या निरनिराळ्या संस्कृतींच्या इतिहासाच्या आधारें आध्यात्मिक पायावर मानवी संस्कृतीच्या पुनर्रचनेची जरूरी कशी आहे हें दाखविण्यात आलें आहे. आणि म्हणूनच शेवटच्या प्रकरणांत, निरनिराळ्या क्षेत्रांत पुनर्रचना कशी करावी याची स्थूल मानानें रूपरेषा देण्यांत आली आहे.

या ग्रंथातील गुरुजींची भूमिका अनुवादकाची असल्यामुळें यांतील विविध मतें त्यांना जशींच्या तशींच मान्य असतील असें मानण्याचें कारण नाहीं; म्हणूनच गुरुजींनीं या ग्रंथांबद्दलचे आपले विचार स्वतंत्र रीतीनें

आपल्या प्रस्तावनेत माडले असते, तर बरे झाले असते असे हा ग्रंथ वाचताना अनेकदां वाटतें. एरवी " भारतीय संस्कृति म्हणजे सर्वांगीण विकास' सर्वांचा विकास हे भारतीय संस्कृतींबद्दलचे 'अपरंपार प्रेम' व 'संस्कृतीचें भवितव्य' या पुस्तकातील " कोणतीही एकच सस्कृति मानवजातीचें ध्येय होऊं शकणार नाही " ही दृष्टि याचा मेळ कसा घालावा ?

सानेगुरुजींच्या निबंधवाङ्मयाच्या दुसऱ्या दालनांत आता आपण प्रवेश करूं. आरंभीच 'गीताहृदय' हा श्री. विनोबाजी भावे याच्या श्रीमत् भगवद्गीतेवरील प्रवचनाचा साराशरूपाने लिहिलेला ग्रंथ आपल्या नजरेस पडतो. आजपर्यंत श्रीमदाद्यशंकराचार्य, ज्ञानेश्वर, लोकमान्य टिळक इत्यादिकांनी गीतेवर निरनिराळीं भाष्ये केली. परंतु या ग्रथातील गीतेकडे बघण्याची दृष्टि सर्वांहून निराळी असून त्यात या सर्व दृष्टींचा समन्वय करण्याचा प्रयत्न केलेला आहे. पहिल्या अध्यायात अर्जुनाला गुरुजींच्या मते युद्धाविषयी खोटें व मोहमय वैराग्य प्राप्त झाले आहे. या मोहमय वैराग्यात स्वतःच्या नातलगांविषयीं आसक्ति होती. अशी आसक्ति आपणां सर्वांना वाटते म्हणून तुम्हा आम्हां सर्वांसाठी गीता आहे असें गुरुजी सांगतात. दुसरा अध्याय ही 'एकाध्यायी गीता' मानली जाते; म्हणून गुरुजींनी त्या अध्यायातील माडलेले विचार उल्लेखनीय आहेत. ते असेः—

( १ ) आत्मा सर्वत्र भरलेला आहे. ( २ ) देहाचा नाशवंतपणा. ( ३ ) धर्म–अबाध्य.

या तीनहि महातत्त्वाची फोड गुरुजींनीं आपल्या विशिष्ट भावनापूर्ण रीतीने केली आहे. उदाहरणार्थ आपल्या प्रांत व जातिभेदाचा वर उल्लेखिलेल्या पहिल्या तत्त्वाचा विचार करता उपहास करून ते म्हणतातः " जगभर जीं दुःखे आहेत, जे अन्याय आहेत, ज्या स्पर्धा आहेत, जीं युद्धें आहेत, ज्या मारामाऱ्या आहेत, त्या सर्वांचें कारण काय ? एकच कारण. सर्वत्र भरलेलें एक आत्मतत्त्व आपण पाहत नाहीं. " अशा रीतीनें आपण सर्वत्र 'आत्मतत्त्वाच्या नदीचीं डबकीं' केलीं आहेत, असें त्यांचें म्हणणें आहे.

दुसऱ्या तत्त्वाचीहि सद्यःस्थितींत आपणांस ओळख नसल्यामुळें आपणास मृत्यूची भीति वाटते व आपण देशासाठीं त्याग करीत नाहीं, अशी

उपपत्ति त्यांनीं माडली आहे. तिसऱ्या तत्त्वातील धर्म याचा अर्थ संकुचित न घेतां कर्तव्यकर्म असा व्यापक करावा असे सांगून हें कर्म करण्याची कला म्हणजे अनासक्त कर्मयोग असा आपला अभिनव सिद्धान्त त्यानीं मांडला आहे. यापुढील अध्यायातील विषय खालीं दिल्याप्रमाणें आहेतः—

| | अध्याय |
|---|---|
| कर्म | ३ रा—कर्माची महति. |
| | ४ था—विविध कर्मे, कर्म, विकर्म व अकर्म. |
| | ५ वा—कर्मयोग, संन्यास याची तुलना. |
| भक्ति | ६ वा—संयम. |
| | ७ वा—भक्ति. |
| | ८ वा—मृत्यु. |
| | ९ वा—ईश्वरार्पण बुद्धि |
| | १० वा—ईश्वरार्पण बुद्धीचे मार्ग. |
| | ११ वा—विश्वरूपदर्शन. |
| | १२ वा—निर्गुण व सगुण भक्तीची तुलना. |
| ज्ञान | १३ वा—ज्ञान-सद्‌गुण. |
| | १४ वा—त्रिगुणात्मक माया. |
| | १५ वा—कर्म, भक्ति, ज्ञान-ऐक्यता. |
| परिशिष्ट | १६ वा—दैवी व आसुरी संपत्ति यांत झगडा. |
| | १७ वा—यज्ञ, ज्ञान व तप याचा महिमा. |
| उपसंहार | १८ वा—कर्मफलत्याग. |

अशा रीतीनें अनासक्तकर्मयोगाचें आपलें नवें गीताभाष्य गुरुजींनीं गीताभ्यासकापुढें ठेवलें आहे. शेवटी वाचकाकरता म्हणून त्यांनीं गीतेंतील बहुमोल उपदेश आपल्या प्रभावी लेखणीनें ३-४ बहुमोल वाक्यांत सांठविला आहे तो असाः—

"...आपल्या कर्मांना, मनांतील विचारांना एक कसोटी लावावी. त्या भगवंताच्या समोर हीं कर्में, हे विचार न्यायला मला लाज नाहीं ना वाटणार? त्याच्यासमोर मान खालीं घालावी नाहीं ना लागणार? असें स्वतःला विचा-

रावे. ईश्वराची इच्छा ती स्वतःची इच्छा करावी. आपल्या कर्मांतून प्रभूचे हेतु प्रकट करावेत." इत्यादि.

दुसऱ्या विभागातील पुढील दोन्हीहि ग्रंथ म्हणजे भगिनी निवेदिता याच्या "Religion and Dharma" या निबधांचा मोकळा अनुवाद आहेत. हे सर्व निबंध कांहीसे धार्मिक, अंशतः तत्त्वज्ञानावर व अंशतः राष्ट्रीय जागृतीकरिता लिहिलेले दिसतात. ज्या निबंधसंग्रहाला गुरुजींनीं 'राष्ट्रीय हिंदुधर्म' म्हणून नांव दिलें आहे, त्यात प्रथमतः हिंदुधर्म कसा सग्राहक आहे,याचे विशदीकरण आहे,व म्हणून आजची जरूर नागरिक धर्म,गृहस्थधर्म, प्रपंच, व्यवहार ही जाणण्याची आहे, असा भगिनी निवेदिता यांचा संदेश गुरुजींनीं मराठी भाषासेवकाना दिला आहे. यापुढील काही प्रकरणें समाजसेवा करण्यास लागणाऱ्या सद्गुणाच्या ऊहापोहासंबंधींची आहेत. या ग्रंथातील प्रकरण २४ वे 'आपल्यासमोर उभे असलेलें काम' हे जास्त महत्त्वाचे वाटते, व जग जरी एक होत असले तरी भारतानें आपलें वैशिष्ट्य व आपला इतिहास कायम ठेवण्याची कशी जरूरी आहे हें या प्रकरणात भगिनी निवेदितानी मोठ्या अभिनिवेशानें सागून आपणांपुढें द्विविध असें कार्य ठेवलें आहे. त्या कार्यांचा अनुवाद गुरुजींनीं खालीलप्रमाणे केला आहे:—

"......आज प्रत्येक पावलापावलाला आपणास दोन गोष्टी करावयाच्या आहेत. तिकडे जगाच्या ज्ञानात भर घालावयाची व इकडे भारतवर्षांतहि भारताचे ध्येय प्रकट करावयाचें. आजच्या पिढींतील लोकासमोर हे दिव्य, भव्य कर्म आहे. हे आजचें रणक्षेत्र, कर्मक्षेत्र" इत्यादि.

भगिनी नावेदिता याच्या आणखी काहीं अनुवादित निबंधाचा संग्रह करून गुरुजींनी त्याला 'समाजधर्म' असे नाव दिलें आहे. या संग्रहांतील 'गुरु व शिष्य', 'धर्म व राष्ट्रीय अभ्युदय' आणि, 'मृत्यूवर विजय' इत्यादि प्रकरणातील विचार गुरुजींनीं 'भारतीय संस्कृति' या ग्रंथांत मांडलेल्या विचाराशीं तंतोतंत जुळणारे आहेत.

एकंदरीनें निवेदिता यांचें भारतीय संस्कृतीबद्दलचें प्रेम, हिंदी राष्ट्राबद्दलचा अभिमान, भारतीयांच्या भविष्याबद्दलचा आशावाद ह्या तीनहि गोष्टी

गुरुजींच्या विशिष्ट मनोरचनेशीं जुळणाऱ्या असल्यामुळें त्यांचे या दोनहि ग्रंथाचे अनुवाद अत्यंत स्फूर्तिदायक झाले आहेत यांत शंका नाहीं.

तिसरा विभाग प्रचारात्मक वाङ्मयाचा आहे. या विभागांतील पहिला ग्रंथ ‘ स्वदेशी समाज ’ हा डॉ. रवींद्रनाथ टागोर यांच्या ग्रंथाचा सुंदर अनुवाद आहे. हे मूळ निबंध १९०५ ते १० या काळातील व अनुवाद १९३२ तला आहे. या निबंधांत खालील गोष्टी प्रामुख्यानें सांगितल्या आहेत:—

(१) भारतीय शक्ति मारली जाणार नाहीं.

(२) आपणच आपल्या देशाची चिंता वाहिली पाहिजे. त्यासाठीं अहोरात्र कष्ट केले पाहिजेत.

(३) खेड्यांतून आपलें राष्ट्रीय जागृतीचें कार्य सुरू झालें पाहिजे.

(४) भारतीय श्रेष्ठत्व आज नाहींसें झालें आहे; तें परत मिळवूं तेव्हांच हिंदुस्थानचा इतिहास पुरा होईल.

या विभागांतील दुसरा छोटा ग्रंथ, महात्माजींच्या लेखांचा अनुवाद, “ खेड्यांत जाऊन काय करणार ? ’ या नांवानें १९३३ त प्रसिद्ध झालेला आहे. खेड्यांतील बारीकसारीक जीवन येथें तपासलें गेलें आहे. डॉ. देव, भगिनी निवेदिता यांसारख्या ग्रामसेवकांचे अनुभव येथें सांगितले आहेत. सर्वच ग्रंथ विधायक कार्याला उपयुक्त आहे.

गोड निबंधः—प्रचारात्मक वाङ्मयांतील तिसरा ग्रंथ म्हणजे ‘ गोड निबंध ’ या नांवानें प्रकाशित झालेले गुरुजींच्या लेखांचे संग्रह होत. ‘ गोड निबंधां ’त गुरुजींनीं १९३८ व ३९ या दोन वर्षी संपादिलेल्या ‘ कॉंग्रेस ’ या वर्तमानपत्रांतून व ‘ विद्यार्थी ’ या मासिकांतून जे लेख लिहिले, ते समाविष्ट करण्यांत आलेले आहेत. ‘ कॉंग्रेस ’ हें वर्तमानपत्र चालविण्यांत गुरुजींचे जे हेतु, तेच या सर्व निबंधांना लागू होतात. या निबंधांच्या पहिल्या भागाच्या प्रारंभींच ‘ निवेदन ’ करतांना आपला हेतु गुरुजींनीं सुस्पष्ट केला आहे. ते म्हणतात, “ हें पत्र कोणाचें मिंधें नाहीं. कोणाचें बंदें नाहीं. या पत्राचें एकच दैवत म्हणजे ‘ कॉंग्रेस ’ संस्था. कॉंग्रेससंस्थेचा निर्मळ आत्मा जनतेस दाखवून, त्या निर्मळ आत्म्याचे उपासक व्हा, असें हें पत्र

आग्रहानें व प्रेमानें सर्वांना सांगेल. काँग्रेसचें मला जें स्वरूप दिसतें, जें आवडतें तेंच मी दाखविणार. काँग्रेसच्या ज्या स्वरूपाची मी पूजा करतों त्याच स्वरूपाची इतरांस करावयास लावणार."

अशा हेतूंनीं प्रेरित होऊन, 'काँग्रेस' हाच आपला श्वासोच्छ्वास मानून हे लेख लिहिलेले असल्यामुळें काँग्रेसच्या राजकारणाचें स्पष्टीकरण व तरफदारी यांत असणारच. प्रस्तुत परिचयात्मक निबंध हा सानेगुरुजींच्या वाङ्मयीन मूर्तीचें दर्शन घडविण्याकरता असल्यामुळें काँग्रेसच्या पक्षापुरतेंच ज्या विचारांना किंवा चळवळींना महत्त्व त्यांचा विस्तृत ऊहापोह या निबंधांत येण्याचें कारण नाहीं. तथापि, सर्व हिंदवासीयांच्या जीवनाला पोषक अशा ज्या भावनांची, विचारांची किंवा कल्पनांची चर्चा या निबंधांतून केलेली दिसते, त्यांचा परिचय येथें देण्यास हरकत नाहीं. हा परिचय देतांनाहि सर्व लक्ष त्या विचारांच्या, भावनांच्या, वाङ्मयीन सजावटीकडे अधिक असणार हें उघड आहे. त्याशिवाय संपादक या नवीन नात्यानें सान्यांच्या कार्याचें महत्त्वमापन झालें पाहिजे, तें निराळेंच.

या निबंधांतील बरेचसे लेख कांहीं प्रसंगांचा उपयोग करून घेऊन हिंद-वासीयांच्या अंतःकरणांत राष्ट्रीयत्वाची भावना प्रदीप्त करण्याच्या हेतूनें लिहिले आहेत. अर्थात् 'राष्ट्रीय सप्ताहातील' दिवसांचा गुरुजींनीं भरपूर उपयोग करावा, हें साहजिक आहे. या सप्ताहाचें स्मरण म्हणजे जालियन-वाला बागेतील हत्याकांडाचें स्मरण. अशा या प्रसंगाचें गुरुजींच्या भावना-मय, उत्कटपूर्ण लेखणींतून केलेलें चित्रण अत्यंत हृदयस्पर्शी असणारच. ते लिहितातः— " जालियनवाला बागेंतील वीस हजार लोकांवर सोळाशें गोळ्या झाडण्यांत आल्या, गोळ्या संपल्या, नाहीं तर सोळा हजारहि सोड-ण्यांत आल्या असत्या. स्त्री–पुरुष–मुलें यांच्या प्रेताचे खच पडले. तेरा एप्रिल रक्तानें रंगला. गुढीपाडव्याचा तो दिवस भारतमातेच्या मुलांच्या रक्तानें रंगला. निष्पाप बलिदान झालें." इत्यादि नुसत्या जालियनवाला बागें-तील हत्याकांडाचें स्मरण करून देऊन साने थांबत नाहींत; तर हिंदी सणांपैकीं प्रत्येक सणाचा आपल्या अभिनव दृष्टीनें अर्थ लावून त्या दिनांचाहि उपयोग भयभीत अशा हिंदवासीयांच्या अंतःकरणांत निर्भयता, धडाडी, राष्ट्रप्रेम इत्यादि इष्ट गुणांचा परिपोष व्हावा याकरतां ते करून घेतात. राष्ट्रीयत्त्वा-

बरोबरच किसान, मजूर, अस्पृश्य यांचेहि प्रश्न गुरुजींना जिव्हाळ्याचे वाटत असल्यामुळें त्यासंबंधींचे लेख या निबंधांत आहेत. दलितवर्गांना ते 'राष्ट्रपुरुषाचीं फुप्फुसे' मानतात व 'काँग्रेसची खरी शक्ति' यांची काळजी वाहिल्यानेंच वाढेल, अशी त्यानीं आपली श्रद्धा व्यक्त केली आहे. दलितवर्गाचा उद्धार करणें हें भारतीय संस्कृतीचें एक अंग आहे व संतांचेंहि हेंच कार्य होते या दोन विचारांची पुनरावृत्तीहि या निबंधांत झाली आहे.

गुरुजींच्या जिव्हाळ्याचा असा तिसरा विषय हिंदु-मुसलमान ऐक्याचा होय. हें ऐक्य होणें राजकीय, सामाजिक व आर्थिक दृष्टींनीं योग्य आहे असें अनेक लेखकांनीं अन्यत्र लिहिलें आहे. परंतु गुरुजी या प्रश्नाला जें धार्मिक व आध्यात्मिक स्वरूप देतात, तेहि उल्लेखनीय व वैशिष्ट्यपूर्ण असें आहे. ते म्हणतात: " इस्लाम या शब्दाचा अर्थ शांति व हिंदु धर्मांतहि प्रत्येक मंत्राचे शेवटीं शांतिः शांतिः शांतिः" असें म्हणतात. या विधानाच्या पुष्ट्यर्थ अंमळनेरच्या सखाराम महाराजाच्या रथाला 'पहिली मोगरी' देण्याचा पहिला मान मुसलमान भाईचा आहे, असा आचार ते सांगतात व इतरहि कांहीं प्रचलित व ऐतिहासिक उदाहरणें देतात.

या निबंधांतून मुख्यतः वरील तीन विषयांवरील त्यांचीं मतें येथवर मांडण्याचा प्रयत्न केला आहे. हे निबंध म्हणजे 'काँग्रेस' या वृत्तपत्रांतून व 'विद्यार्थी' या मासिकांतून आलेले त्याचे लेख असल्यामुळें संपादक या नात्यानेंहि त्यांची योग्यता ठरविण्याचा प्रश्न साहजिकच उद्भवतो. महाराष्ट्रीय संपादकांची परंपरा अत्यंत उज्ज्वल आहे. त्यांत विशेषतः लोकमान्य टिळक, आगरकर, चिपळूणकर, परांजपे, केळकर, कोल्हटकर, खाडिलकर इत्यादिकांचीं नांवें चटकन् डोळ्यासमोर येतात. टिळक हे सडेतोड वृत्तीचे संपादक, तर परांजपे यांचा उपरोधावर भर. खाडिलकर यांचा संपूर्ण राष्ट्रीय दृष्टिकोन, तर केळकर हे बुद्धिवादी. अशा वैशिष्ट्यपूर्ण संपादकीय इतिहासांत साने यांचें स्थान तितकेंच वैशिष्ट्यपूर्ण असें आहे. साने हे विरोधकाला आपल्या प्रेमानें, हृदयाच्या बोलांनीं जिंकतात. त्यांच्यावर अहिंसेबद्दलच्या विसंगतपणाचा आरोप आला असतां ते उत्तर देतात: " जीवनाचा विकास अनेक रीतींनीं होत असतो. वटवृक्षासारख्या प्रचंड वृक्षालाहि कांटे खूप फुटतात; त्यांतच त्याचें वैभव आहे. धुळ्याच्या मित्रांना ( त्यांच्यावर

विसंगतीचा आरोप घेणाऱ्यांना ) हे वटवृक्षाचे कांटे आवडतात का ? त्यानीं वटवृक्षास सांगावें 'एक फादी इकडे, एक फांदी तिकडे' हा काय चावटपणा ? असा सहस्रतोंडी काय होतोस ? ही अहिंसा नव्हे.' वटवृक्ष काय उत्तर देईल ? मला माहित नाहीं. परंतु मला खांडावयास या मा. वा. ना. गृहस्थांनीं जशी लेखणी हातीं घेतली आहे, तशी वटवृक्षास खाडावयास कुऱ्हाड घेतील का ?" हें उत्तर उपरोध, सडेतोडपणा, प्रेमळपणा यांचा सुंदर संगम नाहीं, असें कोण म्हणेल ? अशाच तऱ्हेच्या आपुलकीनें व स्नेहानें केलेल्या टीकेचा उत्कृष्ट नमुना खुद्द कॅांग्रेसवरील टीकेंत आढळतो. त्यांच्या मतें, "श्रीमंताच्या डुरकावणीस भीक न घालता आज दुःखी जनतेच्या सुखासाठीं कॅांग्रेस निश्चयानें उभी राहील, तेव्हांच ती विशुद्ध स्वरूपांत अतुल तेजानें व अपार सामर्थ्यानें शोभेल, खरें स्वातंत्र्य जवळ येईल." कॅांग्रेसच्या आंतील व कॅांग्रेसच्या बाहेरील विरोधकांना उत्तरें देण्याची त्यांची ही अशी विशिष्ट पद्धत आहे. कोणत्याहि विरोधकाचें मन ते दुखवितील किंवा त्याच्या व्यक्तिविषयक वैगुण्यावर हल्ला करतील हें संभवत नाहीं. विरोधकांचे गुण मान्य करण्याचा खेळाडूपणा त्यांच्यात भरपूर असून त्यांचे दोषहि स्पष्टपणें दाखविण्याचें धैर्य त्याचेजवळ आहे. सावरकरांचा अस्पृश्योद्धार मान्य करून ते इतर हिंदुसभावाल्यांना बजावतात कीं, " जे हिंदुसभावाले अस्पृश्यांस माणुसकी मिळावी म्हणून झटत नाहींत, त्यांना इतरांस नांवें ठेवण्याचा अधिकार नाहीं. तसेंच राष्ट्रीय स्वयंसेवक संघात दिलें जाणारें लष्करी शिक्षण पाहून त्यांचें हृदय 'उचंबळून' येतें हें ते कबूल करतात; परंतु 'हिंदूंचा हिंदुस्थान' या शिकवणीला ते स्पष्टपणें 'विषारी बौद्धिक खाद्य' म्हणतात.

सामान्यतः हे गोड निबंध म्हणजे सानेगुरुजींच्या 'हृदयाच्या गोष्टी' होत. यांत त्यांच्या हृदयाची गोडवी जशी वाचकास प्रत्ययास येते तशीच त्यांना वाटणाऱ्या जिव्हाळ्याच्या प्रश्नावरची चर्चाहि त्यांच्या हृदयाचा ठाव घेते.

चौथ्या विभागांतील एकच ग्रंथ म्हणजे 'कला म्हणजे काय ?' या टॅालस्टॅाय यांच्या एका ग्रंथाचा १९३४ मध्यें केलेला अनुवाद होय. 'कला म्हणजे काय ?' या टॅालस्टॅाय यांच्या मूळ ग्रंथाची गुरुजींनीं वाखाणणी करतांना या ग्रंथासाठीं टॅालस्टॅाय महर्षि ४० वर्षें खपत होते असें सांगितलें आहे.

अर्थात्, अशा ग्रंथाच्या अनुवादांत गुरुजींसारख्या कष्टाळु लेखकानें समरस व्हावें हें स्वाभाविक आहे. या ग्रंथाची रचना सामान्यतः भूमितींतील सिद्धान्ताप्रमाणें एका प्रमेयापासून दुसऱ्या प्रमेयाकडे नेणारी आहे. त्यामुळें सबंध ग्रंथ वाचल्याशिवाय खालीं ठेवतांच येत नाहीं, इतका तो आकर्षक आहे. याचें श्रेय जितके टॉलस्टॉयकडे तितकेंच अनुवादकाकडेहि जातें.

ग्रंथारंभीं लेखकानें आधुनिक कलात्मक कृतींची व वाङ्मयाची कशी झपाट्यानें वाढ होत आहे याचें विवेचन केलें आहे. त्यानंतर ह्या कलाकृतींकरिता किती अतोनात श्रम घेतले जातात याचें एक हृदयंगम वर्णन लेखकानें रशियांत पाहिलेल्या एका जलशाच्या आधारें दिलें आहे. त्याचा गुरुजींनीं केलेला अनुवाद निःसंशय सरस वठला आहे. त्यांतला कांहीं भाग येथें दिल्यावांचून राहवत नाहीं:—

“ मी गेलों तों पहिल्या अंकाला आरंभहि होऊन गेला होता. प्रेक्षकांमध्यें जाऊन बसण्यासाठीं मला रंगभूमीच्या प्रवेशद्वाराजवळून जावें लागलें. रंगभूमि व नाटकगृह प्रकाशित करण्यासाठीं, त्याचप्रमाणें निरनिराळे देखावे बदलण्यासाठीं तेथे प्रचंड यंत्रें होतीं. मी त्या प्रचंड यत्रांजवळून, अंधाऱ्या वाटेंतून, अरुंद बोळांतून जात होतों. त्या प्रचड इमारतीच्या कमानीमधून मला नेण्यात आलें. तेथील अंधारांत, धुळींत व घाणींत मजूर काम करण्यांत दंग झाले होते. एक अगदीं फिक्कट भुतासारखा दिसणारा, त्याचे कपडे धुळीनें मळले आहेत व फाटून गेले आहेत, काम करून करून ज्याचे हात अगदीं गळून गेलेले आहेत व घाणींत भरले आहेत......ज्याला आनंद माहित नाहीं, विश्रांति माहित नाहीं असा मनुष्य......दुसऱ्या कोणावर तरी रागावत होता. ” नंतर एका मिरवणुकीचा प्रवेश वर्णन करून एकाद्या नटाची लहानशी चूक झाल्यास व्यवस्थापक कसा रागावतो याचें वर्णन केलें आहे. या वर्णनाच्या शेवटीं, इतकी धडपड, इतके श्रम ज्या कलेकरतां होतात, त्या कलेची व्याख्या काय असा प्रश्न लेखकानें उपस्थित केला आहे. पुढील अनेक प्रकरणांत हाच प्रश्न मध्यवर्ति धरून अनेक कलाकारांचीं मतें तपासण्यांत आलीं आहेत. विशेषतः कला म्हणजे सौंदर्यसर्जन व कला ही दुर्बोधच राहणार या मतांचा भरपूर समाचार घेण्यांत आला आहे. शेवटीं टॉलस्टॉयनें कलेसंबंधीं आपलीं सूत्रें सांगितली आहेत. तीं थोडक्यांत अशीं:—

( १ ) " एका विशिष्ट भावनेशीं दुसऱ्याला तद्रूप करण्यासाठी कांहीं बाह्य चिन्हांनीं ती भावना व्यक्त झाली कीं कलेचा उदय होतो. " यावरून कला हा एक मानवी व्यापार आहे हें उघड आहे. ( २ ) कलेचें मानवी जीवनांत फार मोठें स्थान आहे तें म्हणजे सद्भावनांचा परिपोष करणें. ( ३ ) अशी कला हृदयस्पर्शी होण्यास कलाकारांच्या अंतःकरणांत जिव्हाळा पाहिजे. ( ४ ) अखिल मानवजातीचें कल्याण हेंच कलेचें ध्येय होऊं शकतें व म्हणून बहुजनसमाजाला कोणतीहि कलाकृति समजली पाहिजे.

कलेविषयींचा टॉलस्टॉयचा हा दृष्टिकोन रशियातील तत्कालीन विचार-प्रणालींच्या दृष्टीनें क्रांतिकारक जरी ठरला असला, तरी आतां तो हिंदुस्थानांत व बाहेर हळूं हळूं सर्वमान्य होत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मात्र कला समाजाभिमुख करतांना तिचें सौंदर्य व उत्कृष्टत्व कोणत्याहि प्रकारानें कमी होणार नाहीं अशी दक्षता बाळगिली पाहिजे. कलेचें सध्यांचें रूढ असलेलें ओंगळ स्वरूप टॉलस्टॉय किंवा साने गुरुजी यांच्याप्रमाणें कोणालाहि त्याज्य वाटेल; परंतु हाच धोका कलेला रस्त्यांतील व्यक्तीकडे नेतांनाहि संभवतो, एवढें मात्र नम्रपणें सुचवावेंसें वाटतें.

शेवटीं, वर सांगितलेल्या या ओंगळ स्वरूपाविषयीं गुरुजींनीं तिटकारा व्यक्त करून या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत महाराष्ट्रीय कलाकाराना जी हांक मारली आहे, तिकडे लक्ष वेधल्यावांचून राहत नाही. ते आपल्या भावनामय भाषेंत म्हणतातः–

" महाराष्ट्रांतील कलावानांनो ! हा महाराष्ट्र, मुमुर्षु व मरणोन्मुख महाराष्ट्र जरा येऊन डोळेभर पाहा तरी. पहा त्याच्या जखमा, पहा त्याच्या वेदना, पहा त्याचे हाल, पहा त्याचें अज्ञान, पहा त्याच्या रूढी, पहा त्याची उपासमार, पहा त्याची पदोपदीं मानखंडना... हें विराट् दुःख, ही अपार आपत्ति यांच्या दर्शनानें नाहीं का तुमचे डोळे भरून येत ?... तुमच्या सर्व कलाकृतींतून गरिबांची हांक ऐकूं येऊं दे. तुमच्या कलाकृतींतून त्यांचीं दुःखें, त्यांच्या आकांक्षा यांचीं चित्रें दिसूं दे. तुमच्या कलाकृतींना स्पर्श करतांच बहुजनसमाजाच्या हृदयाला आपण स्पर्श करीत आहोंत, असें वाटूं दे. " इत्यादि. टॉलस्टॉयच्या या महान् ग्रंथाच्या अनुवादाच्या निमित्तानें गुरुजींनीं महाराष्ट्राला जो संदेश दिला आहे, त्याला महाराष्ट्रीय कलाकार लव-

करच 'ओ' देतील व निदान महाराष्ट्रीय कला व महाराष्ट्रीय समाज याचा समन्वय होईल, अशी आशा करूं या.

गुरुजींच्या निबंधात्मक वाङ्मयांतील एक महत्त्वाचें पुस्तक म्हणजे 'स्वराज्यसंस्थापक श्रीशिवराय' हें होय. या पुस्तकाच्या सुरुवातीला 'दोन शब्द' लिहितांना रा. श्रीपाद केळकर यानीं म्हटल्याप्रमाणें, "श्रीशिवरायाचें तेजस्वी जीवन आणि साने गुरुजींची स्फूर्तिदायी लेखणी यांचा प्रभावशाली संयोग" म्हणजे हा निबंध होय. प्रथमतः गुरुजींनीं महाराष्ट्रातील शिवपूर्वकालीन अवनत स्थितीचें करुणास्पद चित्र वाचकांसमोर उभें केलें आहे. यानंतर महाराष्ट्रीय संतकवींनीं व शाहीरांनीं जी जागृति केली, तिचें वर्णन करून "लाटेंतून स्वच्छ फेस निर्माण होतो त्याप्रमाणें जनतेंतील लाटेंतून महापुरुष उत्पन्न होतो" अशी शिवावताराची मीमांसा केली आहे. यापुढें त्यांनीं शिवचरित्राची मीमांसा त्यातील मुख्य प्रसंग घेऊन राष्ट्रीय दृष्टीनें केली आहे. शेवटीं शिवस्मारक म्हणजे स्वातंत्र्याचा लढा व भगवा रंग म्हणजे संन्यास व त्याग अशी आपलीं मतें त्यांनीं अत्यंत प्रभावी भाषेंत मांडलीं आहेत. या निबंधांपुरतें इतकेंच म्हणतां येईल कीं, या निबंधांत सरदेसायांची संशोधक दृष्टि, डॉ. बाळकृष्णांचा शिवचरित्राचा गाढ व्यासंग, हिंदुत्वनिष्ठांचा जाज्वल्य हिंदुधर्माभिमान या सर्वांचा अभाव असला, तरी गुरुजींच्या प्रसादपूर्ण लेखणींतून शिवचरित्राचा जो अभिनव अर्थ उतरला आहे, तो हिंदी राष्ट्राच्या आजच्या स्थितीला निःसंशय स्फूर्तिदायक ठरेल.

आतां या निबंधात्मक वाङ्मयाच्या साहित्यिक मूल्यासंबंधीं थोडेंसें विवेचन करूं. महाराष्ट्राचे पहिले आवडते निबंधकार श्री. विष्णुशास्त्री चिपळूणकर समजले जात असले, तरी त्यांच्या पूर्वीं आपल्या लिखाणांतून चढविलेल्या स्वकीयांच्या भ्रामक समजुतींवरील हल्ल्यामुळें लोकहितवादी गोपाळ हरि देशमुख हे प्रसिद्ध झाले होते. चिपळूणकरांनीं स्वदेश, स्वभाषा व स्वधर्म इत्यादि गोष्टींबद्दलचा अभिमान जनतेंत वाढविला व १८१८ नंतर सुप्त झालेली जनता आपल्या लेखणीच्या सामर्थ्यानें खडबडून जागी केली. त्यानंतरच्या अनेक लेखकांवर शास्त्रीबुवांच्या विचारसरणीची छाप दिसते. अशा निव्वळ राष्ट्रवादी लेखकांत लो. टिळक, खाडिलकर, शि. म. परांजपे इत्यादि नावें समाविष्ट होतात. यांपैकीं प्रत्येकाचें कांहीं तरी वैशिष्टय

आहेच. तथापि,सामाजिक दृष्टीनें आपल्या हिंदुसमाजावर प्रखर टीका करणारे लोकहितवादींनंतरचे लेखक कै. आगरकर हेच होत. याचाच संप्रदाय कै. श्री. कृ. कोल्हटकर, आपटे यांनीं या नाहीं त्या स्वरूपांत चालविला. यानंतरच्या १९१४ ते १८ च्या महायुद्धानें पाश्चिमात्य चालीरीति, वाङ्मय, संस्कृति यांच्याजवळ आपण अधिक त्वरित गतीनें ओढले गेलों. त्याचा वाङ्मयीन परिणाम म्हणजे नवीन पद्धतीच्या 'लघुनिबंध' प्रकाराचा जन्म हा होय.

या नवीन लघुनिबंध-वाङ्मयाचा जन्म बहुतांशीं इंग्रजी वाङ्मयांतूनच मराठींत झालेला आहे. चेस्टर्टन, लिंड, गार्डिनर इत्यादि इंग्रजी लेखकांनीं आजच्या सुप्रसिद्ध लघुनिबंध-लेखकांवर छाप बसविली आहे. या लघुनिबंध-लेखकांत प्रा. फडके, खांडेकर व काणेकर ही आधुनिक लघुनिबंध-वाङ्मयाची त्रैमूर्ति आहे. या तिघांच्याहि लघुनिबंध-वाङ्मयाचें परीक्षण करून परीक्षकांनीं या वाङ्मयप्रकाराचीं कांहीं निश्चित अशीं लक्षणें ठरविलीं आहेत. त्यांतील कांहीं प्रमुख अशीं:—

(१) लघुनिबंधावर लघुनिबंध लेखकाच्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तित्वाची छाप पडणें अपरिहार्य आहे.

(२) "त्याला कोणताहि विषय चालतो. जगाच्या प्रलयकालापासून 'कात्री' पर्यंत वाटेल त्या विषयावर तो लिहिलेला असेल." (भि. अ. परब)

(३) "वाचकाला हंसवीत, रिझवीत सत्यदर्शन करणें, शहाणपण शिकविणें हेंच सर्व चांगल्या निबंधाच्या लेखकाचें उद्दिष्ट असतें." लघुनिबंध व गुज-गोष्टी यांचीं लक्षणें सारखींच आहेत.

साने गुरुजी याचें लघुनिबंध-वाङ्मयांत स्थान ठरविणें अत्यंत कठिण आहे. 'संदेश देणे', 'प्रवचन देणें', 'मुद्दाम एकादा विषय निवडणें' ह्या गोष्टी आधुनिक लघुनिबंधकाराला वावडया, तर यासाठींच श्री. साने यांचें सर्व लिखाण आहे. प्रा. फडके आपणांस अकस्मात् दिसलेल्या 'पांढऱ्या केसा'चें वर्णन करतांना रंगून जातात, तर जीवनातील असल्या क्षुल्लक घटनांकडे लक्ष्य देण्याइतकें सान्यांचें मन कधीं तरी सुखवादी व आनंदवादी होईल का अशी शंका मनांत येते. 'पत्रें जितकीं विनाकारण लिहिलेलीं असतील, तितकी त्यांच्यावर आपली प्रीति अधिक जडते.' असा प्रा. फडके यांच्या गुजगोष्टींतील अनुभव, तर सान्यांचे गुरु विनो-

बाजी भावे आपल्याला आलेल्या एका पत्राला उत्तर देतांना लिहितात, " तिकडील पिकापाण्याची व शेतकीची माहिती नीट काळजीपूर्वक लिहिली, याचें कौतुक वाटलें."

हा सर्व विरोध दाखविण्याचा हेतु सान्यांचें व्यक्तित्व आधुनिक लघु-निबंधकारांपेक्षां किती वेगळें आहे हें दाखविण्याचा आहे. सान्यांना आपल्या वाचकांना एक विशिष्ट संदेश द्यावयाचा आहे. विवेचनांत लपवाछपवी करून, आडवळणानें किंवा ध्वनित रीतीनें तो वाचकांच्या गळीं उतरविणें हें त्यांच्या प्रकृतीविरुद्ध आहे. तथापि, आधुनिक लघुनिबंधकार व साने हे इतर दृष्टींनीं जवळ आहेत. दोघेहि वाचकांशीं 'गुजगोष्टी' करण्यास तत्पर असतात. उत्कटता व जिव्हाळा हे दोघांचे समानधर्म आहेत. श्री. खांडेकर तरी 'थोडे अविचारी व्हा' असा संदेश आपल्या लघुनिबंधातून का ध्वनित करतात? तर, त्यांना जो विचार कृतिशून्य बनवितो, तो पसंत नाहीं. प्रा. फडके तरी 'अज्ञानाची महति' या गुजगोष्टीत विशेष तऱ्हेच्या अज्ञा-नाचें महत्त्व वर्णन करतात ना? म्हणजे लपून छपून कां होईना, लघुनिबंध-काराना वाचकांसाठीं काहीं तरी संदेश द्यावयाचा असतो, हें निश्चित होय.

चिपळूणकरांच्या स्वत्त्वाभिमान, लोकहितवादीची ज्ञानपिपासा, पराज-प्यांचा उपरोध, लोकमान्याचा तत्त्वज्ञानाबाबतचा व्यासंग, खाडेकरांचा दलितवर्गाबद्दलचा जिव्हाळा——ही सर्व वैशिष्ट्ये सान्यांच्या विस्तृत वाङ्मयप्रागणात स्वैर संचार करताना आढळतात. त्यातूनहि गुरुजीचें असे निराळे वैशिष्ट्य आहेच हें वरील सर्व ऊहापोहावरून लक्षांत येईलच. ते राजकीय बाबतींत संपूर्ण स्वातंत्र्यवादी, सामाजिक बाबतीत भारतीय संस्कृतीच्या दृष्टीनें समतावादी, आर्थिक बाबतीत समाजसत्तावादी असे दिसतात. परंतु या सर्व वादापेक्षां त्याना ज्या दोन देवता पूज्य वाटतात त्या म्हणजे म. गांधी व विनोबाजी भावे ह्या होत. सान्यानीं आपल्या वाङ्मयांत जेथें जेथें कोणत्याहि उत्कृष्ट गुणाचें वर्णन केलें आहे, तेथें तेथें यापैकीं एक मूर्ति तरी त्यांच्या डोळ्यासमोर असावी असा आपणांस प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रत्यय येतो. 'भारतीय संस्कृति' या ग्रंथांत भारतांत अहिंसेच्या तत्त्वाची कशी संपूर्ण उत्क्रांति झाली आहे, याचें वर्णन करतांना त्यांना आनं-दाचें भरतें येऊन ते म्हणतातः " धन्य ही 'अहिंसा परमो धर्मः' सांगणारी

भारतीय संस्कृति ! धन्य हे प्राचीन ध्येयपरंपरा पुढें नेणारे आजचे विश्ववंद्य महात्माजी.” तसेंच कला म्हणजे काय या अनुवादित ग्रंथांत सर्व कलावानांना महात्माजींचें अनुकरण करण्याचा त्यांनीं आदेश दिला आहे. पूज्य विनोबाजी तर त्यांना मंत्रद्रष्टयाप्रमाणें वाटत असावेत. त्यांच्या गीतेवरील प्रवचनांचा सारांश लिहिण्याची धडपड त्यांनीं कांहीं उगीच नाहीं केली. त्याशिवाय, त्यांनीं सांगावें व यांनीं उत्तमोत्तम ग्रंथांचा अनुवाद करावा असा संकेत दिसतो.

अशा रीतीनें श्री. सानेगुरुजी याच्या निबंधवाङ्मयाचें सिंहावलोकन मी ‘कृतीचीं आयाळें’ चढवून केलें आहे. त्यांतील सुंदरता गुरुजींची आहे व अनिष्ट तें माझें आहे. परंतु या परिचयानें तरी प्रवृत्त होऊन गुरुजींच्या विचारसरणीची साधकबाधक चर्चा गुरुजींच्या एकाद्या समानधर्म्याकडून व्हावी, एवढी आशा प्रकट करावीशी वाटते.



## भाषाशैली

" Style is the man "

श्री. साने गुरुजी यांच्या भाषाशैलीवर भाष्य करणें म्हणजे निसर्गावर काव्य करणें. निसर्ग प्रत्येक ऋतूंत भूमिमातेला नटवीत असतो; सानेगुरुजी प्रत्येक शब्दांत सरस्वतीमातेला सजवीत आहेत. निसर्ग आकाशांत नाना रंग भरीत असतो; गुरुजी जीवनांत नानारंग ओतीत आहेत. निसर्गांत दाट विशाल वृक्ष सांवली देतात, कोमल लता सुगंध पसरीत असतात, सृष्टीचे भाट मंजुळ गीतें गातात, झरे नाचतात, अथांग सागराला भरती येते. गुरुजींचें वाङ्मय म्हणजे निसर्गाचें हुबेहूब प्रतिबिंब. तेथें 'भारतीय संस्कृति'-सारखे विशाल वृक्ष पोळलेल्या जीवांस सांवली देण्यास उभे आहेत, त्यांची कोमल भाषा जीवनांत सुगंध पसरीत आहे, त्यांचा प्रत्येक शब्द परमेश्वराचें स्तुतिगान करीत आहे, त्यांच्या लिखाणांतून भावनांचे झरे नाचत आहेत, प्रेमाचा अथांग सागर उचंबळत आहे. अशा या प्रेमदेवाच्या पूजकाच्या प्रीतिगीतांचें आज आपल्याला रसग्रहण करावयाचें आहे. एकादा गायक जसा गायनांत गुरूचा संप्रदाय राखीत असतो, त्याप्रमाणें गुरुजी परमेश्वराचा संप्रदाय राखीत आहेत. सारी सुरावट आणि सारी खुलावट अनुरागाची आहे. तो राग ते शांतीच्या तालावर गातात. त्यांचें जीवन हें त्यांच्या गीतांचे आरोहावरोह आहेत, असा हा सृष्टीचा महान् गवई आहे; दीपक राग गातांच

दिवे लागावेत, मेघमल्हार गातांच जीवनाचा वर्षाव व्हावा, तसेंच गुरुजींनीं अनुरागाची आळवणी सुरू करतांच प्रेमळ श्रोते प्रेमानें रडूं लागतात! नागसुद्धां विष ओकणें विसरून आनंदानें डोलूं लागतो. साहित्यसृष्टीचा हा तानसेन जीवनसर्वस्व ओतून प्रीतीचा राग आळवीत फिरत आहे.

साने गुरुजींची भाषा ही त्यांच्या जीवनापेक्षां वेगळी नाहीं. "चित्ते वाचि क्रियायांच साधूनामेकरूपता" अशा साधुवृत्तीचे ते असल्यामुळें त्यांच्या वाणीवर बोलणें म्हणजे त्यांचा चित्तशोध घेणें. साहित्याच्या क्षेत्रांत त्यांनीं आपलें नांव अजरामर केलें आहे, तें या भाषेच्या जोरावर. गुरुजींचें नांव पुस्तकावर नसलें, तरी तें गुरुजींनींच लिहिलें आहे हें एकाद्या शाळेंत जाणाऱ्या मुलाला देखील सांगता येईल इतकी त्याची भाषा वैशिष्ट्यपूर्ण आहे. आणि इतकी त्यांच्या भाषेची सर्वत्र आबालवृद्धांवर मोहिनी पडलेली आहे. "Style is the man," हें तर गुरुजींच्या बाबतींत पूर्णतया सत्य आहेच; परंतु आचार्य भागवतांनीं गुरुजींविषयीं लिहिलेल्या एका लेखाच्या अग्रभागीं अवतरणांत घातलेलें, "Who touches this book touches the man" हें वाक्य त्यांच्या बाबतींत जास्त समर्पक वाटतें. कारण आपलें व्यक्तिमत्व आपल्या लिखाणांतून ओतणारा गुरुजींसारखा लेखक विरळा. गुरुजींचें मराठीवर तर अपरंपार प्रेम. ज्ञानदेवानें "माझा मऱ्हाटाचि बोल कवतिकें। परि अमृतातेंही पैजा जिंके॥ असें म्हटलें आहे. या अमृताहून गोड भाषेचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे गुरुजींची भाषा. आपल्या मराठीच्या मोहकतेपुढें–आणि तिच्या सेवनांत गढून गेल्यामुळें 'मी आतां इंग्रजी भाषा विसरत चाललों आहें' असें ते एकदां माझ्या मित्राजवळ म्हणाले होते.

साहित्यसुवर्णाच्या कोंदणांत बसविलेला भाषेचा हा तेजस्वी हिरा अनंत पैलूंचा आहे. आणि तो प्रत्येक पैलु उत्कृष्ट रत्न लाभल्याची साक्ष देत आहे. हा हिरा या अनंत पैलूंतून एकाच ध्येयाचीं प्रकाशकिरणें फेंकीत आहे. आपण त्यांतला पैलू न् पैलू निरखून पाहूं या.

गुरुजींनीं आपल्या खऱ्याखुऱ्या जीवनाला शिक्षकाच्या धंद्यापासून सुरुवात केली. मुलांना इतिहास, काव्य इत्यादि विषयांचें जिवंत ज्ञान देतांना त्यांनीं आपली सोपी, मर्मभेदक व सूत्ररूप भाषा कमाविली आहे. ते विद्यार्थ्यांशीं

इतके समरस होत कीं, त्यांना स्थलकालाचें भानहि रहात नसे. इतिहास हा त्यांचा आवडता विषय. देशाच्या कालच्या उज्ज्वल कालांतून ते उद्यासाठीं स्फूर्ति निर्माण करतांना भाषेचा असा विलास करीत व ते त्यांत इतके गुंग होत; भावनाप्रधान होत कीं त्यानीं कथन केलेल्या इतिहासाची उज्ज्वलता विद्यार्थ्यांत तेज निर्माण करी. कविता शिकवितांनाहि ते इतके रमून जात कीं त्यांच्या भावपूर्ण भाषेचा व जोरकस प्रतिपादनाचा विद्यार्थ्यांवर खासच परिणाम होई. तासाची घंटा झालेली असावी. इतर वर्गांतील मुलें 'गुरुजींचा तास कसा नाहीं संपला ?' या कुतूहलाने खिडकीशीं जमावीत, मुलांच्या आणि गुरुजींच्या डोळ्यांत पाणी तरंगत असावे असें अनेकदां घडून येई. शिकविताना मात्र तिसरें माणूस त्यांना खपत नसे. इन्स्पेक्टर किंवा हेड-मास्तर तेथें येऊन उभे राहिले, कीं राजापूरच्या गंगेप्रमाणें त्यांची वाग्गंगा लुप्त होई.

सध्यां ते कोठेंहि शिक्षक नसले तरी त्यांच्यांतला प्रेमळ व भाषाप्रभु शिक्षक आतां जनतेला प्रेमाचे व स्वातंत्र्याचे धडे देत फिरत आहे. त्यांच्या भाषाप्रभुत्वाच्या जोरावरच त्यांचीं व्याख्यानें सरस ठरलेलीं आहेत व ठरतात. त्यांना न बघतां त्यांचें वाङ्मय वाचलें तर हा लेखक कोंवळ्या कातडीचा अन् तेजस्वी हृदयाचा बंगाली बाबू असावा असें वाटेल; कारण त्यांच्या साहित्यांतील सौंदर्यांतून आपण त्यांच्या मूर्तीकडे पाहतों. परंतु गुरुजींना पाहतांच—नुसता दृष्टिक्षेप करतांच आपला अपेक्षाभंग झाल्या-वांचून खचित राहत नाहीं. त्यांच्या व्याख्यानांतून अविरत वाहत असणाऱ्या त्यांच्या उज्ज्वल भाषेच्या ओघाबद्दल एक उदाहरण दिलें तरी पुरे.

व्याख्याता पुढें उभा राहिला कीं कॉलेजमधील विद्यार्थी कशाची तयारी करतात हें सर्वश्रुत आहे. ही गोष्ट इतकी परिचयाची झाली आहे, कीं कॉलेजच्या व्यासपीठावर जो अस्खलित भाषण करूं शकेल, तो उत्कृष्ट वक्ता होय अशी वक्त्याच्या गुणांची कसोटीच ठरून गेली आहे. एक दिवस साने गुरुजी पुण्यांतील स. प. कॉलेजच्या व्यासपीठावर जाऊन उभे राहिले. ही बावळीशी मूर्ति पुढें दिसतांच विद्यार्थ्यांना हातीं स्वर्ग आल्यासारखा वाटून प्रत्येकजण त्यांची टिंगल कशी करावी याच विचारांत गढून गेला.

गुरुजींनीं भाषणास सुरुवात केली. त्यांच्या हृदयांतील कळकळीला व प्रेमाला शब्दरूप प्राप्त झालें. त्या प्रेमाच्या सुरावर विद्यार्थ्यांच्या हृदयांत ध्येयाचें संगीत निर्माण झालें. बावळ्या वक्त्याची दहा मिनिटांत वासलात लावणारे विद्यार्थी हावरटपणें गुरुजीचे भाषण जणूं पीत होते. त्यांच्या भाषण-गंगेत सारे विद्यार्थी पोहत होते. गंगेंत झेंप टाकल्यावर कधीं घांटावर लवकर परत यावेंसें वाटतें का ? पिकलेल्या आंब्यांतून रस गळावा, .उमललेल्या फुलातून मध ठिबकावा तसे त्यांच्या शब्दांतून कळकळ व प्रेम हीं ठिबकत असतात. या भाषावैभवानें ते जगताचें हृदय जिंकतील, इतकें तें प्रभावी आहे.

त्याच्या राजकारणावर गांधीजींचा अतिशय परिणाम झालेला दिसून येतो. तसाच त्यांच्या भाषाशैलीवरही गांधीजीचाच परिणाम झालेला दिसतो. त्यांचा शब्द म्हणजे उंसाचें पेरें जणूं. गांधीजींची लिहिण्याची पद्धतहि त्यांनीं उचललेली आहे. अगदीं मोजक्या शब्दांत वेंचक विचार मांडण्याचें कुशल कार्य गांधीजींप्रमाणेंच गुरुजीहि करतात. किती छोटीं वाक्यें. पण किती खोल विचार ! ' आस्तिक ' कादंबरींत कार्तिक नागानंदाला विचारतो;

" आश्रम कां सोडलात ? "

" सर्व ज्ञानाची किल्ली सांपडली म्हणून. " नागानंद उत्तरतो.

" कोणती किल्ली ? " वत्सला विचारते.

" प्रेममय सेवा " नागानंद उत्तर देतो.

किती गोड विचार, किती सत्य विचार, किती खोल विचार !
पण किती थोडे शब्द ! पुढें असेंच कार्तिक विचारतो; " तुमच्या आईनें आणखी काय शिकविलें तुम्हाला ?"

" दुसऱ्यासाठीं मरायला. दुसऱ्यासाठीं श्रमायला." नागानंद सांगतो.

इतक्या मोजक्या शब्दांत जीवनाचें इतकें सुंदर तत्त्व दुसरीकडे कोठेंहि गोंवलेलें सांपडत नाहीं. तत्त्व किती सुंदर. पण तितकेंच समजणें कठीण. परंतु गुरुजींनीं अवघ्या दोन शब्दांत जीवनाचें सारें यश आणून ओतलें आहे. असंख्य पुस्तकें वाचून, अनेक व्याख्यानें ऐकून देखील जें समजलें नसतें तें तत्त्व गुरुजींच्या दोन वाक्यांनीं उलगडून टाकलें. ही पद्धत गांधी-जींची. त्यांचे सर्व पत्रव्यवहार पाहावेत, सारे लेख वाचावेत; शब्दांची उधळपट्टी नाहीं, विचारांचा कंजूषपणा नाहीं. त्याशिवाय आणखी एक विशेष

गांधीजींपासून गुरुजींनी उचलला आहे. तो म्हणजे मौनाबद्दलची आवड. आपल्या भाषेंतील श्रद्धा हींहि त्यानीं गांधीजीपासूनच घेतलीं आहेत. अभ्यासूंनीं रा. गोपीनाथ तळवलकरांचा गांधींच्या भाषाशैलीवरील लेख वाचून गाधीजीचें अन् गुरुजींचे भाषावैशिष्टय तुलनात्मक रीतीनें अभ्यासल्यास वरील विधानाची सत्यता पटेल. उत्तर हिंदुस्थानातील सुपीक व समृद्ध पठारावरून एकप्रवाहाने वाहणारी गंगा गंगासागराला मिळतांना अखेर 'बहुवदना' होते, तशी गुरुजींची प्रेमळ व समृद्ध वाक्गंगा गाधीजींच्याच एका भावश्रद्धेच्या प्रांतांतून जात असली, तरी जनसागराला मिळतांना ती बहुरूपवती होते हें अवश्य लक्षात घेतलें पाहिजे. गुरुजी खान्देशचे प्रतिगांधी. डाव्या हातानें खानदेशचा कापूस पिंजून ते उजव्या हातातील लेखणीनें खान्देशचें जीवनवस्त्र विणीत आहेत. आणि मुखांतील प्रभावी मंत्रांनीं ते त्या वस्त्रात रंग भरीत आहेत.

गुरुजींच्या जीवनावर, वाङ्मयावर आणि त्याचप्रमाणें त्यांच्या भाषाशैलीवर परिणाम करणारा दुसरा महात्मा म्हणजे विनोबाजी भावे. सेवादलासाठीं लिहिलेल्या 'विनोबाजी भावे' या चरित्ररूप पुस्तकांत ते स्वतःच म्हणतात कीं, 'विनोबाजी माझ्या जीवनात खोल शिरले आहेत.' विनोबाजी शेतकऱ्यांना अहिंसात्मक प्रचार शिकवितांना म्हणतात, "तुम्ही सावकाराला सांगा, आम्ही तुझें कर्ज देऊं पण तें कर्ज फेडून टाकायला मी आणि माझीं मुलेंबाळें जगतील इतकें मला खाऊं दे !" गुरुजींनीं आपल्या 'धडपडणारीं मुलें' या पुस्तकांत हेंच सांगितलें आहे कीं, "आपण सावकार व सरकार याना सांगितलें पाहिजे, 'महाराज, तुमचें देणें आहे खरें; पण तें देण्यासाठीं मी जिवंत तर राहिलें पाहिजे ? मला आधीं जगूं दे. माझीं पोरेंबाळें जगूं दे." गांधीजी हे गुरुजींचा 'आदर्श' आहेत, तर विनोबाजी हे त्यांचे गुरुजी आहेत.

गुरुजींच्या साऱ्या वाङ्मयावरच विनोबाजी भावे यांचा परिणाम झालेला आहे. त्यांच्या वाङ्मयांतील सुबोधता ही विनोबाजींची देणगी. एकदां असें झालें कीं, गुरुजींनीं विनोबाजींना आपल्याजवळ बरेंचसें लिखाण पडलेलें आहे म्हणून सांगितलें. विनोबाजी म्हणाले, 'पण उपयोग काय ? तें लिखाण

वाचावयास साक्षर लोक कितीसे आहेत ?' या प्रसंगानें गुरुजींची दृष्टि बदलली असावी. निदान आपले लिखाण कोणी वाचून दाखविल्यास तें दुसऱ्यास सुंदर रीतीनें समजावे म्हणून भाषेचा बोजडपणा व विद्वत्तेचे तिच्यावर पडलेले ओझे त्यानीं काढून टाकले व बहुजनसमाजासाठीं सरळ, साधी व सुबोध भाषा लिहावयास त्यानीं सुरुवात केली. 'नामदार गोखले यांचें चरित्र' व त्याच्या सध्याच्या वाङ्मयकृति याची भाषिक तुलना केल्यास ही गोष्ट आपल्या नजरेत भरल्याखेरीज राहत नाहीं.

अतिशय भावनाप्रधान वृत्तीने त्यांच्यात संयम राहावा तितका राहत नाहीं. त्याच्या हातातील लेखणी व टकळी यात फारसा भेद नाहीं. टकळी सूत कांतीत राहते व लेखणी लिहीत राहते. एकाद्या विषयावर गुरुजी लिहूं लागले, म्हणजे पानेंच्या पाने लिहीत जातात. कोणत्याहि ग्रंथप्रकाराच्या तंत्राला झुगारून देऊन ते सारखे लिहीत राहतात. मग त्यापायीं विषयातर होवो अगर ग्रंथविस्तार होवो, किंवा कांहींहि होवो. वाक्यामागून वाक्यें जणूं धांवत येतात त्याच्चीं. त्यांच्या स्फूर्तीला पूर आला कीं त्याला कसलाहि बंध घातलेला त्याना चालत नाहीं. ते म्हणतात, 'मला राहवत नाहीं म्हणून मी लिहितों.' या वाक्यात त्याच्या भाषेच्या ओघाचें रहस्य सापडेल. संयम नाहीं, म्हणूनच त्याची भाषा ओघवती आहे जणूं.

सूत्रपद्धति हा त्याच्या भाषेचा आणखी एक विशेष आहे. हीं रूपकबद्ध सूत्रें गुरुजींच्या वाङ्मयांत सर्वत्र विखुरलेलीं आढळून येतील. हृदयांत कोरून ठेवण्याजोगीं ही सुंदर सूत्रें म्हणजे गुरुजींचा अत्यंत आवडता भाषाविशेष. 'गायत्री मंत्र देणे म्हणजे नवीन जीवन देणें.', 'हिंदुधर्म म्हणजे होम;' 'स्त्री म्हणजे मूर्तिमंत कर्मयोग;' 'महात्माजी म्हणजे भारताचें लेणें.' अशीं हीं असंख्य सुंदर सूत्रें गुरुजींच्या वाङ्मयांत आपणांस सर्वत्र आढळून येतात. हीं सूत्रें हीच गुरुजींची शिकवण. बाकीचा सारा लेखनविस्तार म्हणजे या सूत्रांचें स्पष्टीकरण. या त्यांच्या सूत्रबद्ध वाक्यांमुळेंच असे म्हणतों कीं,गुरुजींजवळ शब्दांची उधळपट्टी नाहीं. तर त्यांच्या शिक्षकवृत्तीला साजेलसें त्यांनीं केलेलें स्पष्टीकरण पाहतां पाहतां त्यांच्यांत संयम नाहीं असें मी म्हणतों. या दृष्टीनें पाहिल्यास त्यांच्या भाषाशैलींतील सूत्रपद्धति व संयमाचा अभाव या विसंगत विशेषणांची संगति स्पष्ट होईल. याच दृष्टीनें त्यांचा ग्रंथ म्हणजे

स्वतःच्या सूत्रावर केलेले स्वतःचेच भाष्य होय, असे म्हणण्यांत फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं.

गुरुजींच्या भाषेची अजब मोहिनी सर्वत्रावर पडलेली दिसते. अवीट गोडी आहे गुरुजीच्या भाषेत. किती सुंदर लिहितात ते ! छोटी छोटी गोड वाक्ये. " ती नजरेने जणूं त्याला पीत होती." असे गुरुजी लिहितात. 'पीत' हा शब्द सहज नसला, अलंकारिक असला तरी हृदयाला जाऊन भिडतो; कारण फार रसाळ त्याचे शब्द. सहजपणा नाही असे म्हणायला सुद्धां जीभ अडखळते, इतका सहजतेचा आभास जबरदस्त आहे. 'पीत' या शब्दातील त्याचे सहजस्फूर्त काव्य लहान मुलाना सुद्धा समजेल व त्याना अत्यंत आनंद होईल. गुरुजीच्या भाषेत जितका रसाळपणा दिसतो, तितका इतरत्र क्वचितच आढळात येईल. वाक्यरचना व शब्दयोजना अशी की त्यातून रस निर्माण व्हावा. 'वाचं रसोऽनुधावति,' असे गुरुजीच्या भाषेसंबंधीं म्हणता येईल. रसनिर्मितीवर त्याचे अमर्याद प्रभुत्व आहे. या त्याच्या रसाळ भाषेचें रहस्य, मला वाटते, त्याच्या शबरीवृत्तीत आहे. साधीभोळी पण भावमय शबरी. प्रभु रामचंद्राला भक्तीचा नजराणा द्यावयाचा म्हणून रानांतून बोरें गोळा करी. प्रभु रामचंद्राला बोरे आंबट लागूं नयेत म्हणून ती तीं चाखून पाही. रसाळ व गोड तेवढेच साठवी. गुरुजींचेहि जणूं असेच आहे. जनताजनार्दनाची पूजा करतांना नैवेद्यासाठी वेंचलेला प्रत्येक भाव जणूं ते चाखीत. ज्यात रसप्रचीति होईल, तेवढे वेचक रसबिंदू त्यानी त्याच्या हृदयाच्या घड्यांत सांठवले व पूजा करतांना तो घडा जनताजनार्दनापुढे रिता केला. त्या वेळीं त्यांचा प्रत्येक रसपूर्ण भाव शब्दस्वरूप झाला. म्हणून गुरुजींचें साहित्य इतकें रसाळ.

गुरुजींचें अफाट वाचनहि त्याची भाषा धीरगंभीर व समृद्ध करावयास कारणीभूत झालेले आहे. वेद, उपनिषदें, गीतादि संस्कृत ग्रंथाचे तर त्यानीं वाचन केलेंच आहे; परंतु इतर भाषातील बरेंच वाङ्मय व आपल्याकडील संतवाङ्मयहि त्यांनीं अवलोकिलें आहे हे स्पष्ट दिसते. आपल्या लिखाणातून मधून मधून अवतरणें पेरण्याची गुरुजींची संवय या वाचनामुळेच दृढमूल झाली असावी असें वाटतें. 'तमसो मा ज्योतिर्गमय,' 'कृषिमित् कृषस्य,' 'मा विद्विषावहै !' वगैरे संस्कृत अवतरणें त्यांच्या ग्रंथांत बरींच दिसून येतात.

तुकारामाचे अभंग, उत्कृष्ट काव्यपंक्ति, गीताईमधील श्लोक वगैरेंचाहि गुरुजी अवतरणासाठी सढळ हातानें उपयोग करीत असतांना दिसतात. लिहितांना कांहीं प्रसंगी ते सबंधच्या सबंध कविता सुद्धां मध्येच लिहून टाकतात. आणि अशी बहुतेक गाणीं भावना अतिशय पराकोटीला गेली असताना म्हटलेलीं आहेत असें आढळून येते. जुन्या नाटकाप्रमाणे तीं अर्ध्या गोष्टी पद्यरचनेत सागण्यासाठीं नसतात किंवा हल्लीच्या सिनेमाप्रमाणे केवळ मनोरंजनासाठी नसतात; तर त्यात स्वराचे सामर्थ्य आढळून येतें. जेव्हा भावना अतिशय आर्त होतात, त्या वेळी गुरुजींची वाणी आपोआप आर्त स्वरात आळवणी करूं लागते. त्यातील शब्दांकडेहि ते तेव्हां लक्ष देत नाहींत. ती कविता नुसती तर आपल्याला परिणामकारक वाटत नाहीं. तितकीशी आवडतहि नाही; पण प्रसंगाने वाढवलेल्या आर्ततेत जेव्हा आर्त स्वराची भर पडते, तेव्हां मनात ती हलकल्लोळ निर्माण केल्याखेरीज राहत नाहीं. 'क्राति 'मधील मोहनने कामगाराच्या संमर्दापुढे म्हटलेले गीत, किंवा अनंतत्वाकडे जाताना म्हटलेला क्रातीचा पाळणा काव्यकसोटीने कदाचित् कमी दर्जाचा ठरला, तरी 'क्राति' पुस्तकात त्या गीताचा प्रभाव स्पष्टपणें दिसून येतो.

गुरुजीच्या शृंगाराच्या कल्पना जगापेक्षां वेगळ्या दिसून येतात. प्रेमात सेवेखेरीज दुसरें काहीच दिसून येत नाहीं. म्हणून त्यांना शृंगारिक भाषा तितकीशी साधत नसावी असे मधून मधून फार वाटते. त्यांचें स्त्रीपात्र पतीशी बोलतांना ज्या तऱ्हेची प्रेमळ भाषा वापरते, तशाच तऱ्हेची प्रेमळ भाषा तें इतर बांधवांशीं बोलतांना वापरतें. फातमा मैत्रिणीशीं बोलायचें असो, कजाग सासूशी बोलायचे असो, किंवा प्रिय पति जो चारु त्याच्याशीं बोलायचें असो, चित्रा एकाच गोड सुरात बोलते. क्वचित् प्रसंगी त्यानीं शृंगारिक भाषा संस्कृतातून घेतली असावी असें मात्र वाटतें. कारण शृंगारिक वर्णनें करताना आलेली कृत्रिमता संस्कृतातील वाटते. " त्यानें तिला जवळ ओढले व आपले ओठ तिच्या ओठावर टेकले. " असल्या तऱ्हेचा प्रचलित उत्तानशृंगार गुरुजीजवळ नाहीं. त्यांचा शृंगार सेवामय आहे. त्यामुळें त्यांचीं पात्रें फार सद्गुणी वाटतात. इतकें जरी खरें असलें, तरी माया–रामदासचा शृंगार या सर्व आक्षेपांना उत्तर देणारा आहे.

क्वचित् प्रसंगीं इतका गोड शृंगार आढळत असला, तरी तो अतिशय परिणामकारक आहे. "महामायेच्या महादेवा" असें संबोधून मायेनें रामदासला लिहिलेले पत्र, किंवा महाराष्ट्रात संसार थाटल्यानंतरचा तिचा गोड शृंगार शृंगाराच्या सर्व कल्पनांनाहि मागे टाकील, अशा तऱ्हेचा उत्कृष्ट व श्रेष्ठ दर्जाचा आहे.

गुरुजींच्या भाषेत संयम नाही म्हणून सूचकता नाहीं. एकादीच चमक दाखवून बघणाऱ्यात कुतूहल निर्माण करणारा तो जादूगार नाहीं. जीवनाचा प्रत्येक रंग, जगातील प्रत्येक सौंदर्यतरंग रंगवणारा एक महान् चित्रकार आहे तो. गुरुजी समाजाचे शिक्षक. प्रत्येक शब्दाचा अर्थ समजून सांगावा, प्रत्येक कल्पना विशद करून सांगावी, तशी प्रत्येक गोष्ट गुरुजी समाजाला समजावून सांगत असतात. एकादी उपमा दिली, एकादे रूपक दिले, तर तेथेंच नाही ते थांबणार. अशा वेळी त्याना सूचकता मानवत नाही; ते सारी उपमा तेथल्या तेथें स्पष्ट करून सांगतील. 'नदी सर्वांची जननी' असें म्हणून गुरुजी थांबणार नाहींत. 'आई मुलाची घाण काढते, नदी जगाची घाण वाहून नेते...' अशा तऱ्हेचें गुरुजींचें व्याख्यान सुरू होईल.

या सूचकतेच्या व संयमाच्या अभावामुळें किंवा वक्तृत्वाच्या आवडीमुळे म्हणा गुरुजींच्या प्रत्येक ग्रथात एका तरी व्याख्यात्याचें पात्र आलेलेंच आहे. बहुधा सारींच पात्रे पुष्कळ वेळा लाबलचक व्याख्यानें देतात. नाहीं तर एखादा व्याख्याता तरी येऊन व्याख्यान देऊन जातो. गुरुजी स्वतः उत्कृष्ट बोलणारे असल्यामुळे त्यांच्या ग्रंथांतील हीं वक्तृत्वपूर्ण भाषणें तंत्राला सोडून असलीं, तरी मंत्राइतकी प्रभावी आहेत. पतीला तुरुंगाची वाट दाखवून, स्वतःला बंगालची थोरवी समजून देणाऱ्या प्रद्योतला माया महाराष्ट्राची थोरवी सागते, त्या वेळीं प्रसंगाचे औचित्य राखलें गेलें नाहीं याचें गुरुजींना, मायेला अगर वाचकालाहि भान उरत नाहीं. त्याच्या ह्या प्रभावी वक्तृत्वामुळेंच असली तंत्रहीन शैली प्रभावी होऊं शकली, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं.

गुरुजींच्या वाङ्मयांत सूचकता नाहीं असें म्हणतांना मी 'आस्तिक' कादंबरी विसरलों नाही. सर्वसाधारणतः सूचकतेच्या भानगडींत ते पडत नाहींत इतकेंच माझें म्हणणें. तसें पाहिलें तर हिंदुमुसलमान, स्पृश्यास्पृश्य,

काळेगोरे, कोणत्याहि दोन संस्कृतींच्या लढ्यावर प्रकाश पाडणारे उत्कृष्ट वाड्मय म्हणजे आस्तिक कादंबरी. त्यांतील आर्य व नाग पक्षाचा इतिहास कोणत्याहि लढ्याच्या इतिहासाला लागू पडेल. आणि तो लढा थांबविण्या-साठीं आस्तिक ऋषीनीं सांगितलेला प्रेमाचा मार्गच कोणत्याहि लढ्याच्या वेळीं योग्य असा मार्ग आहे, असें गुरुजींना सुचवायचें आहे.

हुबेहुब वातावरण निर्माण करण्याची गुरुजींची हातोटी विलक्षण आहे ! कोणत्याहि भागाचें वर्णन करताना प्रादेशिक संस्कृतीचें चित्रण करावयास ते विसरत नाहींत. 'श्यामची आई' या पुस्तकात कोकणची सस्कृति चित्रित करतांना ' बोलूं ' ' पातोळे ' वगैरेसारखे अस्सल कोंकणी शब्द ते वापरतात, तर बंगालचे वर्णन करतांना चैतन्यापासून रवींद्रनाथापर्यंत कोणा-लाहि व तसेच गंगापद्मा यानाहि ते कधी विसरत नाहींत.

त्याच्या भाषाशैलींतील आणखी एक विशेष म्हणजे त्यांची वैशिष्ट्यपूर्ण वाक्यरचना. त्यांच्या वाक्यरचनेत कांही गंमतीचीं वैशिष्ट्ये आहेत. त्यांच्या प्रश्नांतील ' कां ' या शब्दाची जागा विक्षिप्तपणें ठरलेली दिसते. आपण प्रश्न विचारताना सर्वसाधारणतः असे विचारतो, ' समुद्र त्याना बोलावीत होता का ? ' ' त्या आपोमाता असें का म्हणत होत्या ? ' अगर ' बहीण भावावर रुसेल का ? ' तर गुरुजी असें विचारतील, ' समुद्र का त्यांना बोलावित होता ?, ' ' त्या आपोमाता का असें म्हणत होत्या ? ', किंवा, ' बहीण का भावावर रुसेल ? ' गुरुजींच्या वाड्मयातील गोडी या वाक्यरचनेंत आहे. त्याचप्रमाणे कधीं कधीं वाक्यांत कर्ता तोच ठेऊन क्रियापद अगर विशेषण बदलत जाणें हा त्याचा एक आवडता छंद आहे. ते म्हणतील, " गांधीजी म्हणजे महान् तपस्या. गांधीजी म्हणजे अनासक्ति. गाधीजी म्हणजे जीवना-वरील भाष्य. " किंवा " नदी म्हणजे जगाची जननी. नदी म्हणजे जगाचा जीवनाधार. नदी म्हणजे परमेश्वराची झुळझुळ वाहणारी दया. "

त्यानंतर ' हो ' हा शब्द त्यांचा फार आवडता. 'होय हो, चारु, ' 'करीन हो तें, ' ' खरें हो.' असली वाक्यें विशेषतः ' चारू नि चित्रा ' या पुस्त-कांत फार आढळून येतात. दुसरें, दोन विरोधी वाक्यें जवळ ठेवून आपली भाषा परिणामकारक करण्यांत त्यांचा हातखंडा आहे. ' रामाचा शेला '

या पुस्तकांत ते म्हणतात, " शेटजी आज तुम्ही हंसा; उद्यां तुम्ही रडाल; सरले, आज तूं रड; उद्यां तूं हंसशील." 'करुणादेवीं'त करुणतेनें बाधलेल्या समाधीविषयींचें असल्या तऱ्हेचें वाक्य किती परिणामकारक आहे पहा. 'अश्रूंची आरसपानी समाधि हृदयागणांत बाधतां येईल; परंतु जगाच्या अंगणांत दगडाधोंड्यांचीच समाधि हवी.' असल्या तऱ्हेनें विरोध अलंकाराचा (Anti-thesis) उपयोग वाचकाच्या मनावर अतिउत्कृष्ट व उत्कट असा परिणाम घडवून आणण्यासाठीं गुरुजींनीं वारंवार उपयोग केला आहे. उपमारूपकादि त्यानी वापरलेले इतर अलंकारहि ठराविक असेच आहेत ! विशालहृदय म्हटलें कीं त्यांना आकाशाची आठवण येते. मुलें म्हटलीं, कीं त्यांच्या डोळ्यांपुढें फुले उभीं राहतात आणि निसर्ग म्हटला, की गुरुजीच्या अलंकार-सागराला अमूप भरती येते.

आपल्या साहित्यातील पात्राना सुद्धा 'गोड' नावे देण्याची गुरुजीना फार हौस. चित्रा, चारू, कार्तिक, माया, मोहन, मधुरी...किती तरी ! ही गोड नावाची हौस त्याच्या बंगालविषयीच्या प्रीतीतून जन्म पावली असावी. असें 'गोड वाङ्मय' निर्माण करणारा ही गोडी आपल्या वाङ्मयात हरतऱ्हेनें आणण्याचा प्रयत्न करीत होता हे यावरून स्पष्ट दिसून येईल.

गुरुजीचे सर्व साहित्य वाचल्यानतर एक कल्पना झटकन् मनात येऊन जाते, की गुरुजींनी ललितवाङ्मयात जीवनावरील मोठें तत्त्वज्ञान आणून तत्त्वज्ञानवाङ्मयात लालित्य आणले आहे. भारतीय संस्कृतीचे लोण बहुजन-समाजापर्यंत नेऊन पोंचविण्याचे कार्य गुरुजीच्या भारतीय संस्कृतीनेच केले आहे. एवढेच नव्हे, तर लहान मुलाना देखील तीं तत्त्वें समजतील इतक्या सुलभ व मनोरंजक पद्धतीने त्यांनी ती मांडलीं आहेत.

'राजा, आर्यांचा विष्णु व नागाचा सहस्र फणाचा नागदेव, येऊं देत दोन्ही दैवतें एकत्र. देव एकत्र आले, कीं भक्तही एकत्र येतील. शेषशायी भगवान् आपण निर्माण करूं. देवाचे वैभव वाढवूं. शेषाच्या आधारावर असलेला विष्णु. नागांच्या आधारानें जगणारे आर्य. नाग हे येथील. ते पाया आहेत. त्यांची मदत घ्या. सहकार्य घ्या. दोघे जोडीनें जगा. आर्य संस्कृति व नाग संस्कृति एकत्र येवोत. दोहोंची एक नवीनच संमिश्र अशी सस्कृति

होवो. शुभ्र गंगेंत काळी यमुना मिळून जाऊं दे. प्रवाह अधिक विशाल व गंभीर होऊं दे. पुढील पिढयांना आदर्श घालून ठेवा.'

अनेक राजकीय पक्ष काढून, हजारों व्याख्यानें देऊन जें पटावयाचें नाहीं तें सानेगुरुजींनीं किती सुंदर तऱ्हेनें पटवून दिलें ! त्यांच्या प्रबंधातील लालित्य पाहावयाचें असल्यास 'भारतीय संस्कृति' मधील कोणतेंहि पान उघडून वाचावें. त्यानीं तत्त्वज्ञानच बालबोध भाषेंत आणलें असें नाहीं; तर सर्व प्रौढ वाङ्मयात बालबोधता आणली व बालवाङ्मयात प्रौढता आणली. 'सोन्याची सावळी' ही बालगोपालासाठीं लिहिलेली गोष्ट. त्यांतला चिमुकला राजपुत्र सावत्र मातेला म्हणतो, " इतके दिवस माझे प्राण तूं गळ्यातल्या ताईतासारखे वागवलेस. आतां नको दूर जाऊंस. " प्रौढानाहि समजणें कठीण व अंगी आणणे कठीण असें शत्रूलाहि प्रेम देण्याचे तत्त्व बालवृत्तीला, निष्पापपणाला धक्का न लावता त्यानी लहान मुलाना शिकविले आहे. आणि तेहि अत्यंत सोप्या भाषेत. तितकीच बालबोधता त्यानीं आपल्या कादंबऱ्यात आणिली आहे. कादंबऱ्या हा वास्तविक मुलाचा प्रात नाहीं; परतु गुरुजीच्या 'श्यामची आई', 'श्याम', 'धडपडणारी मुले' इत्यादि कादंबऱ्या मुलालाहि गोडी लावतील व त्याना मनोरंजक पद्धतीने शिक्षण देतील अशा आहेत. बालगोपालाना अनेक गोष्टी सागून प्रत्येक गोष्टीतून मुलाना उत्कृष्ट वळण लावण्याचा ज्याप्रमाणे मोठ्या माणसाचा उद्देश असतो, त्याप्रमाणें आपल्या शब्दाशब्दातून विश्वाला मागल्याकडे नेण्याचा ते सारखा प्रयत्न करीत आहेत. आणि तोहि अस्तित्वात असलेलीं सर्व तंत्रें झुगारून. 'रामाचा शेला' या नाटकाची त्यानीं लीलया कादंबरी करून टाकिली; त्याच्या वाङ्मयात तंत्र नसले तरी मंत्र खासच आहे. किंबहुना हें मंत्राचे–जादुगिरीचे-नवे तत्र त्यानीं निर्माण केले आहे असे म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही. परंतु त्याच्या या वृत्तीमुळे त्याच्या वाङ्मयात पुनरुक्तीचा दोष आलेला आहे. एक पुस्तक वाचून गुरुजींच्या हृदयाचें पूर्णतया आकलन होऊं शकतें. त्यांच्या पुनरुक्तीमध्यें जबरदस्त आकर्षकता आहे हेहि तितकेंच खरें.

गुरुजी व्यक्ति म्हणजे मूर्तिमंत विनय. डोळे वर करूनहि ते दुसऱ्याचा कधी मानभंग करणार नाहींत. रस्त्याने जाताना सुद्धा इतराना जागा राहावी, हातून उद्धटपणा होऊं नये म्हणून रस्त्याच्या एका कडेनें अगदीं अंग चोरून

हे चालत असतात. जणूं सारा रस्ता अडविणारी अवाढव्य आकृति आहे त्यांची. हाच विनय त्याच्या भाषेत डोकावीत असतो. उद्धटपणाचें अगर दुष्टपणाचें वर्णन करतांनासुद्धा त्याची विनयवती भाषासुंदरी उद्धट होत नाहीं. मर्यादा सोडून एकहि शब्द बोलत नाहीं. 'यति की पति' या कादंबरींतील सुमुख कठोर रंगविण्याचा त्याचा मानस. पण त्याच्या सहृदय कुंचलीनें त्यांच्या कुरूपपणावर आच्छादन टाकलें एवढेच नव्हे, तर त्यात विजयाला तुरुंगातून सोडविण्याचा सुमुख जो प्रयत्न करतो, त्यामुळें त्यांच्या चित्रात रम्यता आली आहे. त्याचप्रमाणें ते सर्व गोष्टींत उदात्तता पहात असतात. समुद्र, आई, नदी वगैरे रसाळ विषयांवर तर ते उदात्त काव्य करतील यांत आश्चर्य नाहीं; परंतु अतिशय क्षुल्लक बाबतींत देखील त्याना उदात्तपणा आढळून येतो.

त्यांच्या भाषांतरित वाङ्मयाकडे आपण नजर टाकली, तर आपणास सहज दिसून येईल कीं, या भाषातराची भाषा गुरुजींचीच आहे. त्यानीं अनेक देशांतील वाङ्मय वाचावयाची आपणांस संधि दिलेली आहे. व्हिक्टर ह्युगो, अलेक्झँडर डयुमास, मॅटर्लिंक वगैरे परदेशीय लेखकाच्या लेखनकृति त्यानीं भाषातरित केल्या आहेत. चीनमधील एका कथेवरून त्यांनीं 'करुणादेवी' लिहिली. विश्वकवि गटेच्या, 'फाउस्ट'वरून 'नदी शेवटीं सागराला मिळेल' ही कथा लिहिली. टेनिसनच्या 'इनॉक ऑर्डन' वरून 'तीन मुलें' ही कादंबरी लिहिली, 'ला मिझरेबल' वरून 'दुःखी' ही कथा लिहिली. त्याचप्रमाणें भगिनी निवेदिता, महर्षि टॉलस्टॉय ह्यांचे ग्रंथहि त्यांच्या दृष्टींतून निसटले नाहींत. अनेक प्रांतांतील गोष्टी त्यांनी मराठींत आणल्या व तसें करीत असतांना एक गोष्ट स्पष्ट आहे की, गुरुजी हें वाङ्मय आपल्या भाषेंत आणतांना आपलें व्यक्तिमत्व त्यात ओतल्याशिवाय राहिले नाहींत. गुरुजींच्या स्वतंत्र वाङ्मयांत व भाषांतरित अगर रूपांतरित वाङ्मयांत भाषेच्या दृष्टीनें किंचितहि फरक नाहीं. शिकवणुकीच्या दृष्टीनें तर फरक नाहींच नाहीं. सारें भाषांतर इतकें सफाईदार आहे, कीं या कथा आपल्या देशांतील नव्हेत असा संशयहि येत नाहीं. अत्यंत भिन्न अशा संस्कृतीमधील वाङ्मयाला आपल्या भाषेचा पेहराव देणें हें अत्यंत अवघड काम आहे. गुरुजींनीं पेहराव तर कुशलतेनें बदललाच;

पण त्यांत आपल्या देशाचा आत्माहि ओतला. गुरुजींच्या भाषांतराचे महत्त्व आहे तें यामुळेंच. परदेशची सुंदर कलमे मराठी जमिनीत उत्कृष्टपणें फोंफावून फुलणें शक्य असतें हे पाहून कोणास आनंद होणार नाहीं? मराठी जमीन सुपीक व कसदार असल्याचा महाराष्ट्रीयाचा अभिमान अधिकच दुणावेल त्यामुळें. 'निळा पक्षी' या त्यांच्या भाषांतरित नाटकात लालित्य नाहीं, पण प्रत्येक शब्द कळकळीनें व तळमळीनें बोलल्यासारखा वाटतो. रसोत्कर्ष, स्वभावरेखन वगैरे त्यांच्या कलेचे ध्येयच नाहीं; त्यांनीं उपयोजिलेले संवाद कधीं कधी छोटे आणि ठसकेबाज, तर कुठे लांबलचक व आवेशपूर्ण. संवादातून प्रसंग निर्माण करणें, स्वभाव बाधीत जाणे, या भानगडींत ते पडत नाहींत; त्यांच्या नाट्यवाङ्मयांत प्रसंग आणि स्वभाव प्रधान नाहींतच. कथन हे जास्त महत्त्वाचे. इतर वाङ्मयाचे सुद्धां तसेच. पण बाकीचें वाङ्मय फार लालित्यपूर्ण असल्याने संवाद तंत्राच्या दृष्टीनें उद्देशरहित असले, तरी त्यात अपार गोडी आहे.

गुरुजींच्या कादंबरी, कथा, बाल, किंवा सर्वच वाङ्मयातून संवादास भरपूर वाव दिलेला दिसून येतो. या संवादातून बोलणाऱ्याची स्वभाववैशिष्ट्यें प्रतीत व्हावयास पाहिजेत तशी तीं होत नाहींत. पण एक गोष्ट मात्र चट-कन डोळ्यात भरते. गुरुजींचीं सारीच पात्रें कोवळ्या व काव्यमय अंतः-करणाचीं दिसून येतात. या संवादांनी कथा–ओघास क्वचित् प्रसंगीं अड-थळा मात्र भरपूर होतो. हे सर्व संवाद वाचण्यास मात्र गोड वाटतात– कारण बोलूनचालून भावगीतेंच ती.

ह्यातील वाक्ये सुरुवातीस अगदी छोटी छोटीं असतात, भावनामय अस-तात. पण संवाद जसजसा लांबत जातो तसतशी त्याच्यातील सुबोधता, भावना हीं नाहींशीं होऊन त्याची जागा काव्यमयता, दुर्बोधता पटकावितात. श्री. खांडेकरांच्या संवादात अथपासून इतिपर्यंत काव्य आणि बुद्धिप्राधान्य हीं दिसून येतात. भावना ही बुद्धीची दासी आहे असे वाटूं लागते. तीच गोष्ट गुरुजींच्या लिखाणातील संवादात शेवटीं शेवटी मात्र आढळते आणि बंड-खोर बुद्धि भावनेच्या लगामाला न जुमानता अवखळपणें दौड करूं लागते. ह्यासाठीं एकच उदाहरण पुरे. 'करुणादेवी' पुस्तकांत दीपोत्सवाचा साधा प्रसंग आहे. त्यांत हेमा म्हणते, "आज रात्री राजधानीत दीपोत्सव आहे.

तुम्ही पाहायला जाल ? " शिरीष उत्तरतो, " हृदयात अंधार असेल तर बाहेरचे दिवे काय कामाचे ? " अशी रूपकात्मक, काव्यमय भाषा ठिक-ठिकाणीं आढळून येते. साधारणपणें नेहमींच्या बोलण्यात दोन प्रेमी जीव असल्या तऱ्हेची गहन रूपकात्मक भाषा बोलणें संभवनीय नाही. त्याचप्रमाणें काही ठिकाणी दुसरा एक दोष संवादात ठळकपणे आढळतो. शंकराच्या जटेतून निघणाऱ्या भागीरथीचा ओघ सुरुवातीस करंगळीएवढा जाड असतो, तर सपाट मैदानावर आल्यावर तिचे पात्र विशाल होतें; त्याच-प्रमाणे छोट्या छोट्या वाक्यानी सुरू झालेले सवाद लेखनाच्या भरात कृत्रिम व व्याख्यानरूप होतात. विस्तारभयास्तव याचीं उदाहरणें मी देत नाहीं. परंतु भाषेच्या अपार गोडीमुळे हे सारे संवाद हृदय हालवून सोडतात.

विनोद ही एकच गोष्ट अशी आहे, की जी गुरुजींच्या वाङ्मयात फारशी सांपडत नाही. गुरुजीजवळ अश्रु अनंत आहेत. दारिद्र्यासाठीं ते आक्रोश करतील, दुःखी लोकाच्या अश्रूंकडे पाहून ते तळमळून रडतील. लोकाच्या प्रेमामुळे ते कृतज्ञतेने अश्रु ढाळतील. परमेश्वराकडे पाहून भक्तीने त्याला अश्रूची फुले वाहतील. अश्रूंचे सारे प्रकार गुरुजी जाणतात. पण हास्याचा एकच प्रकार त्याना माहित. गुरुजी पोट धरधरून कधी हंसायचे नाहींत, हंसवायचे नाहीत. टिंगल करून दुसऱ्याला हंसणे गुरुजींच्या बाबतींत तर अगदीच अशक्य. गुरुजींना एक हंसणे माहित. मुलानीं आईकडे पाहून हंसावे, भक्ताने परमेश्वराकडे पाहून स्मित करावे, किंवा फुलानी रसिका-कडे पाहून मंदमधुर हंसावे, तसं गुरुजी हंसतात. तितकेच गुरुजी हंसवि-तात. गालाला अस्पष्ट खळी पडून परत दिसेनाशी व्हावी, हृदयात मात्र अपार आनंद असावा, बस्स ! एवढेच त्याचें हंसणे व हंसविणे.

'काव्य' हा तर त्याच्या लिखाणाचा आत्माच आहे. काव्याच्या राग-दारींत परमेश्वराच्या आनंदमय स्वरूपाला त्यानीं आळविलें आहे. क्वचित् प्रसंगीं गुरुजी, 'मी पापी, मी अविचारी' म्हणून परमेश्वराची करुणा भाकतात. कधीं, " मी अतिशय दुःखी आहें, माझे अश्रु मला आवरत नाहींत, मला हासव " असेहि परमेश्वराला विनवितात. तर केव्हा, " सर्व निसर्ग तुला खेळायला दिला आहे, तेव्हां हंस रे माझ्या मुला " अशी जणूं परमेश्वर त्यांची समजूत घालीत आहे अशी त्याची कल्पना होते. काव्यांतून

‘ आपण सारे एक आहोंत, द्वेष सोडूं या ’ म्हणून ते जनतेला समजावित आहेत. ‘सत्याग्रही’ हें त्यांचें खंडकाव्य करुण असलें तरी इतर काव्यापेक्षां मला रुक्ष व वादविवादमय वाटतें. वृत्ताच्या बाबतींत भावनानुरूप सहजता असली, तरी समृद्धता नाही. ‘हंस रे माझ्या मुला’ किंवा ‘धीरे धीरे हांक गाडी’ अशासारखी कांहीं रसानुरूप वृत्ते आहेत; परंतु त्यात चित्रविचित्र प्रकार नाहीत. ‘प्रभु सतत मदंतर हासूं दे’ सारख्या कांहीं गेय कविता आहेत; किंबहुना असेहि म्हणतां येईल, कीं त्याच्या काव्यात शब्द-माधुरी कमी असून स्वराच्या सामर्थ्यावर त्याच्या कविता भावपूर्ण ठरतील. त्याच्या नवीन गद्य कृति ‘पत्री’ पेक्षां खास जास्त शब्दमधुर आहेत. त्याच्या गद्यकृती जितक्या हृदयाला जाऊन भिडतील, तितक्या पत्रीतील कविता भिडणार नाहीत. काव्यातील भाषेला आणि भावनेला ओघ मात्र चागला आहे. कोठेंहि अडखळून पडल्यासारखे वाटत नाहीं. मोठमोठ्या शब्दाचे डोंगर फारसे वाट अडवून उभे नाहीत. क्वचित् ठिकाणी संस्कृत शब्दाचा मोरोपंती थाट असला, तरी बहुधा साधासुधा भाव, तितकेच साधेसुधे शब्द आहेत. कल्पनाची अनंतात भरारी नाही. अतिशय वास्तवपूर्ण कविता व त्याला साजेलशी भाषा. त्याच्या राष्ट्रीय भावना इतक्या जागृत आहेत, की त्याच भावनाची ते आपल्या एकूण एक कृतीतून पखरण करीत असतात. महाराष्ट्राविषयीं खालील उतारा किती मनोरम व किती तेजस्वी आहे पहा !

“ महाराष्ट्र दिलदार आहे, उदार आहे.. सेवा करून महाराष्ट्र बोलणार नाही. पराक्रम करून जाहिरात देणार नाहीं. मुळशीचा दिव्य लढा हिंदुस्था-नात कोणाला माहित आहे ? या लढ्यात अंगावर पडलेले पाणी मायबहि-णींनीं गुलाबपाण्याप्रमाणे मानले. परंतु तो अपार त्याग हिंदुस्थानाला माहीत नाहीं. महाराष्ट्राने त्याचीं पुस्तके लिहून सर्वत्र नेली नाहीत. [illegible] माझा महाराष्ट्र आहे. मुकेपणाने तो शोभतो. इतराच्या वैभवात आनंद मानील. मुकाट्याने आपण बलिदान करील. माझ्या महान् महाराष्ट्राला, मर्यादाशील महाराष्ट्राला एक स्वातंत्र्य असले म्हणजे बस्स आहे. मग तो हुरडा हातावर चोळून खाईल व देवांच्या अमृताला तुच्छ मानील. कोंड्याची

भाकर खाईल व पहाडांत सिंहाप्रमाणें हिंडेल. अंगावर चिंधी घालून सम्राटाला हंसेल. फाटकी झोपडी मयुरासनाहून मोलाची वाटेल.''

त्यांचीं निसर्गवर्णनेंहि अशींच हृदयाची पकड घेतात. इतर लेखकांच्या लेखनांतून निसर्गवर्णन आलें, कीं पानें उलटून टाकणारा वाचक गुरुजींच्या निसर्गवर्णनांत अगदीं नकळत रमतो. वास्तविक अनेक वेळा त्यात विषयांतर असतें व लांबलचक वक्तृत्व त्यांत स्पष्ट दिसतें. पण गुरुजींच्या मोहक भाषेच्या प्रभावानें वाचक इतके मंत्रमुग्ध होऊन जातात की, त्यातल्या एकाहि शब्दाची माधुरी चाखावयाची ते सोडीत नाहींत. नदीचे वर्णन म्हटले म्हणजे गुरुजींची रसवंती कशी नाचते पहा. '' नदी म्हणजे देवाची झुळझुळ वहाणारी दया. नदी म्हणजे गांवची आई. नदी कर्मयोगाची जिवंत मूर्ति. तिला आळस माहित नाहीं. विश्रांति ठावी नाहीं. सतत जीवन असे तों ध्येयाकडे दृष्टि ठेवून वाहणे तिला ठावे. आजूबाजूच्या सृष्टीला हंसवीत, फुलवीत ती सगळीकडे धाव घेत असते. नदी वांकडी गेली, कांटयाकुट्यांतून गेली, उच्छृंखलपणानें कड्यावरून उडी घेऊं लागली, तरी ती ध्येयाकडेच जात असते.समुद्राला भेटण्यासाठींच तिचे सारे उद्योग. नदी म्हणजे अमर आशा. नदी म्हणजे आशागीत. ''

समुद्र म्हटला म्हणजे गुरुजीच्या भाषासागरालाहि भरती येते. '' समुद्र म्हणजे एक महान् काव्य आहे. समुद्र म्हणजे महान् संगीत. समुद्र म्हणजे सृष्टीचें रामायण महाभारत...समुद्र म्हणजे मानवी मनाचे प्रतीक तर नाहीं ? मनुष्याच्या मनाचा अंत पार लागत नाहीं. मनुष्याचें मन वरवर उथळ वाटतें. तें हसतें, खेळतें. परंतु आंत प्रचंड लाटा उसळत असतात. मग कधीं शात स्थिर वाटतें, तर कधीं वासनाविकाराचा झंझावात उठून तें प्रक्षुब्ध होतें. या मनांत काय भरलें आहे कुणास ठाऊक ? मनात रत्ने आहेत, मोतीं आहेत, शिंपा आहेत, कवड्या आहेत. मनाला क्षणाची उसंत नाहीं. विश्रांति नाहीं. समुद्राला भरती असो ओहोटी असो, खळखळ तेथें अखंड सुरूच आहे. कोठे आहे त्याचा विसावा ?...समुद्रा, तूं या मानवजातीसाठीं का आक्रोश करीत आहेस ? तूं का ऐक्योपनिषद् शिकवीत आहेस ? येणारे सारे प्रवाह मी जवळ घेतों,

समभावाने वागवतों; त्याप्रमाणे मानवानीं वागावें असे तर तूं नाहीं ना सुचवीत ? तूं सारे प्राणी जवळ घेतोस म्हणून तूं आटत नाहींस, म्हणून तुला मरण नाही. त्याप्रमाणे मानव जर परस्परास प्रेमाने जवळ घेतील, तर मानव-जात टिकेल; नाही तर मानवप्राणी जगातून नष्ट होईल,असें तर नाहीं ना तुला सांगावयाचें ?"

महापुराचें वर्णन करतानाहि त्याच्या भाषेला महापूर येतो. "जिकडे तिकडे पाणीच पाणी. लाललाल नाचणारे भीषण पाणी. फेंस उसळत आहे. लाटा नाचत आहेत. झाडेमाडे मधूनच माशाप्रमाणे वर डोकीं काढून जात आहेत. जणू नद्यानीं हिरव्या पाचूचे दागिनेच घातले होते. हिऱ्याची हिरवीं कुर्डी घातली होतीं. पाणी इतके चढले होते, की मोठमोठी उंच झाडे तींहि बुडून गेली होतीं. जी फारच उंच झाडें, त्याचा काही भाग बुडालेला नव्हता. तीं उंच झाडे रक्ताबर नेसून तपश्चर्या करीत होतीं. त्या झाडाच्या अंगावर बघा मजा. तपश्चर्येंत रममाण झालेल्या त्या तरूंना कशाचेंहि भान नाही. सर्वत्र पाणीच पाणी झाल्यामुळें आज सारे साप बाहेर पडले. त्याचीं बिळें पाण्यानें भरली. आसपासच्या शेकडों मैल टापूंतील तमाम साप, साऱ्या प्रकारचे, साऱ्या रंगाचे पाण्यातून सळसळत येत व झाड दिसतांच त्यावर चढत. भयंकर देखावा. किती रंगाचे हे साप ! सपाट सुंदर मैदानांत इतके का साप राहत होते ?..."

ही सर्व जादुगिरी त्यांच्या भाषेची आहे. अनंत लेखक होऊन गेले, आहेत व होतील; पण साहित्याच्या आकाशात गुरुजींचा तारा अढळ राहील. प्रचलित साहित्यवीरांशीं गुरुजींची तुलना करतांना त्याची विशिष्ट भाषाशैली लक्षांत येईल.

प्रा. फडके हे महाराष्ट्राचे आवडते कादंबरीकार. त्यांची भाषा कोंवळी अन् सौष्ठवपूर्ण आहे, यांत शंका नाहीं. गुरुजींच्या भाषेच्या कोंवळेपणाला तर सीमाच नाहीं. परंतु फडक्यांच्या भाषेचा कोंवळेपणा कमावलेला वाटतो. त्यांत लुसलुशीत शब्दांची मुद्दाम योजना दिसून येते. गुरुजींच्या भाषेचा कोंवळेपणा जन्मजात वाटतो. भावनेच्या पोटीं आलासा वाटतो. क्वचित प्रसंगीं कठीण उपमारूपकांचें पांडित्य फडक्यांच्या कोंवळ्या भाषेला तोले-

नासें होते पण नाजुक करंगळीवर गोवर्धन पर्वत उचलावा, तसें वाटेल तीं जड तत्त्वें, खोलविचाररूपी उपमारूपकाचे जवाहीर गुरुजींची भाषा लीलेनें धारण करते. फडके बुद्धिप्रधान समाजाचे लेखक आहेत. शिक्षित व तल्लख वाचकाच्या मनाची पकड फडके सहज घेतात. गुरुजींचे साहित्य तसे नाही. अर्थात् त्यानी बुद्धिप्रधान वर्गाकडे अजिबात पाठ फिरविली आहे असे नाहीं. तर बुद्धिप्रधान वर्गाला अचूक समजणाऱ्या गोष्टी बहुजनसमाजाला विनासायास समजावून देण्याचा त्यांनी चंग बांधला आहे. गुरुजींची भाषा ही बहुजन समाजाच्या साहित्यसेवनासाठी उत्कृष्ट माध्यम होय. याच्या मुळाशी एक कारण असे आहे, की सहेतुक वाङ्मयाकडे आता वळलेल्या फडक्यांचें बरेंचसे वाङ्मय म्हणजे सुंदर कलेची परिणति होय. तर उलटपक्षीं गुरुजींच्या जीवनाचा हेतु फार वेगळा असून 'साहित्य' हे त्या हेतुपूर्णतेचे साधन म्हणून ते उपयोगात आणीत आहेत, समाजाला शिकवण देत आहेत. फडक्यांप्रमाणेच गुरुजींच्या भाषाशैलीचा उगम त्यांच्या वक्तृत्वांत आहे. फडके हे अतिशय उत्कृष्ट वक्ते आहेत हे प्रसिद्ध आहे. फडक्याच्या प्रत्यक्ष निषेधाच्या सभेंत आचार्य अत्र्यानीहि 'फडक्यानी वक्तृत्वावर सभा जिंकली' अशा तऱ्हेचा फडक्याचा गौरव केलेला आहे. आणि आपल्या वक्तृत्वांतच आपल्या भाषाशैलीचा उगम आहे असे ते स्वतः आपल्या 'साहित्य व ससार' या पुस्तकात म्हणतात. गुरुजींची भाषाशैलीहि त्यांच्या वक्तृत्वातच उगम पावली आहे. आणि आपल्या वक्तृत्वाची हौस ते ऐन ओघात आलेलें कथानक स्थगित करून सुद्धा पुरवितात. पण फरक इतकाच आहे कीं, फडक्याचे वक्तृत्व वकिली बाण्याचे आहे. चलाखपणे विरुद्ध मुद्द्याना बगल देऊन स्वतःचे म्हणणेंच पटवून देण्यांत ते फार पटाईत आहेत. लालित्यपूर्ण शब्दांच्या नादांत अन् उपमारूपकाच्या दडपणात तर्कशास्त्राचा आभास निर्माण करण्यात ते तरबेज आहेत. गुरुजींना असले डावपेंच माहित नाहींत. ते साधेभोळे आहेत. ते एकदम दुसऱ्याच्या हृदयालाच हात घालतात आणि भावनांचा प्रक्षोभ करून हृदय काबीज करतात. बुद्धीला उगाचच फार न चाळवतां ते भावनांचा हलकल्लोळ करून सोडतात.

भावनांचा हलकल्लोळ म्हणतांच श्री. खांडेकरांची स्मृति होणें अपरिहार्य आहे. कारण भावनाविष्कार हा तर त्यांचा विशेष. परंतु वास्तविक अनेक

वेळां ते बुद्धीच्या आहारीं जातात. त्यामुळें भावना बऱ्याच वेळां फोलपट वाटून बुद्धीचेहि प्रदर्शन झाल्यासारखे वाटतें. भावना व बुद्धि याचा बरोबर तोल श्री. खाडेकर याना राखता आला नाही. त्यामुळे त्याच्या भावनाविष्काराने मन नाचूं लागले, तरी त्या नाचात नाचणाराला बेभान करण्याची शक्ति त्याच्यात नाही. परंतु गुरुजींनी आपल्या बुद्धीला शुद्ध भावनेची दासी बनविली आहे. शुद्ध भावाचा प्रसार करण्यासाठी ते बुद्धीची मदत घेतात. एकाद्या तपोनिधि ऋषीने ऋद्धिसिद्धींना कामाला लावावे, तसे गुरुजी बुद्धीला सेवा करावयास लावीत आहेत. राजकारण, स्वदेशप्रीति वगैरेसारखे विषय खाडेकरादींच्या कादंबऱ्यांतून तोंडी [illegible] असतात, तर या साऱ्या पूज्य गोष्टी म्हणजे गुरुजींच्या लिखाणाचा प्राण. प्रचारवाङ्मय किती लालित्यपूर्ण होऊं शकते किंवा ललितवाङ्मय कितपत प्रचारकार्य करूं शकते— प्रचार म्हटल्यावर लोक दचकतील तर—समाजात हृदयपालट करून जागृति करण्याचे कार्य कसे होऊं शकते, याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे गुरुजींचें साहित्य. आणि या सर्व जागृतीच्या कामांत यशस्वी होण्याचे श्रेय त्याच्या भाषेला आहे.

गुरुजींचा सप्रदाय तितक्या उत्कृष्टपणें राखणारा लेखक कदाचित् मिळणार नाहीं. मनानें पूर्णतया गुरुजी झाल्याखेरीज गुरुजींचे शिष्यत्व लाभणें कठीण. म्हणून त्याचा सप्रदाय फारसा प्रभावी निपजावयाचा नाहीं. पण त्याच्या लेखनाचा परिणाम मात्र फार खोल रुजलेला आहे यात शंका नाही.

थोडक्यात सांगायचें झाले तर असें म्हणता येईल, कीं गुरुजींची भाषा सुबोध, ओघवती, अर्थवाही व रसपूर्ण आहे. अवतरणें—प्रसंगविशेषीं सबंध कविताहि—मधूनमधून पेरण्याचा त्याना छंद आहे. वातावरण—निर्मितीसाठीं प्रादेशिक वैशिष्ट्ये ते विसरत नाहींत. वाक्यरचना वैशिष्ट्यपूर्ण आहे. उपमारुपकाचे थोडेसे पण सुंदर अलंकार तिला शोभा देत आहेत. पात्रांना गोड नावें देण्याची त्याना अत्यंत हौस आहे. त्याची भाषा ऊन—पावसासारखी आहे. परस्परविरोधी गुणावगुणाचा त्यात विक्षिप्तपणें मेळ घातला गेला आहे ! गुरुजींची भाषा सूत्रमय आहे असे म्हणतांच त्यांचीं लांबलचक

व्याख्यानें डोळयांपुढे उभी राहतात, तर त्याच्या वाङ्मयांत सूचकता व संयम नाहीं असे म्हणतांच 'आस्तिक' सारखी उत्कृष्ट प्रतीकात्मक कादंबरी डोळयापुढून हलत नाही. गुरुजींचे काही दोष सांगावयाचे झाले, तर गुरुजींजवळ मंत्र आहे पण तंत्र नाही, मधुरता आहे पण विविधता नाही, अश्रु आहेत, विनोद नाहीं, असे सागता येतील.

खरोखर गुरुजींची योग्यता अपार आहे! गुरुजी म्हणजे प्रेमाचा झरा, गुरुजी म्हणजे भावनाची गंगा. गुरुजी म्हणजे भक्तीचा क्षीरसागर. गुरुजी म्हणजे मानवता धर्माची मूर्तिमंत शिकवण. गुरुजी म्हणजे भाषाप्रभु



## विशाल दृष्टिकोन

रा. सानेगुरुजींच्या वाङ्मयांतून त्यांचा दृष्टिकोन शोधावयाचा ठरविल्यानंतर त्यांचे तपश्चर्यामय जीवनच डोळयांपुढें उभे राहतें. त्यांच्या वाङ्मयाकडे एक दृष्टिक्षेप टाकला, तरी त्यांच्या साहित्याचें विशाल क्षेत्र मनाला स्तिमित केल्याशिवाय राहणार नाहीं. त्यानीं कशाविषयीं लिहिलें नाहीं ? बालसेनेसाठीं त्यानीं गोड गोष्टी लिहिल्या, राष्ट्राच्या भावी पिढीसाठीं त्यांनीं निवडक राष्ट्रभूषण झालेल्या मोठमोठया महात्म्याचीं चरित्रें लिहिलीं, भारताच्या सांस्कृतिक जीवनावर लिहिलें; भारतधर्मावर प्रवचनें लिहिली; भारताच्या क्रांतीच्या क्षणातील चित्रपट रंगविला; स्त्रीहृदयाचें सारें काव्य ग्रथित केलें. एवढया या विशाल आणि खोल सागरांत बुडी मारून त्यातील सुंदर तत्त्वरत्नें आपणांस गोळा करावयाचीं आहेत. एखाद्या लेखकाचा दृष्टिकोन त्याच्या लिखाणावरून शोधणे क्वचित् प्रसंगीं घोटाळ्याचें ठरतें; परंतु गुरुजीचें लिखाण इतके पारदर्शक आहे, कीं त्यांत त्यांचें प्रतिबिंब स्वच्छ पडतें म्हणूनच त्यांच्या वाङ्मयातून त्यांचा एकंदर दृष्टिकोन शोधून काढताना इतकेंसें धास्तावल्यासारखें वाटत नाहीं. वास्तविक पाहतां एका वाक्यांत जर गुरुजींचा दृष्टिकोन सांगावयाचा झाला तर माझ्या मतें, “सारें जग ‘सत्य शिवं सुन्दरम्’ या तीन तत्त्वावर चालावे,” असा सांगतां येईल. पुष्कळ वेळा ध्येय एकच असून तें गाठण्याचे मार्ग मात्र भिन्न भिन्न असतात.

आणि पुष्कळ वेळां तेच महत्त्वाचे असतात. म्हणून भारताला–नव्हे सर्वच जगताला–सत्यं शिवं सुन्दरम् या त्रयींकडे कसें व कोणत्या मार्गानें न्यावयाचें याबद्दल गुरुजींच्या काय कल्पना आहेत, हें आपणांस पहावयाचें आहे आणि तसें करतांना आपल्याला त्यांच्या साहित्यावरून एक गोष्ट चटकन् दिसून येईल अन् ती म्हणजे त्यांनीं समाजांतील प्रत्येक कानाकोपऱ्याकडे दक्षतेने नजर ठेवलेली आहे.

## कौटुंबिक

वसुधैव कुटुंबकम् अशा विश्वव्यापक तत्त्वाचे गुरुजी असल्यानें त्यांचा कौटुंबिक दृष्टिकोन खासच महत्त्वाचा समजावा लागेल. कुटुंबाची उभारणी त्यांच्या मतानें प्रीति व त्याग ह्याच्यावर झालेली आहे. घर म्हणजे साऱ्या माणसांचा आधार. साऱ्या जगानें दूर लाथाडलें, तरी आपलें घर आपल्याला प्रेमानें आश्रय देतें. तेव्हा गृहव्यवस्था पैशाच्या जमाखर्चाशिवाय होऊं शकेल पण प्रेमाशिवाय घर धड चालूं शकणार नाहीं असें त्यांना वाटतें. मन कितीही निराश असो, घरांत पाऊल टाकल्याबरोबर दिसणाऱ्या प्रेमळ चेहऱ्यांची, बालवाटींत काढून ठेवलेल्या घासांची अन् भोंवतालीं बागडणाऱ्या पांखरांच्या किलबिलाटाची जादूच अशी अपार आहे कीं, तेथें क्रोधाविष्ट मन संतुष्ट व्हावें, निराश मन आशावादी बनावें, खिन्न मन आनंदित व्हावें. घरांत प्रेम नसेल, तर जीवन अतिशय कष्टमय होईल. ' ही माझी आई, हीं माझीं मुलें, हे माझे भाऊ, हे माझे वडील, ह्या माझ्या बहिणी. ' अशा ममतेच्या शब्दांत सारें दुःख नाहींसें करण्याची फार शक्ति आहे; पण प्रेमाबरोबर त्यागही येतो. किंबहुना त्याग असेल, तरच तें खरें प्रेम असें गुरुजी समजतात. ' मला कष्ट झाले, मला स्वतःला सुख कमी मिळालें तरी हरकत नाहीं पण माझीं सारीं माणसें प्रथम सुखी झालीं पाहिजेत. ' असें प्रत्येकास वाटावयास हवें. ' मी सुखी झालों म्हणजे झालें. ' असें प्रत्येकजण म्हणेल, तर काय अनवस्था प्रसंग येईल ! घरांतील दहा माणसांचीं तोंडें दहा दिशांना होतील. घरांत सुख नांदणार नाही. जीवन असह्य होईल. म्हणून प्रत्येकानें त्याग करावयास हवा. त्यागावर गुरुजींची फार श्रद्धा आहे आणि म्हणूनच मला वाटतें कीं, माता ही त्यांना सर्वश्रेष्ठ वाटत असावी. तुम्ही कांहीही करा,

कसेंही वागा; तुमच्यावर सतत निरपेक्षपणें प्रेम करील, तुमच्या सुखाची सर्वदा चिंता करील व तुमच्यासाठीं अपार कष्ट सोशील अशी एकच व्यक्ति आहे आणि ती म्हणजे माता. तिचें हृदय जणूं त्यागाचेंच बनलेलें आहे. भारतीय संस्कृतीमध्यें त्यागमयी मातेचा अपार महिमा असल्यानेंच गुरुजींना भारतीय संस्कृतीचा फार अभिमान वाटतो. आई म्हणजे वास्तविक कुटुंबाची स्वामिनी; परंतु ती स्वतः निरपेक्षपणें सर्वांची सेवा करते. माता म्हणजे कुटुंबाची उपभोगशून्य स्वामिनी. चार घांस स्वतः कमी खाऊन ती तुमचें पोट भरील. स्वतःच्या दुःखाचे कढ आंतल्या आत दाबून ती तुम्हांस हंसवील. त्याचप्रमाणें घरांतील सर्व माणसांची ती शिक्षिकीण असते. त्याग-सेवामय प्रेमानें सर्व कुटुंब एकत्र कसें बांधून ठेवावें हें आईजवळ शिकावें. ती स्वतःच्या आचरणाने सगळ्यांना धडे देईल. निरपेक्ष प्रेममय सेवा हें तिच्या जीवनाचें ब्रीद. 'संगतीवरून मनुष्य ओळखावा.' अशी एक म्हण आहे. तसेंच म्हणावयाचें झालें, तर प्रत्येक घरांतील आईवरून कुटुंब ओळखावें असेंही म्हणतां येईल. जशी वेल तशीं फुलें; जशी आई तशीं मुलें. उत्कृष्ट माता निर्माण झाल्यानें उत्कृष्ट समाज निर्माण होईल, अशी गुरुजींची मातेविषयींची कल्पना आहे.

पत्नी ही पुरुषाच्या जीवनांत एक अपार शक्ति आहे. ती पतीची सेवा करील, त्याचें मन राखील, पण क्वचित् प्रसंगीं पतीला ताळ्यावर आणण्याचा प्रेमानें पण निश्चयानें, प्रयत्न करील. पतीस कुठें, कसें वळवावें हें पत्नी अचूक जाणते. ती घरांत आहे म्हणून शोभा आहे; पण इतकें झालें तरी दिवसरात्र घरांत बसून राहणारी पत्नी क्रांतीच्या क्षणाला धैर्यानें प्रथम पतीच्या आधीं निश्चयानें बाहेर पडेल. पत्नी पतीस कार्यप्रवण करते, कोण-त्याही कार्यांत त्यांस उत्साह देते आणि वेळप्रसंगीं कार्याची धुरा त्याच्या बरोबरीनें आपल्याकडे घेते.

थोडक्यांत असेंही म्हणतां येईल कीं, आपली जुनी प्रेमळ संस्कृति गुरुजींची जास्त आवडती आहे. घरांत सासूसासऱ्यांपासून गुराढोरांपर्यंत एकत्र व प्रेमानें राहणाऱ्या कुटुंबाचें गोड चित्र त्यांच्या दृष्टीला मोह घालतें. स्त्रीजीवन या पुस्तकांत स्त्रियांनीं आपलीं चितारलेलीं नातीं त्यांना योग्य

वाटतात. मायलेकरांचा गोड जिव्हाळा, भाऊबहिणींचें निर्व्याज प्रेम, पति-पत्नींची निर्भर प्रीति आणि सुखदुःखांच्या बाबतींत कर्मयोग्याप्रमाणें त्यागमय दृष्टि या चार गोष्टींनीं कुटुंबांत खरेंखुरें जीवन येतें असें त्यांना वाटतें. विवाहसंस्था वगैरे कौटुंबिक विषयात येणाऱ्या गोष्टींचा एकंदर समाजस्थितीवर फार मोठा परिणाम होतो. एकंदर कुटुंबसंस्थे-बद्दल त्यांना अत्यंत आदर आहे; एवढेंच नव्हे, तर ती आदर्श कशी होईल याचा त्याना नेहमीं, ध्यास लागलेला असतो. कुटुंबसंस्था नष्ट होऊन दुसरी कोणती सस्था अस्तित्वांत यावी याबद्दल विचार करणारी मंडळी पुरोगामी असे म्हणायचें असलें, तर गुरुजींनीं एकदम पाठ फिरवून जुन्या गोड जीवनाकडे तोंड वळवून घेतलेलें दिसते. या दृष्टीनें ते मुळींच पुरोगामी नाहींत. पण जो द्वेषमय भरभराटीकडे जगताला न नेतां त्यास प्रेममय प्रगतीकडे नेण्याचा प्रयत्न करतो, तो पुरोगामी आणि त्या दृष्टीनें पाहिलें, तर गुरुजी अगदीं सत्यार्थानें पुरोगामी आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. कुटुंबसंस्थेची आदर्श कल्पना पुढें ठेवतांना त्यांनीं सुवर्णमध्य गांठावयाचा प्रयत्न केला आहे.

## धर्मविषयक

राष्ट्रीय जीवन जास्त प्रेममय होण्यास कुटुंबसंस्थेची ज्याप्रमाणें आवश्यकता आहे, त्याप्रमाणे धर्मसंस्था ही मनुष्याला सत्कार्यप्रवण करणारी महत्त्वाची संस्था आहे. जीवन कसें जगवावें हे धर्म शिकवीत असतो. समाजाला चांगल्या जीवनाकडे नेत राहणें हें धर्माचे काम. धर्मावर गुरुजींची अपार भक्ति आहे. गुरुजींच्या कोणत्याहि साहित्यकृतीपेक्षां 'भारतीय संस्कृति' ह्या पुस्तकानें त्यांनीं समाजावर अनंत उपकार करून ठेवले आहेत. आपल्या रोमरोमांतून धर्म कसा भिनलेला आहे व तो तसाच असणें किती व कां आवश्यक आहे याची सुबोध चर्चा त्यात आहे. त्यांत रोजच्या जीवनांत धर्म आणणाऱ्या भारतीय संस्कृतीचा-माणुसकीच्या धर्माचा-इतिहास आहे. धर्म ही शोभेची वस्तु नाहीं. धर्म ही आपल्या जीवनापेक्षां वेगळी गोष्ट नाहीं आणि जो धर्म म्हणून आपण भूल करून घेतों, तो खरा धर्म नसून आपला खरा धर्म कोणता व तो जीवनांत कसा आणावा याचें त्यांत सुंदर

विवेचन आहे. भारतीय संस्कृति म्हणजे चार हजार वर्षांपूर्वी मनुष्याच्या कल्याणासाठीं स्थापन झालेल्या मानवधर्माची एक आकाशवाणी आहे. ज्या वेदोपनिषदांबद्दल गुरुजींच्या मनात नितांत आदर आहे, त्यातील व गीतेंतील उत्कृष्ट शिकवण त्यांनीं भारतीय संस्कृतीमध्ये अगदी निर्बुद्धालाही समजेल अशा रीतीने समजावून सांगितली आहे. गीता हे तर आम्हां भारतीयांचें धर्मपुस्तक आहे. सर्वांभूतीं एकच आत्मा आहे हें तत्त्व विश्वबंधुतेच्या मुळाशीं आहे. आपण सारीं एका परमेश्वराचीं लेकरें आहोंत, आपण सारे भाई भाई या रे ! सारे एकत्र व प्रेमानें नादा हे वरील महान् तत्त्वाचेच सुबोध उदाहरण आहे. सर्वांभूतीं एकच आत्मा आहे हें एक महान् तत्त्व आहे. आपण सारे भाऊ हा त्या तत्त्वाचा अभ्यास आहे आणि वैश्वदेव करताना काकबलि देणें, गाईला गोग्रास घालणें, हे त्या तत्त्वाचें आचरण आहे. आपण जीं धर्मकर्में करतो त्यात अतिशय सुंदर अर्थ आहे; त्यात मानवताधर्माचें आचरण आहे, असें गुरुजींचे म्हणणे आहे.

भारतीय संस्कृतीचा आधारग्रंथ गीता. गीतेतील तत्त्वज्ञानाबद्दल गुरुजींच्या मनांत फार आदर. कर्मयोगावर त्याचा अतिशय विश्वास आहे. निष्काम कर्म करीत राहणें ही ईश्वराची पूजा आहे असें त्यांचे मत आहे. भारतीय स्त्रियांत ही अनासक्ति, ही निष्कामता उत्कटत्वाने वास करीत असल्याने गुरुजींना स्त्रीविषयीं नितांत भक्ति वाटते. भारतीय संस्कृतीमधील ‘ स्त्रीस्वरूप ’ ह्या प्रकरणावरून गुरुजींच्या स्त्रीविषयक कल्पना ताडून पाहतां मी म्हणतों त्याचा प्रत्यय आल्याशिवाय राहणार नाहीं. कर्मावर त्यांचा विश्वास आहे. कर्मसंन्यास त्यांना तितकासा खपत नाहीं. धडपडणाऱ्या मुलांचे स्वामी, मीनेचे मुकुंदराव अगर त्याच्या कादंबऱ्यांतील इतर कांहीं पात्रें संन्यासाकडे वळत आहेत असें क्षणभर वाटलें, तरी लोकसंग्रहासाठीं ते कर्मयोगच जास्त पसंत करतात यात शंका नाहीं. कर्म–मग तें कितीका कमी दर्जाचें असो–त्यांना श्रेष्ठच वाटतें. वेदांतील, ‘ रथकारेभ्योनमः चर्मकारेभ्यो नमः ’ याचा असाच सुंदर अर्थ ते लावीत असतात. प्रत्येक कर्म जगाला सारख्याच महत्त्वाचें वाटलें पाहिजे. भंग्यापासून शिक्षकापर्यंत साऱ्या भूमिका निरलसपणें करणारी आई म्हणूनच त्यांना श्रेष्ठ वाटते. गुणकर्मविभागशः पडणारी वर्णाश्रमपद्धति

त्यांना पसंत आहे. मात्र वर्णाश्रमाचा अर्थ गुरुजी वेगळा लावितात. प्रत्येकाचा गुणधर्म पाहून त्याला ते शिक्षण द्यावयाचें व तोच धंदा त्यानें पुढें करावयाचा हा वर्णपद्धतीचा अर्थ. या पद्धतीनुसार चालणाऱ्या पाश्चात्य देशांतील समाजाची केवढी तरी प्रगति झालेली दिसते. त्याचप्रमाणें आश्रमपद्धति जर आजमितीला खरोखर सुरू असती, तर वानप्रस्थाश्रमातील माणसांची देशजागृतीच्या कामीं अतिशय मदत झाली असती, असे त्याना वाटतें. श्रद्धा असली म्हणजे मूर्तिपूजा करा वा ध्येयपूजा करा, ही गुरुजींना आवडते. स्वतः ते कृष्णाच्या तसबिरीची मानसपूजा करीत असतात. कर्मावर श्रद्धा ठेवून वेळप्रसंगीं अर्जुनाचा सारथी होणारा व गवळी लोकांत मिसळून समता प्रस्थापित करणारा श्रीकृष्ण ही त्याची आवडती अवतारमूर्ति आहे. 'तमसो मा ज्योतिर्गमय' अशा तऱ्हेची ज्ञानपिपासा देणारा, सर्वांभूतीं एकच आत्मा आहे असा बंधुभाव शिकविणारा भारतधर्म गुरुजींना शिरसावंद्य आहे. प्रत्येक व्यक्तीला सन्मार्गाकडे नेण्यासाठीं भारतीय महान् ऋषींनी धर्म प्रत्यक्ष जीवनांत आणून सोडला आहे असें त्यांना वाटते. पुराणकथाविषयीं सुद्धा त्यांना फार आदर आहे. जगाला शिकवण देण्यात महान् कवींची प्रतिभा गुंग झालेली पाहून त्यांना फार आनंद होतो. ज्ञान, भक्ति व कर्म ह्याच्या समन्वयात मोक्ष आहे, स्वातंत्र्य आहे, असे त्याना वाटतें. तसेच दुसऱ्या संस्कृतीबद्दल आदर बाळगणें म्हणजे स्वधर्म पाळणें होय असे त्याचे मत आहे. जो दुसऱ्याच्या आईबद्दल आदर बाळगतो, साऱ्या मातृत्वाला जो पूजतो, तोच खरा आपल्या आईवर प्रेम करतो.

साध्याबरोबर साध्याकडे नेणाऱ्या साधनांबद्दलची भक्ति आमच्या संस्कृतीमध्यें आहे. मोक्ष देणाऱ्या ज्ञानाबद्दल, जीवन देणाऱ्या भूमातेबद्दल, परमेश्वराच्या साऱ्या कृपेबद्दल आमची संस्कृति कृतज्ञ आहे. जो नांगर आमची शेती करतो, त्याला विश्रांति म्हणून आमच्या संस्कृतीमध्यें सण आहे. जे बैल आमच्या जीवनसंग्रामांत आमच्याबरोबर पण आमच्यापुढें दोन पाउलें राहून भाग घेतात, त्यांची पूजा आम्ही पोळ्याच्या दिवशीं करतों. बैलाबद्दल आम्हांला इतके प्रेम व इतकी भक्ति वाटते, कीं आम्ही 'नरवृषभ, राजर्षभ' असें म्हणवून घेणें मोठें भूषणास्पद मानीत होतों. जितका साध्याचा

ध्यास अधिक, तितकी साधनाची भक्ति अधिक, कृतज्ञता अधिक आणि कृतज्ञतेचा धर्म सर्वांत श्रेष्ठ धर्म होय हें निःसंशय.

## सामाजिक

गुरुजींचीं सामाजिक मतेंहि अत्यंत उदार आहेत. समाज हें एक मोठें कुटुंब म्हणून कुटुंब ज्याप्रमाणें त्याग, सेवा व प्रेम या तीन महान् तत्त्वांवर उभारलेलें आहे, त्याप्रमाणें समाजांतील त्याग, सेवा व प्रेम या तीन तत्त्वांचेंच महत्त्व पूर्णतया प्रत्येकानें जाणावयास हवे. आपली शिदोरी उपाशी माणसापुढें ठेवून ज्याचें पोट भरते तो धन्य. अशीं माणसें समाजात असल्यास तो समाज ऊर्जितावस्थेस येण्यास उशीर लागणार नाहीं. समाजाच्या स्वास्थ्याच्या दृष्टीनें कुटुंबसंस्था त्यांना अत्यंत आवश्यक वाटते; कारण ती एक प्रेमाचें व त्यागाचे शिक्षण देणारी संस्था आहे असें गुरुजी मानतात. त्याप्रमाणेंच पुष्कळांशीं त्यांना अविभक्त कुटुंबपद्धति मान्य असावी. सारें विश्वच एक कुटुंब आहे असें म्हणणाऱ्याला ती पद्धत आवडावीही. घरात मुलांचा किलबिलाट, सासवासुनाचें पहाटचें सुरावरचें दळण, गोठ्यांत गाईवासरांकडे, अंगणांत पाखराकडे बोट दाखवीत कडेवरच्या चिमण्याला घांस भरविणारी आई हें त्यांचें कुटुंबाचें आवडतें चित्र. तरीही जर प्रेम राहत नसेल, वारंवार तीव्र मतभेद होत असतील, तर त्यापेक्षां दूर राहून प्रेम टिकविणारी विभक्त कुटुंबपद्धति ते पत्करतील. गडकऱ्यांच्या कालिंदीच्या शब्दांत स्त्री ही पुण्यमय पतीची सुखदात्री चंद्रिका, तर पापमय पतीवर कडाडणारी वीज असावी अशी त्यांची इच्छा आहे. पतीचें सुख तें आपलें सुख हें तत्त्व, पतीला स्वहस्तें वेश्येकडे पोंचविण्यानें, पराकोटीला नेणाऱ्या पतिव्रतेला पाहून त्यांना घेरी येते. घटस्फोट नसावाच असें ते म्हणूं शकत नाहींत; कारण जगांतील नीतितत्त्वें सामान्य माणसाला धरून असतात. जगाचे सामान्य प्रश्न सुटावयास घटस्फोट मदत करीत असेल, तर तो त्याज्य आहे असें ते कधींही म्हणणार नाहींत. त्या दृष्टीनें ते फार विशाल दृष्टीचेच आहेत. परंतु घटस्फोटापेक्षां प्रेमावर त्यांचा जास्त विश्वास आहे. पुनर्विवाहाची संस्था त्यांना संमत आहे; त्यांच्या सरला, कावेरी ह्या पुनर्विवाह करतात; परंतु गणपतीच्या स्मृतींवर व प्रीतीवर धैर्यानें जगणारी स्त्री त्यांच्या मतें जगाचा

आदर्श होय. धैर्यानें जगणाऱ्या विधवा स्त्रीपुढें ते मस्तक नम्र करतील, तर बळजबरीनें वैधव्यदशा कंठणाऱ्या स्त्रीला अनुकंपेनें हात देऊन गुरुजी तिला पुनर्विवाहाचा मार्ग दाखवितील आणि म्हणूनच मला वाटतें सरला, कावेरी ह्यांची व त्याच्या पतींची फारशी ओळख झाल्याचें न दाखवितां तत्पूर्वीच त्यांना वैधव्यदशा प्राप्त झालेली त्यांनीं दाखविली असावी. त्याचप्रमाणें पति गेला, ह्या समजुतीवर जीवित कंठताना मनोहरच्या प्रेमात फसूं पाहणारी तारा, तिचा मुलगा आनंद ह्याच्या तापानें, एकदम शुद्धीवर आल्याचें दाखविले असावे. काहीं वर्षे संसारसुख भोगून प्रथमपत्नीच्या निधनानंतर अपत्यप्राप्तीची लंगडी सबब पुढें करून कामवासना पुरविण्यासाठीं झालेले बिजवराचे विवाह त्याना मनापासून पसंत नाहींत. प्रेमविवाह त्यांना पूर्णतया पसंत आहेत. एवढेंच काय, पण प्रेमविवाह करताना एका सदसद्विवेकबुद्धी-खेरीज कोणत्याहि गोष्टीला न जुमानता धैर्यानें प्रेमविवाह करावेत,असें त्याना वाटतें. 'क्रांति' ह्या कादंबरींत शान्ता आईवडिलाचें घर सोडून गरीब पण कष्टाळू मोहनशीं लग्न करते. प्रेमविवाह त्यांना पसंत आहेत हे खरें; पण तें प्रेम प्रथमदर्शनींच उद्भवतें असे त्यांचे मत असावे असें मानावयास बरीच जागा आहे. सर्वच कादंबऱ्यातून प्रथमदर्शनींच प्रेम करणाऱ्या तरुणी त्यानीं रंगविल्या आहेत. सहवासोत्तर प्रेम जडल्याचीं उदाहरणें विशेष आढळून येत नाहींत. दुसरे असे प्रेमविवाह करताना एका प्रेमाखेरीज दुसऱ्या कोणत्याही गोष्टींचा विचार करतां कामा नये. गरिबी-श्रीमंती, जातिभेद, धर्मभेद वगैरे कोणताहि भेद प्रेमविवाहाच्या आड येण्याचे कारण नाहीं. उलट पक्षीं असे भेदातीत विवाहच जगतात एकीची भावना निर्माण कर-तील व सर्वत्र गोडवा दृष्टीस येईल. म्हणूनच गरिबी-श्रीमंतीचे भेद विस-रून शाती-मोहन लग्न करतात; प्रांतभेद विसरून माया-रामदास लग्न करतात, तर जातिभेद विसरून वत्सला-नागानंद, कृष्णी-कार्तिक विवाह-बद्ध होतात.

आतां अलीकडे समाजांत आदर्श विवाहसंस्था कशी असावी ह्याबद्दल कांहीं मंडळी विचार करीत आहेत तर काहींच्या मनांत विवाहसंस्थेची आवश्यकताच आहे कीं नाहीं, अशा तऱ्हेचीं संशयपिशाच्चें थैमान घालीत

आहेत! सानेगुरुजी ह्यांचे ह्याबाबतचे विचार फार अमोलिक आहेत. 'क्रान्ति' ह्या कादंबरीत ते म्हणतात, " लग्न हे विघ्न नसून संरक्षण आहे. लग्न म्हणजे आधार आहे. लग्न म्हणजे गलबत वाहून जाऊं नये म्हणून असलेला नांगर." लग्नानें अद्वैत निर्माण होतें यात शंका नाही. लग्नानें सेवा, संयम व त्याग याची शिकवण मिळते. विवाहसंस्थेखेरीज समाजात स्वास्थ्य, प्रेम, आपुलकी आणि एकी ही नांदावयाचीं नाहींत. विवाहाशिवाय जीवनात पावित्र्य नाहीं, संयम नाही, त्याग नाहीं, अतएव माणुसकी राहणार नाहीं. विवाहसंस्था ही समाजाला सन्मार्गावर ठेवणारी एक मोठी शक्ति आहे, ह्या त्याच्या मताबद्दल दुमत असणे शक्यच नाहीं. विवाहसंस्थेचा नाश मानवजातीच्या प्रगतीस हितावह होणार नाही; उलट अधोगतीलाच्च कारणीभूत होईल.

मानवी सुखाच्या दृष्टीने गुरुजीना सर्वांत महत्त्वाची कोणती गोष्ट वाटत असेल, तर ती म्हणजे समाजात विषमतेचा अभाव व समतेचा प्रभाव ही होय. ही एक गोष्ट स्वप्नसृष्टीतून सत्यसृष्टीत आणण्याची त्यांना अत्यंत तळमळ लागलेली दिसते. जगात आपण समानता न आणली, तर सर्वाभूतीं एक आत्मा पाहावयास शिकविणाऱ्या धर्माबद्दल आपण व्यर्थ अभिमान बाळगतों, असेच म्हणावे लागेल. समानतेच्या एका सुंदर तत्त्वावरच्च आपल्या सनातन धर्माची उभारणी झालेली आहे. सर्वच्च दृष्टीने जीवनात समानता यावी ह्यासाठीच भारतीय सस्कृतीचा जन्म झालेला आहे. भारतीय संस्कृतीची प्रौढी, वैशिष्ट्य ह्यांतच आहे. आर्थिक दृष्टया तर समानतेची अत्यंत आवश्यकता आहे; कारण हीं शतकें माणसाची किंमत पैशावरच्च ठरवितात ना ? आपण सारे जर भाऊ तर आपल्यातले अनेक भाऊ उपाशी राहिलेले पहाणें आपल्याला आवडेल काय ? एका बाजूस मोठे राजेशाही बंगले; दुसरीकडे चंद्रमौळी झोपड्या. एकाला अजीर्ण; दुसऱ्याची उपासमार. हर हर ! ही जगातील विषमता खरोखर माणुसकीला लाजविणारी आहे. श्रमणारा कामकरी उपाशी मरतो व निरुद्योगी मनुष्य बसून खातो व स्वस्थपणें उदराच्या गोलार्धावर हात फिरवितो हा केवढा अन्याय ! ह्यांत किती माणुसकीचा अभाव दिसून येतो ! श्रमाची, श्रमणाऱ्यांची पूजा बांधावयास

अजून माणसास शिकावयाचे आहे. आणि जोंपर्यंत ही श्रमपूजा अस्तित्वात येत नाहीं, तोंपर्यंत मानवाची खरी उन्नति झाली आहे असें कोणीहि विचारवंत सहृदय मानण्यास तयार होणार नाहीं. श्रमणारांची मान कधीं उंच होईल, ह्याबद्दल प्रत्येकानें प्रयत्न करावयास पाहिजे. अन्न निर्माण करणारा शेतकरी स्वतः अन्नाला महाग होतो, ह्याचे गुरुजींसारख्या हळुवार मनाच्या माणसास अपरंपार दुःख होतें. आर्थिक दृष्ट्या समाजांत समानता असावी, असा त्याचा हट्ट आहे; एवढ्यासाठी ते जिवाचा आटापिटा करीत आहेत.

जातिभेद तर साने यांना मुळीच मान्य नाहींत. माणसानीं माणसाला अस्पृश्य समजावयाचे यासारखें अधर्माचरण नाहीं. माणसामाणसात स्पृश्यास्पृश्य ठरविण्याचा मनुष्याला काय अधिकार ? विशेष दुःखाची गोष्ट ही आहे की, स्वतःचा 'वर्ण' हा ज्ञानाचा वर्ण आहे असें सांगणाऱ्या शहाण्यासुरत्यांनी सेवाकर्म करणाऱ्याला अस्पृश्य मानावे ! छे ! छे ! यासारखें अज्ञान नाहीं. यांत माणुसकीचा ऱ्हास आहे, खऱ्या ज्ञानाचा मागमूस नाहीं. प्रत्यक्ष परमेश्वरानें देखील 'सेवाकर्म करणे' हाच स्वतःचा धर्म मानलेला आहे, तर मग सेवा करणाऱ्याला तुच्छ मानणे, लाथाडणे म्हणजे परमेश्वरालाच तुच्छ मानणें होय. जाति म्हणजे ईश्वरनिर्मित कडक बंधन नव्हे. समाजव्यवस्थेच्या दृष्टीनें, श्रमविभागाच्या दृष्टीनें ज्यांनीं ज्यानीं आपलीं म्हणून जीं सेवाकर्में वाटून घेतली आहेत, त्याचे नुसतें निदर्शक आहे. आपण सध्यां ज्याप्रमाणें वकील, डॉक्टर, शिक्षक, अशी आपापल्या नांवापुढें आपल्या धंद्याचीं नावें लिहितो, त्याप्रमाणे जाति म्हणजे वास्तविक धंद्याचें नाव. सोनारानें दागिने घडवावेत, शिंप्यानें कपडे शिवावेत, असा त्या त्या जातींचा अर्थ. तेव्हा अर्थातच या जातीसुद्धां जन्मानें बांधल्या जाण्याचें कांहींच कारण नाहीं. पूर्वी सोनार आपल्या मुलाला लहानपणापासून आपले कसब शिकवी, तर क्षत्रिय आपल्या मुलाला बालपणापासूनच नेमबाजी शिकवी; ब्राह्मण आपल्या मुलाला बालपणींच वेदपठण करावयास सांगत. त्यामुळें साहजिकच पुढें पुढें जन्मामुळें धंदा ठरत जाऊं लागला. म्हणूनच आज अनेक उद्योगधंद्यांच्या पसाऱ्यांत आवडीनिवडीमुळें धंदा बदलला, तर जातही बदललीच पाहिजे आणि अर्थातच जाति याचा अर्थ धंदा असेल तर रोटी-

बेटी व्यवहारास जातींची अडचण पडण्याचें यत्किंचितूही कारण दिसत नाहीं. प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णानें गीतेंत असें सांगितले आहे कीं, चातुर्वर्ण्य पद्धतीची मीं 'गुणकर्म विभागशः' स्थापना केली आहे. पण मौज ही आहे कीं, गीता हा आमचा धर्मग्रंथ आहे असें म्हणून तो डोक्यावर घेऊन नाचणारे आम्ही जातिभेदाचें जाळें अधिक गुंतागुंतीचें विणीत आहोंत, ह्याबद्दल साने-गुरुजींना अतिशय वाईट वाटतें.

## सामाजिक सुधारणा

जग जसे आहे तसें ते न राहतां मांगल्याकडे नेतां आलें पाहिजे असे प्रत्येक समाजकार्यधुरंधराला वाटतें व तेवढ्यासाठीच त्याची सारी धडपड असते व तें तसें कोणत्या मार्गानें नेतां येईल याबद्दल त्याला अहोरात्र तळमळ लागलेली दिसून येते. सारा समाज तळापासून-खालच्या थरापासून-स्वच्छ व्हावयास हवा आणि त्यासाठीं सर्वांनी झाडू घेऊन कंबर कसून उभें राहावयास पाहिजे असें सानेगुरुजींना वाटतें. श्रमणाऱ्याच्या जीवनातून ज्ञानाची हवा खेळविली गेली पाहिजे; कारण तो थर म्हणजे हिंदुसमाजाचें फुप्फुस आहे. यासाठीं सर्व श्लाघ्य सुधारणाचे अगोदर खेड्याखेड्यांतून साक्षरता-प्रसार करणें हें प्रत्येक सुशिक्षिताचें आजचे मुख्य व जबाबदारीचें कर्तव्य आहे. सानेगुरुजींचें दुसरें ध्येय म्हणजे खादी-प्रचार. खादी हा शब्द उच्चारतांच ते सहस्र जिव्हानीं बोलूं लागतात जणूं. खादींत एकी, प्रेम, सुख, समानता, त्याग हीं सारीं एकवटलेलीं दिसतात त्यांना. खादी नेसणें म्हणजे परमेश्वराची सेवा करणें असें ते मानतात. खादीनें-तिच्या पावित्र्यानें-एकत्र बांधलीं जाणारीं हृदयें कधींहि अलग होणार नाहींत असा त्याना विश्वास वाटतो. खादी ही आपल्या देशांतील गरीब बांधवांची माता म्हणून तिच्याबद्दल अत्यंत भक्ति वाटावयास पाहिजे प्रत्येक हिंदवासीयास. साक्षरताप्रसार व खादीप्रचार ह्या दोन गोष्टी आपल्या समाजांतून व्हाव्यात व तिसऱ्या गोष्टीचें-शिक्षेचें-समाजांतून उच्चाटन व्हावें असें गुरुजींना फार वाटतें. "Stonewalls do not a prison make" ही गोष्ट जरी महात्म्यांच्या बाबतींत खरी असली, तरी सामान्य लोक गुन्ह्यामुळें तुरुंगांत येऊन पडतात व शेवटीं जगणें हीच त्यांना मोठी शिक्षा होऊन बसते ह्याचें त्यांना

वाईट वाटतें. सामान्य लोक गुन्हा करण्यास सहजासहजीं प्रवृत्त होत नाहींत; तर नाइलाज म्हणून त्यांना ही गोष्ट करावी लागते असें बऱ्याच वेळां वाटूं लागतें. समाजाच्या आकुंचित दृष्टीमुळें जो एकदां गुन्हेगार असतो तो कायमचा गुन्हेगारच ठरतो व त्यामुळें गुन्हेगाराला अफाट जग म्हणजे एक मोठा तुरुंगच वाटतो व ह्या मोठ्या तुरुंगांतील माणुसकीचा अभाव असलेल्या जीवनापेक्षां लहान तुरुगाच्या चार भिंतीतील निदान दोन वेळां पोटभर भाकरी देणारें, जीवनच तो पत्करतो. पारतंत्र्याचा तिरस्कार करणाऱ्या प्रत्येक मनुष्याला तुरुंग जगांतून नष्ट व्हावेत असेंच वाटलें पाहिजे. मनुष्याचा पशु बनवावयाचा नसून त्याला देवपण आणावयाचें आहे. ज्या चांगल्या गोष्टी माणसाला सहज सहानुभूतीनें, प्रेमानें शिकवितां येतील त्या क्रूरतेने शिकविता येणार नाहींत. एवढ्याचकरितां तुरुंग नष्ट झाले पाहिजेत. त्यानंतर सर्वसाधारण सुधारणा म्हणजे भेदांचें उच्चाटन. मग ते भेद जातीय असोत, प्रांतिक असोत, आर्थिक असोत अगर कोणतेहि असोत; ते नष्ट झालेच पाहिजेत व तेवढ्यासाठीं प्रयत्न झालेच पाहिजेत. श्रमपूजा ही सुरू व्हावयास पाहिजे. श्रमपूजा बांधावयास जरी गुरुजी तयार असले तरी व्यक्तिमहात्म्य त्याना मान्य आहे. ' कला म्हणजे काय ' ह्या ग्रंथात ते स्पष्टच म्हणतात कीं, प्रत्येक देशांत असणाऱ्या महात्म्याचा मागोवा घेत घेत कलेनें जावे. अत्यंत पुढारलेल्या व म्हणूनच व्यक्तिमहात्म्य मान्य न करणाऱ्या मोठमोठ्या राष्ट्रात तरी आपणास काय दिसतें ? व्यक्तिमहात्म्यच ना ! इंग्लंडला चर्चिल–ॲटली, रशियाला स्टॅलिन, अमेरिकेला रूझव्हेल्ट, ट्रूमन, जर्मनीला हिटलर, इटलीला मुसोलिनी ह्या व्यक्तींचें महात्म्य मान्यच आहे अगर होतें ना ? मग दरिद्री व मागासलेल्या अशा गुलाम हिंदुस्थानला व्यक्तिमहात्म्याबद्दल दूषण देण्यांत काय अर्थ आहे ? एकानें पुढारीपण स्वीकारावें अगर तें त्यास अंगच्या गुणांनीं प्राप्त व्हावें व बाकीच्यानीं त्या पुढाऱ्याच्या आज्ञा पाळीत मागें जावें, ह्यांतच आजच्या स्थितींत हिंदुस्थानला प्रकाश दिसेल. सामाजिक सुधारणा व राजकीय सुधारणा ह्यांचा फार जिव्हाळ्याचा संबंध आहे. टिळक, आगरकर ह्यांच्या काळीं तर सामाजिक सुधारणा आधीं कीं राजकीय सुधारणा आधीं हा मोठा वादग्रस्त प्रश्न होऊन बसला होता. असा ह्या दोन सुधारणांचा जिव्हाळ्याचा संबंध असल्यानें

साने गुरुजींचा सामाजिक दृष्टिकोन पाहिल्यानंतर त्यांचीं राजकीय मते काय हें पाहणें आवश्यक आहे.

## राजकीय

साने गुरुजींचे राजकारणांतील गुरु महात्मा गांधी होत ! अहिंसा आणि सत्य ही दोन तत्त्वें म्हणजे गुरुजींचे प्राण होत. आणि याच दोन तत्त्वांवर आधारलेल्या मार्गानें सर्व हिंदी जनता गेल्यास क्रान्ति होईल, स्वातन्त्र्य मिळेल अशी त्यांची अपार श्रद्धा आहे. कांहीं वर्षांपूर्वी अशी स्थिति होती कीं कम्युनिस्टांना त्यानीं जवळ केलें होतें. परतु त्यावेळींही त्याना कम्युनिझमचीं सर्वच तत्त्वें शंभर टक्के खासच मान्य नव्हतीं. ते स्वतःच एके ठिकाणीं म्हणतात कीं, भाई लोकाना जरी मीं जवळ केले, तरी मी अहिंसा तत्त्वाला सोडणार नाहीं. वास्तविक कम्युनिस्ट लोक 'हिंसा हवीच' असा दुराग्रह तरी कधीं धरीत होते व आहेत ? त्याच्यापैकीं कोणी तरी ह्या मार्गाचा अवलंब केला आहे काय ? परंतु अहिंसा सफल न झाली तर अखेरचा मार्ग म्हणून हिंसा हरकत नाही, असें ते मानितात. पण अखेरचा मार्ग म्हणूनहि मी हिंसा पत्करणार नाहीं, असे गुरुजी म्हणतात. केवळ शान्ततेच्या मार्गाने होणारी क्रान्तिच चिरकाल टिकेल असाच महात्माजींप्रमाणे त्यांना विश्वास वाटतो. रक्तानें न्हालेली क्रान्ति परत रक्तांतच गुदमरून बुडून मरते असा आजपर्यंतचा जगाचा इतिहास आहे. शांतीनें जन्म दिलेली क्रान्ति विचारपूर्ण असेल, कल्याणकारक असेल, प्रेमाची असेल व म्हणूनच चिरकाल टिकणारी असेल यात संशय नाहीं. अन्याय सहन करावा असे गुरुजी कधींच म्हणणार नाहीत; कारण अन्याय सहन करणे म्हणजे गुलाम रहाणें. परंतु 'अन्यायाचा प्रतिकार अन्यायानेच केला, अपकाराची फेड अपकारानेच केली, तर तुमच्यावर कलेल्या अपकाराची दाद मागण्याचा तुम्हाला काय अधिकार ?' असा प्रश्न गुरुजी आपणांस विचारतील. अन्यायाचा हिंसक प्रतिकार तुमचे स्वराज्य तुमच्यापासून दोन पावले दूर लोटील. प्रतिकार करा ! अवश्य करा ! पण तो असहकाराने करा, अहिंसक करा. गुरुजी म्हणतात, 'सपवाले मजूर दगडधोंड्यांची मारफेंक करूं लागले, तर मी आधी त्यांच्यापुढें जाऊन उभा राहीन न सांगेन ते दगड अगोदर माझ्या अंगावर फेका.'

'क्रान्ति' ह्या पुस्तकातील मोहनप्रमाणेच गुरुजीसुद्धा शेवटपर्यंत, 'शांत राहा' हिंसा करूं नका.' असेंच सांगत राहतील.

याचा अर्थ मात्र असा नव्हे कीं, कोणत्याहि स्वतंत्र वा परतंत्र राष्ट्रांत लष्करी शिक्षणाची आवश्यकताच नाहीं. संरक्षण-शक्ति जवळ नसेल, तर राष्ट्र दुबळें होईल. अनंत परिश्रमानीं मिळवलेले स्वराज्य चुटकीसरसे निघून जाईल. सरक्षण खासच हवे. संरक्षणाची शक्ति नसणें दुबळेपणाचे लक्षण होय; पण संरक्षणाची शक्ति असल्यानंतर तिचा दुरुपयोग करणे म्हणजे क्रूरपणा होय. शक्तीचा सदुपयोग ही खरी माणुसकी. सज्जनाच्या प्रत्येक गुणाचा उपयोग जगताच्या, 'ज्ञानाय दानाय च रक्षणाय' असाच झाला पाहिजे, अशी थोर कल्पना गुरुजींची आहे.

स्वातंत्र्यप्राप्तीची गुरुजींना अतिशय तळमळ लागलेली आहे आणि त्यासाठीं स्थापन झालेली व झगडा करीत राहणारी कॅांग्रेस ही संस्था जणूं त्यांची अधिष्ठात्री देवता आहे. भेदाभद न मानता सर्वांनी एका निशाणाखालीं जमून स्वराज्याचा लढा महान् पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं लढवावा अशी त्यांची फार इच्छा आहे. या सस्थेच्या कार्यप्रचारासाठी त्यांनीं अंमळनेर येथें एक स्वतंत्र ' कॅांग्रेस ' नावाचें वर्तमानपत्र सुरू केले होतें व त्या पत्राच्या अल्पायुष्यांत त्याने कार्यही सपाटून केले. कॅांग्रेसच्या तत्त्वांना त्यानीं स्वतःला वाहून घेतलें आहे. ते गांधीवादाचे कट्टे पुरस्कर्ते आहेत. महात्माजींच्या त्यागाबद्दल,त्याच्या कार्यक्षमतेबद्दल, त्यांनीं केलेल्या प्रचंड राष्ट्रजागृतीबद्दल त्यांना नितांत आदर वाटतो. पूर्वी सांगितल्याप्रमाणे जरी सत्य, अहिंसा, असहकार ह्या गोष्टींवर त्यांचा फार विश्वास असला, कॅांग्रेसच्या निशाणामागें साऱ्या राष्ट्राची शक्ति उभी रहावी अशी जरी त्यांची फार इच्छा असली,तरी कॅांग्रेस व महात्माजी ह्याच्यावर असणारी त्याची श्रद्धा ही अंधश्रद्धा नाहीं; विचारशील श्रद्धा आहे; कॅांग्रेस चुकेल तर तिला सुधारणे आमचे कर्तव्य आहे, व ते आम्ही निर्भयपणें करूं; परंतु जें जे राष्ट्रकार्य आम्ही करूं, तें तें कॅांग्रेसच्या निशाणाखालीं जमून करूं. कॅांग्रेस म्हणजे काहीं एक मनुष्य नव्हे. कॅांग्रेसचें स्वरूप बनविणें जनतेच्या हातांत आहे असें ते जनांत सागत आहेत. अहिंसा तत्त्व माणसाला दुर्बल बनवितें, असा जो एक आक्षेप घेण्यात येतो,

त्याचें गुरुजींना अत्यंत आश्चर्य वाटतें. ते म्हणतील, शत्रूला प्रेम देणें म्हणजे का दुबळेपणा ? विषारी सापाला न ठेचतां दूर सोडणें का भित्रेपणा ? अहिंसा निर्भयता शिकविते ही त्यांची पुरेपूर खात्री आहे.

गरीब समाज वर यावा; श्रमणारांचें राज्य व्हावे अशी त्यांची स्वातंत्र्याची कल्पना आहे. त्यांचीं काहीं मतें पडताळून पाहिली तर ते पुष्कळ अंशी समाजवादी आहेत असें म्हणावेसें वाटतें. समाजवादाचीं पुष्कळशीं मते त्याना पसंत आहेत. खरे राजकारण म्हणजे राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीच्या पोटाला व मनाला भरपूर स्वादिष्ट व पथ्यकर खाद्य पुरविणें व या राजकारणानेंच खरी संघटना होईल व स्वराज्य जवळ येईल असें ते समजतात.

राष्ट्राचें राजकारण हा वैयक्तिक प्रश्न नाही. तो साऱ्या राष्ट्राचा प्रश्न आहे; म्हणून ' हिंदी तितुका मेळवावा ' असा आधुनिक दासबोध श्री. साने सागगात. त्यामुळेच राजकारणात–राष्ट्रकार्योत–धर्मभेद, जातिभेद इत्यादींना जागाच असूं शकत नाहीं. स्वातंत्र्याच्या ध्येयानें प्रेरित होऊन, हिंदमातेच्या दुधावर जगणारानें, कॉंग्रेसच्या निशाणाखालीं प्राण पणाला लावून लढा द्यावा –मग तो हिंदु असो, मुसलमान असो, हरिजन असो, ख्रिश्चन असो. तसेंच राष्ट्रकार्योत स्त्रीपुरुष, लहानथोर हेहि भेद नाहींत. ज्यानें त्यानें आपापली जबाबदारी व कुवत ओळखून कार्य करीत राहावें. लढाईच्या दिवसांतील धकाधकीच्या प्रवासांत ज्याला जें उचलेल तें बोचकें उचलून गाडी गांठावयाची असते; लहान मुलगा लहान बोचकें उचलील, तर मोठा मनुष्य मोठें बोचकें उचलील. तद्वत् या स्वातंत्र्याच्या धकाधकीच्या संग्रामांत प्रत्येकानें आपली जबाबदारी पार पाडावयाची आहे. विद्यार्थी साक्षरता–प्रसार करतील, स्त्रिया स्वच्छता शिकवितील, पुरुष विचार देतील नि मग सारी सुधारणा होईल, ज्ञानाचा प्रकाश येईल आणि ज्ञानाचा प्रकाश आल्यावर स्वातंत्र्य तें कितीसें दूर राहणार ? माणसाच्या मनाच्या व बुद्धीच्या उन्नतीमध्येंच खरें राजकारण फोंफावेल. गुरुजींच्या मतें नवभारत बेडर आणि तेज:पुंज झाला पाहिजे. शारीरिक, बौद्धिक आणि भावनात्मक असा त्रिविध विकास सर्वत्रांचा व्हावयास पाहिजे. राष्ट्र निर्भय व्हावयास पाहिजे. सामुदायिक स्वरूपाच्या कार्यामुळें स्फूर्ति निर्माण होते, उत्साह वाढतो, सामर्थ्य

वाढतें. त्रिविध विकास झाल्यास खरे राजकारण फोंफावते; कारण तें उघडया डोळ्यांनीं खेळलेलें राजकारण होय. त्या डोळ्यांना स्वातंत्र्याचा मार्ग स्पष्ट दिसेल, स्वातंत्र्याचें स्वरूप निश्चित ठरवितां येईल; स्वातंत्र्य टिकवितां येईल म्हणूनच राजकारण व समाजोन्नति यात ते स्पष्ट भेद करीत नाहींत. म्हणून वर सागितलेल्या प्रकारची जागृति समाजांत करीत राहणे हें ते स्वतःचें व प्रत्येकाचें प्रथम कर्तव्य समजतात व तें कार्य गुरुजी आजपावेतो करीत आले आहेत व करीत राहतील.

'जोंपर्यंत राष्ट्रं एकमेकांना गुलाम करीत आहेत, तोंपर्यंत जगांत माणसांचीं राष्ट्रं आहेत असें म्हणता येणार नाहीं. गुलाम करणारे व होणारे दोघेहि पशुच.' अशी त्यांचीं स्वतंत्रतेबद्दल विशाल पण जहाल मतें आहेत. हिंदुस्थान स्वतंत्र झाला म्हणजे झालें असें म्हणून गुरुजी कधींच थाबणार नाहींत. जो दुसऱ्याला गुलामगिरींत ठेवतो, तो गुलामच होय असें ते समजतात.

## कलाविषयक

गुरुजींच्या मतें समाजात कलेला फार श्रेष्ठ स्थान आहे. संगीतकला, चित्रकला, साहित्य वगैरे सर्व कलाविषयीं गुरुजीच्या मनात अत्यंत प्रेम वसत आहे. कला म्हणजे जीवन सुंदर करणारी एक अमोघ शक्ति आहे असे त्याना वाटतें; पण कलेनें सुद्धा समाजाची सेवाच केली पाहिजे अशी त्याची दृढ समजूत आहे. 'पुनर्जन्म'मध्यें जोंपर्यंत गवई गोविंदराव कलेला दुष्कृत्यांसाठीं राबवीत असत, तोंपर्यंत ती कला बाजारी होती; पण पश्चात्तापानंतर तीच दिव्य कला बनली. दयामय हृदयांतून निर्माण झालेली कला हृदयपालट करणारी, जीवनात पवित्रता आणणारी एक अमोघ शक्ति आहे. 'कला म्हणजे काय ?' ह्या रा. साने ह्यांच्या अनुवादित ग्रंथाच्या प्रस्तावनेंत त्यांनीं स्वतः आपलीं मतें फार सुबोधपणें मांडिलीं आहेत. रा. साने ह्यांच्या मतें कला हे भावनाप्रदानाचें साधन आहे; म्हणून सद्भावना देणारी सत्कला व असद्भावना देणारी ती असत्कला होय. सद्भावनांचे दोन प्रकार आहेत. एक प्रकार म्हणजे थोर व परम उदात्त धार्मिक भावना. दुसरा प्रकार म्हणजे रोजच्या जीवनांतीलच साध्या प्रसंगाच्या भावना. या दोन्ही प्रकारच्या भावना अखिल मानवजातीला जोडतात. अशा भावना देणारी

कला, ती खरी सत्कला. समाजांत तिची पूजा झाली पाहिजे, तिला उत्तेजन मिळालें पाहिजे. कलावानांनीं या खऱ्या सत्कलेच्या सेवेला वाहून घेतलें पाहिजे. परंतु एक गोष्ट मात्र विसरून चालणार नाहीं कीं, कलावान ज्या थोर भावना देणार, त्या त्याच्या हृदयांतून निघालेल्या असाव्यात; कारण स्वतः कलावान जर त्या भावनांनीं वेडा झालेला नसेल, तर तो दुसऱ्याला कसा वेड लावील ? कलाकृतींत थोर भावना पाहिजे ही पहिली गोष्ट. त्यांत उत्कटता, जिव्हाळा, आत्मीयता पाहिजे ही दुसरी गोष्ट; तिसरी गोष्ट म्हणजे भावना स्पष्ट व स्वच्छ असाव्यात. आपल्या भावना जास्तींत जास्त लोकांना समजण्याची कलावंताला तळमळ वाटावयास हवी.

सर्व मानवांचें ऐक्य व्हावे म्हणून झटणारा, सर्वत्र समता व बंधुभाव हेंच ज्याचे ध्येय, ज्याला आपपर भाव नाहीं, सर्व मानवजातीच्या मंगलासाठीं जो उभा आहे, ज्याला भेद अमंगल वाटतात, प्रेम हीच ज्याची शक्ति, त्याग हेंच ज्याचें वैभव, जो सर्वांना दान देण्यास तयार, दरिद्री लोकांचा सखा, पडलेल्याचा उद्धारकर्ता तो टॉलस्टॉयचा तसाच गुरुजीचा महापुरुष होय व ह्या महापुरुषानें दाखविलेल्या मार्गाने कलेनें जावें. त्या महापुरुषांना थोर दृष्टि असते म्हणून त्याची भावना ती सद्‌भावना होय. अर्थातच कलावानाला कोण आदर्श पुरुष वाटतो ह्याच्यावर जगाचें कल्याण अवलंबून आहे. कला हें दुहेरी साधन आहे. कला ही जगविणारी अमृतधारा आहे किंवा मरणाकडे नेणारी विषवल्लीहि आहे. तुमच्या कलेसमोर कोणता आदर्श तुम्ही ठेवतां यावर हें अवलंबून आहे. हिटलरचें ध्येय डोळ्यांसमोर ठेवणारी कला जगाला आग लावील. ख्रिस्ताचें ध्येय डोळ्यांसमोर ठेवणारी कला जगाला शांति देईल. म्हणून सकल मानवजातीचें प्रेमानें ऐक्य करूं पाहणारा महापुरुष सत्कलेचा आदर्श होय व सर्व कलांनीं स्वतःला उजेड मिळावा म्हणून या महापुरुषाभोंवतीं फिरले पाहिजे. महापुरुष जीवनाच्या कलेचा उपासक असतो. जीवनाची कला ती परमोच्च कला. इतर सर्व कलांनीं तिचा मागोवा घेत गेलें पाहिजे. महात्मे म्हणजे दीपस्तंभाप्रमाणें आहेत. कलांच्या नावांत बसून जगांतील मानवी यात्रेकरू चालले आहेत. वासना, विचार, क्षुद्र अभिमान याच्या खडकावर कलारूपी नावा आदळल्या, तर त्या यात्रेकरूंना कोण हात देणार, कोण तारणार ?

बहुजनसमाजाला धार्मिक भावना आवडतात किंवा साध्या रोजच्याच सुखदुःखांतील प्रसंगाच्या भावनाहि त्याला समजतात. परंतु या दोन्ही प्रकारच्या भावना आजच्या महाराष्ट्रीय कलावानानी भुकेल्याच ठेवल्या आहेत. अर्वाचीन कलावान ज्याप्रमाणें अर्वाचीन धार्मिक भावना देत नाहींत, त्याप्रमाणें सामान्य लोकांच्या सुखदुःखाच्या भावनाहि रंगवीत नाहींत, ह्याबद्दल गुरुजीना भारी हळहळ वाटते. शेले एके ठिकाणी म्हणतो शेतकरी हाही थोर कलावान आहे. हा आपणास धान्याची भाकर देत आहे; पण कलावानानी कोणती विचारांची भाकर, भावनाची पौष्टिक व हितकर भाकर ह्याच्या हृदयाजवळ नेली आहे ? गुरुजींना दुःख होते ते याचेंच कीं, आपल्या सत्कलेचे स्वच्छ किरण सर्वत्र जात नाहींत, असत्कल्पनाचे धुकें दूर करीत नाहीत; हृदयाजवळील अंधार नष्ट करीत नाहींत.

बहुजनसमाज ! कलेला केवढा अनंत व अपार विषय ! किती विविध, किती रसमय ! परंतु आपणाला डोळे नाहीत व कान नाहीत. कलावानानें बहुजनसमाजाचें झाले पाहिजे. महात्मा गांधींनीं साधेपणा आणून वरच्या वर्गांना या बहुजनसमाजाच्या जवळ नेण्याचे थोर कार्य सुरू केले आहे. हजारों लहानमोठे कलावान या महापुरुषाचे जर हजारों हात झाले, तर हा सहस्रबाहु, सहस्रशीर्षा महापुरुष समाजाला एका क्षणांत सौभाग्याच्या शिखरावर, स्वातंत्र्याच्या शिखरावर नाहीं का घेऊन जाणार ? जर कलावंतांनीं कॉलेजांतल्या पांखरांच्या लीली वर्णन करण्यांतच सारी कला खर्च केली, तर मग महापुरुषानें दाखविलेल्या ध्येयांना कोण पूजील, त्या ध्येयांना कोण रंगवील, राष्ट्र कोण उभें करील, समाजाला कोण पुढें ढकलील ? महापुरुषाच्या पाठोपाठ कलेनें गेलें पाहिजे, ही गोष्टच कलाविलासवाद्यांना पटत नाहीं. कलेसाठीं कला हें त्यांचें ब्रीदवाक्य म्हणूनच गुरुजी त्यांना एकच गोष्ट सांगतात, जगांत तुम्ही एकटे नाहीं. तुमच्या बोलण्या चालण्याचा चांगला किंवा वाईट परिणाम समाजावर होत असतो; म्हणून आपल्या कृतीचा समाजावर काय परिणाम होत आहे हें प्रत्येकानें दक्ष राहून पाहिलें पाहिजे. " जे स्वतः पापें करतात त्यांचें नाहीं मला तितकें वाईट वाटत; परंतु आपल्या पापांनीं या माझ्या लहानग्यांना, या कोंवळ्या मुलांना जे बिघडवितात, त्यांचा मात्र मला किती संताप येतो

तें सांगवत नाहीं." खिस्ताचे हे गंभीर शब्द सर्व कलावंतांनीं, सर्व माता-पितरांनीं लक्षात ठेविले पाहिजेत.

नवीन मानसशास्त्रवेत्ते म्हणतात, "एकच मुख्य ब्रह्म आहे आणि तें म्हणजे रतिब्रह्म. रतिभावना हीच सर्व जीवनांत मुख्य आहे. सारा हिचा खेळ आहे." गुरुजींना जर वाईट वाटत असेल तर ह्याचेंच कीं, आमच्या कलावानांनीं या ब्रह्माचीं उपनिषदें गाण्याचें ठरविलें आहे व सारा समाज विषयलंपट, दुबळा, कर्महीन असा करण्याचें भव्य कर्म आरंभिलें आहे !

भगवान् शंकराचार्योनीं तीन गोष्टी दुर्लभ म्हणून सांगितल्या आहेत. मनुष्यजन्म, मुमुक्षा व महापुरुषसंश्रय. या तीन गोष्टी फार भाग्यानें मिळतात. आपण सारे मनुष्य आहोंत. राष्ट्रामध्यें मुक्त होण्याची इच्छाहि उत्पन्न झाली आहे आणि महापुरुषांचा लाभहि झाला आहे. आतां आपलें एवढेंच काम आहे कीं, या महापुरुषांच्या पाठोपाठ जावयाचें व मुक्त व्हावयाचें. कलावंतांचें हें पहिलें कर्तव्य आहे. महाराष्ट्रांतील कलावंतांचीं हृदयें विहिरींप्रमाणें आंवळ, संकुचित व क्षुद्र झालीं का ? देशांतील महापुरुष पाहून त्यांचीं हृदयें उचंबळून येत नाहींत का ? हिंदुस्थानांतील महापुरुषांनीं दाखविलेल्या ध्येयांच्या पाठोपाठ जर हिंदुस्थानांतील कलावंतांनीं उत्कटतेनें धाव घेतली असती, तर भारतांत आज निराळेंच दृश्य दिसलें असतें. म्हणूनच गुरुजी सतत ईशप्रार्थना करतात कीं, देव करो व भारतांतील कलावान, महात्म्याच्या भोंवतीं प्रदक्षिणा घालावयास लागोत; महात्म्यांचीं ध्येयें जळजळीत भावनांनीं हृदयाहृदयांत जागृति करोत.

## साहित्यविषयक

साहित्य ही एक कलाच व गुरुजींचीं कलाविषयक मतें विस्तारानें त्यांच्याच शब्दांत पाहिल्यानंतर त्यांचा साहित्यविषयक दृष्टिकोन सहज ध्यानांत येतो. साहित्य हा वास्तविक रा. सानेगुरुजी यांचा प्रधान जीवनहेतु नाहींच. त्यांचें खरें कार्य फार व्यापक स्वरूपाचें व राष्ट्राच्या आजच्या क्षणाला अत्यंत मोलाचें असें आहे. ते मूलतः जनसेवक आहेत; त्यांची साहित्यसेवा आनुषंगिक आहे. महात्माजींचीं अमोल जीवनतत्त्वें, त्याचप्रमाणें बहुजनसमाजाचीं सुखदुःखें त्या समाजाला सांगण्यासाठीं त्यांनीं साहित्य हें माध्यम वापरलें आहे.

गुरुजींच्या मतें **जें जीवनांत जागृति आणतें तें वाङ्मय, जें जीवनांत ज्ञानाचा प्रकाश आणतें तें वाङ्मय; जें जीवन समृद्ध करतें तें वाङ्मय; जें जीवनांत उत्कर्षाचा मार्ग दाखवितें तें वाङ्मय, जें जीवनांत मुक्तीचा मार्ग दाखवितें तें वाङ्मय.** समाजांत माता व गुरु ह्यांच्यानंतर समाजाचें मन घडविण्याचा वारसा वाङ्मयाचा आहे. आजच्या परतंत्र हिंदुस्थानला जर स्वातंत्र्याची स्फूर्ति देणारें वाङ्मय निर्माण होणार नसेल, आत्म्याची तळमळ वाढवून मुक्तीचा मार्ग जर वाङ्मय दाखवीत नसेल, गरीब व्याकुळलेली जनता दृष्टीआड करून संपत्तीनें उभारलेले इमले दाखविण्यांत जर वाङ्मय चूर असेल, तर असल्या वाङ्मयाची आजच्या क्षणाला, बुद्धीचें मुख्य खाद्य म्हणून, जरूर नाहीं. मग तें अक्षरवाङ्मय कां असेना. केवळ क्षणभर रुचिवैचित्र्य होईल तें. जीवन समृद्ध करण्याचा वाङ्मयाचा हेतु गुरुजींनीं आपल्या वाङ्मयांत आणण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. असे त्याचें वाङ्मय वाचणारा प्रत्येकजण अभिमानानें म्हणेल, यांत शंका नाहीं.

टीकेच्या बाबतींत ते स्वतः म्हणतात कीं, टीका करण्याबद्दल माझी मुळींच हरकत नाहीं; उलट टीका करणें हा टीकाकाराचा अधिकार आहे. सार्वजनिक आयुष्यांत पडणाऱ्या माणसाला गेंडा व्हावें लागतें. स्तुतीचा उन्माद नाहीं, निंदेचा खेद नाहीं. 'माझें कार्य मला पटलें, मी तें करीत राहिलों. तुम्ही त्यावर काय मत देतां ह्याबद्दल मी बेफिकीर राहीन.' अशी वृत्ति कलावंतांची, समाजसेवकांची असावी. तरीहि कुत्सित, वैयक्तिक टीका व आरोप कोणाच्याहि मनास कष्ट देतील. टीकेंत कुत्सितपणा नसावा. टीकेंत सडेतोडपणा अवश्य हवा; पण हा सडेतोडपणा तोल झुकून कुत्सितपणाकडे जाऊं लागला, तर त्यास कोणी टीका न म्हणतां टिंगल म्हणतील, निंदा म्हणतील. टीका मारक नसून मार्गदर्शक असावी, असें त्यांचें म्हणणें आहे.

साहित्याच्या बाबतींत साने गुरुजी देश, धर्म, भाषा इत्यादि भेद मानीत नाहींत. जें जें म्हणून उत्कृष्ट साहित्य आहे, तें तें साऱ्या जगताचें आहे— मग तें कोणत्याहि देशांतलें असो, कोणत्याहि धर्मपंथाचें असो वा कोणत्याहि भाषेंतील असो. वाङ्मय भेदातीत आहे. या मतानुसार त्यांनीं त्यांच्या मतें

उत्कृष्ट असें परदेशी वाङ्मय आपल्या मायबोलींत आणण्याचा प्रयत्न केला आहे. तामीळ, तेलगु, फ्रेंच, ब्रिटिश, चिनी लेखकांचें सुद्धां वाङ्मय त्यानीं बहुजनसमाजासाठीं व बहुजनसमाजाला उमजेल अशा तऱ्हेनें मायबोलींत आणलें आहे. ह्याबद्दल मराठी वाचक त्यांचे खासच ऋणी रहातील. असो. गुरुजींचा साहित्यविषयक दृष्टिकोन त्याच्याच शब्दांत सांगावयाचा झाला तर तो असा सांगतां येईल.

" साहित्य शब्दाचा अर्थ जीवनाशीं एकरूपता. आपले अनुभव दुसऱ्याला सांगावे, आपलीं सुखदुःखें दुसऱ्याबरोबर अनुभवावीं, या सामाजिक वृत्तींतच वाङ्मयनिर्मितीचा उगम आहे. कोणत्याहि कालातील मनुष्याच्या सर्वोत्तम गुणाचीं आख्याने म्हणजेच वाङ्मय. जीवन आणि वाङ्मय याची फारकत होऊंच शकत नाहीं. जीवन वाङ्मयासाठी भुकेले आहे.

हृदयांत प्रसन्नता उत्पन्न करण्याचा गुण वाङ्मयात असला पाहिजे. वाङ्मय म्हणजे मनाचा आहार. खाण्यापिण्याच्या आहाराचे आपण नियंत्रण करतों. सात्विक आहार घेण्याचा प्रचार करतों. आपणांस शारीरिक स्वास्थ्य हवें असतें, त्याप्रमाणें मानसिक सामर्थ्य वाढविण्यासही आपणांस मानसिक आहाराची म्हणजेच वाङ्मयाची काळजी घेतली पाहिजे. समाजाचें मानसिक बल वाढविणारें वाङ्मय जीवनोपयोगी असतें.जगाला आनंद देणारें, जगाची पुरोगामी पुनर्घटना करण्याची दिशा दाखविणारें लिखाण म्हणजे वाङ्मय. वैयक्तिक हित व सामाजिक हित याचा संबंध कलावंतानें जोडला पाहिजे.

सभोंवार पसरलेल्या अन्यायाचा प्रतिकार हें वाङ्मयाचें कार्य. जीवनाचा कोणत्याहि प्रकारचा दुबळेपणा नष्ट होईल अशा प्रकारचें लिखाण लिहिलें गेलें पाहिजे. जीवनाशीं एकरूप होऊन लिहिलेलें जें वाङ्मय तें भावनांनीं भरलेलें व प्रत्यक्ष अनुभवानें थबथबलेलें असतें. "वाङ्मयाला मीं वाहून घेतलें, याचा अर्थच मला कळत नाहीं; जीवनाला मीं वाहून घेतलें याचा अर्थ मला समजतो. जीवनाला वाहून घ्या. त्यांतून वाङ्मय निर्माण होईल. जीवनाच्या उपासनेंतून ज्ञानप्राप्तीची व दुःख दूर करण्याची शक्ति गांधींच्या वाङ्मयांत आहे. "

" आजचें वाङ्मय हें लोकवाङ्मय नव्हे. खऱ्या वाङ्मयाचा उगम प्रक्षोभांतूनच होतो. साने गुरुजींचें वाङ्मय हें अशा प्रकारचें आहे." अशा आशयाचे श्री. काकासाहेब गाडगीळ ह्यांनीं काढलेले प्रशस्तिपर उद्गार साने गुरुजींचें वाङ्मय वाचल्यावर यथार्थ वाटूं लागतात व त्यांत तिळमात्र अतिशयोक्ति नाहीं अशी खात्री पटते.

## शैक्षणिक

उत्कृष्ट शिक्षण हें उत्कृष्ट समाजाचे दिग्दर्शक होय. हल्लींची शिक्षणपद्धति सदोष आहे व ती आहे तशीच राहील, तर आपल्या राष्ट्राला प्रगतीची फारशी आशा नाहीं. ह्याबाबत सर्वांचें एकमत आहे व म्हणून प्रत्येक विचारवंत त्या पद्धतींत सुधारणा सुचवीत आहे. गुरुजीनी शिक्षक म्हणून कांहीं वर्षें काम केले आहे; म्हणून त्यांचा शैक्षणिक दृष्टिकोन पाहणें विशेष महत्त्वाचें आहे. पुष्कळाना त्याच्या शिक्षणविषयक दृष्टिकोनांत प्रतिगामीपणा दिसून येईल. अजूनहि शिक्षणाच्या बाबतींत आश्रमपद्धति आली, तर गुरुजींना फार आवडेल. निसर्गाच्या विशाल वातावरणांत मुले शिक्षण घेतील तर तें जास्त योग्य होईल. ' छडी लागे छम्‌छम्, विद्या येई घम्‌घम्. ' हें त्यांना मुळींच कबूल नाहीं. उलट अशी शिक्षा केल्यानें मुलें मठ्ठ व हट्टी बनतात असें त्याना वाटतें. ' विश्राम ' ह्या लघुकथासंग्रहांतील ' शशी ' ह्या गोष्टींत त्यानीं हें स्पष्टपणें प्रतिपादिलें आहे. मुलांच्या मनाचें नाजुक रोपटें चार भिंतींत पूर्णतया कसें विकास पावेल ? शिक्षक हा एक माळी आहे. त्याच्या बागेत त्यानें हीं फुलें किती हळुवारपणें, प्रेमळपणें व सावधानतेनें फुलवावयास हवींत ! फुलाना कीड लागूं नये, त्यांना सुगंध यावा, ह्याची माळ्याने अतिशय काळजी घ्यावयास हवी, कारण त्या फुलांना जगतांत जो सुगंध पसरावयाचा असतो, तो ह्या माळ्याच्या सावधानतेवर अवलंबून असतो. निसर्गाच्या संगतींत हें कर्तव्य उत्कृष्टपणे पार पाडतां येईल असा गुरुजींना विश्वास वाटतो. कै. गुरुवर्य टागोर ह्यांची ' शांतिनिकेतन ' ही संस्था अशा तऱ्हेनें शिक्षण देणारी आहे. निसर्गाच्या सान्निध्यांत येथें कलांचें शिक्षण देण्यात येते, म्हणूनच ह्या सस्थेबद्दल गुरुजींना अतिशय प्रेम वाटतें. चार भिंतीत घेतलेल्या शिक्षणानें आम्ही संकुचित वृत्तीचे होतों; कुत्र्यामांजरांना

भितो. निसर्गाच्या सहवासात मन विशाल होतें. हिंस्र पशूंवरहि प्रेम करण्याइतकें तें निर्भय होतें, असें गुरुजींचें मत आहे.

बालवयांतील पाठांतरावरहि त्यांचा विश्वास आहे. लहानपणीं रामरक्षा, सुंदर सुभाषितें व श्लोक पाठ असावेत असें त्यांना वाटतें. बालवय हें पाठांतराचें वय असून मोठेंपण हें विवेचनाचें वय आहे. सध्यांच्या शाळा, महाशाळा ह्याच्याबद्दल त्यांच्या मनांत असमाधान असून, त्या शाळा म्हणजे थडगीं आहेत असें ते स्पष्टपणें म्हणतात. जीवन पेटविण्याचें सामर्थ्य हल्लीच्या शिक्षणांत नाहीं. ज्या वृत्तींचा नाश व्हावा म्हणून शाळेत शिक्षण दिलें जावें, बरोबर त्याच वृत्ति शाळांतून पोसल्या जातात. ज्या पवित्र मंदिरांत पाऊल टाकल्यावर गरीब श्रीमंत हे भेद विसरले जावेत, भूतदया, शालीनता हे गुण शिकवले जावेत, त्या पवित्र मंदिरांत शिक्षकांकडूनच प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें हा गरीब, तो श्रीमंत अशा तऱ्हेची जाणीव करून देण्यांत येते; द्वेष प्रदीप्त केला जातो. वास्तविक जेथें आत्मविश्वास जागृत व्हावा, तेथेंच उरलासुरला मूळचा आत्मविश्वास दडपला जातो. जेथें ज्ञानाची भूक लागावी, तेथें ती मारली जाते. हे शिकावें, तें शिकावें असें जेथें वाटावयास हवें, तेथें आहे तेंच शिकण्याचे मुलांना कष्ट वाटतात. हल्लींच्या विद्यापीठांबद्दलची आपली नापसंती गुरुजींनीं अतिशय जहाल शब्दांत व्यक्त केली आहे. विद्यापीठांसंबंधीं ते म्हणतात, “ मुलांच्या जीवनांना भरडणारा हा प्रचंड कारखाना आहे. निःसत्व व निरानंद करणारें हें राक्षसी यंत्र आहे. हीं विद्यापीठें शरीराकडे लक्ष देत नाहींत, हृदयाची त्यांना जाणीव नाहीं. तीं आत्म्याला मानीत नाहींत. डोक्याचा विकास करावयाचा हें त्यांचें ध्येय असतें; परंतु डोक्याचा विकास होण्याऐवजीं डोक्यांचीं खोकीं होत आहेत. ह्या शिक्षणसंस्था नाहींत. हीं थडगीं आहेत. मढीं मढींच निर्माण करणार ! जीवनानें जीवन पटेल ! मढ्यानें मढें तयार होईल !”

ह्या शिक्षणसंस्थांत ज्ञानाची धग नाहीं, ध्येयवादाची ऊब नाहीं, स्वाभिमानाचा किरण नाहीं, सहानुभूतीचा बिंदु नाहीं, मानसशास्त्रांचें खरें दर्शन नाहीं, आसमंतांतल्या जगाचें भान नाहीं, उत्साह नाहीं, तेज नाहीं, प्रयोग

नाहीं, प्रेम नाहीं, ओलावा नाहीं, आस्था नाहीं, उत्कटता नाहीं, कांहीं नाहीं ! कांहीं नाहीं ! या संस्थांतून एकच दिसेल. सरकारची व श्रीमंतांची हाजी हांजी करून पैसे मिळवावयाचे व दगडांवर दगड रचून टोलेजंग इमारती उभारावयाच्या. या टोलेजंग दगडांखालीं हजारों मुलाचीं मनें दडपलीं जातात. हजारों मुलाचे समुचित उत्साह, त्यांच्या आशा-आकांक्षा, त्यांच्या प्रतिभा, त्याच्या स्फूर्ति, सारे सारें उध्वस्त केलें जाते. मुलाचा स्वाभिमान संस्थांना सहन होत नाहीं."

मुलांचीं मने हा महत्त्वाचा भाग आहे. पुढच्या आयुष्याची बांधणी, भावी पिढीची तयारी या शिक्षणावर होत असते. ह्या दृष्टीनें शिक्षणाची किती मोठी किंमत आहे हें शिक्षणसंस्थांनी विसरतां कामा नये. विद्यादान हा व्यापार नाहीं, विद्यापीठ हा बाजार नाहीं. शाळा ही राष्ट्रतेजाची जननी आहे. येथें जे रुजवाल तें राष्ट्रात उगवेल. उत्कृष्ट आणि अतिशय उदात्त अशा कामाचा हा केलेला चुथडा गुरुजींना उघड्या डोळ्यांनीं पाहवत नाहीं. राष्ट्राची ही झालेली पद्धतशीर अवनति त्यांच्या भावनाप्रधान मनाला लागते, टोंचते.

जो इतिहासाची सनावलि मुलापुढें न ठेवतां ऐतिहासिक तेजस्वी पुरुषांचा कित्ता मुलापुढें ठेवतो, तो उत्कृष्ट शिक्षक. काव्यातील उच्च व उदात्त वातावरण, उच्च व उदात्त भावना मुलांच्या मनावर ठसवील तो उत्कृष्ट शिक्षक-विद्यार्थ्यांच्या मानेवर अभ्यासासाठीं खडा न ठेवतां, जो त्याना ज्ञानाची खरी गोडी लावतो, तो खरा उत्कृष्ट शिक्षक. स्वतःच्या व इतरांच्या झालेल्या चुका आपल्यापुढील विद्यार्थ्यांना टाळावयास जो शिकवील तोच खरा शिक्षक. भूतकाळांतील उज्ज्वलतेची भविष्यकाळाच्या आशेशीं सांगड घालताना वर्तमानकालीन जीवनाबद्दल विद्यार्थ्यांना जागृत ठेवतो, तो खरा उत्कृष्ट शिक्षक. एका पणतीनें हजारों पणत्या लावून पुष्कळ प्रकाश पाडावा, तसें एका चांगल्या शिक्षकानें एक उत्कृष्ट पिढी निर्माण होईल.

## निसर्गविषयक

रा. साने गुरुजींच्या ललितलेखनांत वाचकांना कांहीं निसर्गवर्णनें आढळून येतील. मधून मधून निरर्थक निसर्गवर्णनें नसल्यास कोणतीहि कादंबरी

पूर्ण होऊं शकत नाहीं अशी कल्पना मनांत बाळगून गुरुजींनीं वर्णनें केलेलीं नाहींत. माझे मित्र श्री. नांदेडकर म्हणतात त्याप्रमाणे श्री. फडके ह्यांनीं केलेल्या लोणावळा स्टेशनाच्या वर्णनाप्रमाणे गुरुजींनी केलेले कोणतेहि वर्णन अमर ठरणार नाहीं. कथेच्या ओघास बांध घालणारीं व लांबलचक अशीं ती वर्णनें असतील: परंतु त्यात मनोरमता असते यात शंका नाहीं. त्यांच्या निसर्गवर्णनात कांहीं विशेष आपणास सूक्ष्म अभ्यासानें आढळून येतील. अशीं वर्णने आलीं कीं वाचकांस पाने उलटण्याची गर्दी होत नाहीं. त्या त्या कथानकात त्या त्या वर्णनाने 'वस्तु'च्या दृष्टीनें विशेष काही साधेलच असे नाहीं. बऱ्याच वेळा तर तीं वर्णने स्वतंत्र वर्णनात्मक निबंध म्हणूनही सुंदर ठरतील; पण कथावाचनाच्या घाईत वाचक हीं वर्णने सोडून देत नाही. हीं वर्णनें वाचल्यास असे दिसून येईल की, गुरुजींना निसर्ग म्हणजे एक हृदयाच्या समाधानाची जागा वाटते. गंगेच्या पाण्याच्या शीतल स्पर्शानें त्यांच्या मनास शांति मिळते. नदीत त्याना परमेश्वराची दया दिसते, आईची मूर्ति दिसते. नदीच्या खळखळाटात त्यांना अमर आशागीत ऐकूं येते. निसर्ग हाच मनुष्याचा शिक्षक असावा असेंही त्याना कधीं कधीं वाटते. समुद्राचें गंभीर स्वरूप त्यांना गंभीरतेची शिकवण देतें. संतापलेली 'पद्मा' त्यांना तेजधर्म शिकविते. स्वतः ऊन सोसून जगाला सावली देणारे वृक्ष त्याना स्वार्थत्याग शिकवितात. नदी त्यांना ध्येयाचा पाठलाग करण्याचें शिकविते, स्वच्छतेचे धडे देते, निसर्गापासून ते भेदाची अनिष्टता व कार्याची चिकाटी शिकतात. 'सूर्य कधीं म्हणतो का कीं, मी गरिबाना प्रकाश देणार नाहीं म्हणून ? नदी कधीं म्हणते मी गरीबांना जीवन नाहीं देणार ? निसर्ग भेदाभेद करीत नाहीं, कधीं कर्तव्य सोडीत नाहीं. सूर्य कंटाळून लवकर मावळत नाहीं, नदी कंटाळून वाहण्याचें सोडीत नाहीं. अशा रीतीनें निसर्गात सर्वत्र मानुषत्व दृष्टोत्पत्तीस पडतें. कोणत्याहि मानवी सद्गुणांचा धडा या निसर्गाचार्याकडे घ्यावा असेंच जणूं गुरुजी समजतात.

महत्त्वाची गोष्ट ती ही कीं, निसर्गात त्यांना परमेश्वराचें अस्तित्व दिसतें. आंग्लकवि वर्डस्वर्थ ह्यांस निसर्गांत देवाचें अस्तित्व जाणवे. गुरुजींचेंहि तसेंच आहे. निळ्या सागराला पाहून चैतन्यांना कृष्ण दिसूं लागतो. गुरुजी-

मुद्दां प्रत्येक वेळीं या निसर्गातील परमेश्वराचें भक्तिभावानें दर्शन घेतात. नदीला ते परमेश्वराची दया म्हणतात, पावसाला ते परमेश्वराचें प्रेम समजतात. एवढेंच नव्हे, तर निसर्ग ही एक परमेश्वराची मोठी देणगी आहे, असेंहि ते समजतात.

निसर्गाच्या सान्निध्यांत, आकाशाखालीं शिक्षण घेतल्यानें मन विशाल व प्रेममय होतें अशी गुरुजींची खात्री आहे. जुन्या काळचें आश्रमांतील शिक्षण त्यांना या गोष्टीमुळें फार आवडतें. निसर्ग म्हणजे त्यांना जीवनांत एक मोठा आधार वाटतो. निसर्गांत क्षणोक्षणी त्यांना परमेश्वराचें अस्तित्व दिसतें आणि त्यामुळेच निसर्ग हा एक स्फूर्तीचा, आशेचा व प्रीतीचा अखंड झरा आहे असें त्यांना वाटतें.

## अखेर

इतका विशाल व प्रगतिशीर दृष्टिकोन त्यांच्या विशाल हृदयाची साक्ष देतो. ते साहित्यिक नसून थोर कळकळीचे कार्यकर्ते आहेत. साहित्य हें एक लोकजागृतीचें प्रभावी साधन आहे असें ते मानतात व त्या दृष्टीनें ते लिखाण करीत असतात. आपली सारीं तत्त्वें बहुजनसमाजाला सहज समजावीत इतक्या सुलभतेनें त्यानीं तीं आपल्या साहित्यांतून पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं व्हॉल्टेर, रुसो ह्यांनीं ज्या पद्धतीनें साहित्याच्या आधारें लोकजागृति केली, तीच पद्धत अवलंबिण्याचा गुरुजींचा प्रयत्न आहे. स्वतःचें म्हणून जें ध्येय त्यांनीं ठरविलें, त्याला प्रेरक अशा ज्या गोष्टी त्यांनीं ठरविल्या, त्या त्यांनीं जगापुढें ठेविल्या. प्रत्येकाला पटेल तेवढें तरी निदान प्रत्येकानें घ्यावें असा त्यांचा आग्रह आहे. ते नुसतेच साहित्यिक असते, तर त्यांनीं आपलीं मतें दुसऱ्याला पटवून देण्यासाठीं इतका आटापिटा केला नसता. परंतु जगानें त्यांच्या सांगण्यापैकीं पटेल ते आवश्यक उचलावें, अशी त्यांची आंतरिक तळमळ आहे.



## श्री. साने गुरुजी व स्त्रीसृष्टि

रात्रीं १० वाजण्याची वेळ. एक पत्र वाचीत होतें. प्रथम डोळ्यांवर विश्वासच बसेना. मास्टर विनायकचें पत्र ? साने गुरुजींना ? स्त्रीगीतांबद्दल ? ही आश्चर्यश्रेणी माझें कुतूहल जागृत करीत होती. मी पत्र वाचूं लागलें.

" गु. साने गुरुजी यांचे सेवेशीं सादर प्रणिपात.

आपली व माझी ओळख नाही ! माझें दुर्दैव कीं यापूर्वी मी आपलें लिखाणही वाचूं शकलों नाहीं.—अगदीं अनपेक्षित मन्वंतरचा अंक हातीं आला. ' मायलेकरें ' या लिखाणांतील रस चाखूं लागलों. वाचतां वाचतां अक्षरशः हृदय भरून आलें. मला नकळत डोळ्यांवाटें अश्रु वाहूं लागले. मला जो भेटे त्याला मीं सांगितलें हें लिखाण वाच. पोथीपुराणें वाचून पापें-सुद्धां धुतलीं जातील असें आपण वाचतों. पण हें वाचतांना—या मंगल बालवेदांच्या पठनानें तीं धुतलीं जातात असा प्रत्यक्ष अनुभव येऊं लागतो —वात्सल्यानें हृदय भरून येतें. आसमंतात् मांगल्य दरवळून येतें. विद्वत्तेनें भरलेल्या पुस्तकांतून-ग्रंथांतून-जी कल्पना येत नाहीं, ती हिंदुधर्माच्या संपन्न हृदयाची कल्पना आपल्या या लेखांकांतून येत आहे. जिला आपण ' आपली संस्कृति–आपली संस्कृति ' म्हणून डोक्यावर घेऊन नाचायला हवें, ती ही. आपल्या संस्कृतीची ही संपदा विसरली जात आहे. आपण ही संपदा गोळा करून आम्हाला दाखवीत आहांत. आम्ही सदैव तुमचे ऋणी राहूं.

आपला नम्र

**विनायक**

हंस पिक्चर्स, कोल्हापूर. "

विनायकांच्या पत्रांतील सत्याबद्दल किंचित् साशंक होतें. खरोखरच का हीं ओव्यांचीं गांठोडीं आपल्या संस्कृतीची संपदा आहे ? पुस्तक वाचायला सुरुवात केली. ओव्यांतील भाव आणि काव्य ह्यांची माझी थोडीशी तोंड-ओळख. मला ओंव्या आवडतात. म्हणून मी ओंव्यांच्या चालीवरच त्या ओंव्या म्हणावयास सुरुवात केली. ती रात्र मी केव्हांच विसरणार नाही. ओंव्या वाचीत होतें. डोळे पुशीत होतें. शेवटीं ओंव्या वाचतवना. इतके दिवस वाटे, एका बैठकीला जें पुस्तक खालीं न ठेवता वाचून टाकावेंसें वाटतें, ते उत्कृष्ट. पण हा अनुभव त्या रात्रीं प्रथमच आला, की एका ओंवी-वरून दुसऱ्या ओवीकडे जायला अंतःकरण शांत व्हावयाची वाट पाहावी लागते. ओव्या म्हणजे उत्कृष्ट भावगीते—केवळ भावगीते. विद्वान वर्गानें रचलेल्या काव्यांत फार साफसफाई. त्याचे लिखाण म्हणजे बुद्धीच्या आगींत तावून सुलाखून घेतलेले बावनकशी सोनें. पण ही स्त्रीगीतें म्हणजे सोन्याची खाणच प्रत्यक्ष. हिच्यातील धातु बुद्धीच्या अग्नीनें निर्मळ केला गेला नाहीं म्हणून सुवर्णाचें मोल का बदलेल ? ह्या ओंव्यांतून वेळप्रसंगीं यमकानु-प्रासाची भानगड साधलेली नसेल; पण म्हणूनच कृत्रिमपणाचा स्पर्शही न झालेली ही स्त्रियांची शुद्ध भावगंगा आहे. कोणालाही कधीं 'स्त्री' उत्कृष्ट रंगवितां आली नसेल. या ओंव्याच्या आदर्शात तिचें खरेंखुरें प्रतिबिंब पडलें आहे. या मनोरम चित्रलेखनापुढें सृष्टीच्या महान् चित्रकारानेंही हात टेकावेत. ज्ञानेश्वरांच्या ओंव्याप्रमाणे, "अमृतातेंही पैजा जिंके" अशी प्रौढी मिरवायला या ओंव्याहि समर्थ आहेत. कालिदासाची 'धन्यास्तदंगरजसा मलिनी भवन्ति' ही ओळ वाचतांच एक जर्मन भाषाशास्त्रज्ञ नाचला म्हण-तात. या ओंव्या वाचतांच तो वेडापिसा बनला असता. प्रसिद्ध जर्मन कवि गटे आपल्या पत्नीला म्हणाला होता कीं, 'ऐश्वर्यं यदिवाञ्छसि प्रियसखे शाकुं-तलं सेव्यताम् ।' त्याने प्राकृतभाषेचा अभ्यास करून या स्त्रीगीताचें वाचन केलें असतें तर 'ऐश्वर्य यदिवांच्छसि प्रियसखे स्त्रीगीतिकाः सेव्यताम्-' असेंच तो खास म्हणालां असता. ओंव्या म्हणजे स्त्रियाचे वेद आणि गंमत अशी कीं वेदांप्रमाणेच त्याही अलिखित आणि अक्षरशः अपौरुषेय आहेत व पाठां-तरानेच त्या आजवर स्त्रीसमाजांत गाजलेल्या आहेत. मास्टर विनायकांनीं त्यांना दिलेले बालवेद हें नांव मला एकदम पसंत पडलें. महाकाव्यें, इतिहास

याप्रमाणेंच यांत सांस्कृतिक जीवनाचा इतिहास स्पष्टपणें दिसून येतो. असला हा आमचा अमोल रत्नाचा ठेवा आम्हास गुरुजींनीं दिला ह्याबद्दल साहित्य त्यांचें ऋणी राहील; पण आम्हीं त्याचे आभार मानण्याचा औपचारिकपणा दाखविला, तर त्याच्या हृदयाला यातना होतील. ' तुझें आहे तुजपाशीं, परि तूं जागा चुकलासी ' ह्यासारखी आमची आजपर्यंत स्थिति होती. आम्ही जणूं आमचा सांठा शोधीत फिरत होतों; पण म्हणतात ना ' कांखेंत कळसा नी गांवाला वळसा. ' खरें भांडार आमच्याजवळ होतें आणि आम्ही जगभर मुशाफरी करीत होतों, ' तिळा उघड ! ' म्हणतांच गुहा उघडावी तसें गुरुजींनीं स्त्रीजीवन हें पुस्तक लिहून आमच्यापुढें आमचेंच भाण्डार खुलें केलें आहे. तेथील रत्नप्रकाशांत आम्हांला आमची वाट सांपडली आहे. साऱ्या साहित्यिकांचें लक्ष लागावें अन् डोळे दिपावेत अशीं अमोल रत्नें आमच्याजवळ आहेत हें आम्हां वेड्या गबाळ्याना आतां समजलें. गुरुजींच्या ह्या सत्कार्याची फेड कृतीनेच जर आम्हांस करिता आली, तरच त्यांच्या श्रमाचें सार्थक होईल. आमचें कल्याण व्हावे ह्याबद्दल गुरुजींना केवढी कळकळ. स्त्रीहृदयाचा शोध घेण्याची अपार तळमळ. स्त्री वास्तविक कशी आहे ही गोष्ट वेगळी; पण ती देवी आहे अशी गुरुजींना आंतरिक खात्री. त्या त्यांच्या कल्पनेप्रमाणेंच त्यांनीं आपलीं स्त्रीपात्रें रंगविलीं आहेत, हें त्यांच्या इतर लिखाणांतून कोणासही दिसून येईल. स्वभावाचा पूर्ण आविष्कार कादंबरींतून होणें सुलभ असतें, म्हणून गुरुजींनीं आपल्या कादंबऱ्यांतून रंगविलेल्या निवडक स्त्री-पात्रांचा अभ्यास जास्त उपयुक्त ठरेल. त्यांच्या स्त्रीपात्रांचा अभ्यास करणें म्हणजेच त्यांच्या स्त्रीविषयींच्या कल्पना अजमावणें होय.

'चित्रा अन् चारु' या छोट्या कादंबरींत रंगविलेली चित्रा म्हणजे एक मनोरम चित्रच. दिसायला सुंदर चित्रासारखी; स्वभावानें धीट पांखरासारखी. हृदयानें मऊ रेशमासारखी. तिचें इतकें अपार प्रेम चारूवर कीं त्याच्यासाठीं घरांत सासूचा छळ ती घट्ट मनानें सहन करी. पतीच्या दोनच गोड शब्दांनीं ती सारे कष्ट, सारें दुःख विसरून जाई.

" सासूचा सासुरवास । सारा मनांत गिळीतें । कंथाशीं हांसतें । चित्राताई । माझें सारें दुःख । मी ग मनांत ठेवीन । कंथाला पाहून । गोड

गोड मी हासेन ॥ होवो माझें कांहीं । मला नाहीं त्याची पर्वा । माझा कंथा ग रहावा आनंदांत ॥ ” अशीच जणूं तिची निष्ठा. स्वतः कष्ट सोसून दुसऱ्याला हंसविणारी चित्रा. चारूसारख्या गोड मुलाला जन्म देणारी माता फार दिवस डंख धरूं शकणार नाहीं ही तिची खात्री; म्हणून ती निर्भयपणें पतीबरोबर सासरीं आली. चारूच्या जीवनात तर ती म्हणजे एक संगीत होतें. चित्राची मैत्रीण फातमा प्रेमळ. धर्मभेदापेक्षां प्रेमळ हृदयावर दोन्ही मैत्रिणींचा अढळ विश्वास. फातमा ही मुसलमान स्त्री रंगविली असली, तरीही जगांत येथून तेथून स्त्रीहृदय तें सारें एक. ती हिंदु स्त्री दाखविली असती तरी त्यांतील कोणतेही रंग बदलावे लागले नसते; पण तिला मुसलमानी पेहेराव देऊन हेंच जणूं गुरुजींना दाखवावयाचें आहे कीं धर्मभेद विसरून स्त्री फक्त स्त्रीचेंच हृदय जाणते.

‘ यति कीं पति ’मधील मुक्ता म्हणजे खरोखरच मोतीं. विजयवर तिचें प्रेम असतें, पण मत्सरानें सूड घेणाऱ्या सुमुखवर सूड घेऊं पहाणाऱ्या विजयला पापापासून परावृत्त करण्याचें कर्तव्य मुक्ता विसरली नाहीं. पति यति होऊन आला, तरी किती शात होती ती ! स्त्रियांचें प्रेम सौख्यलालसेसाठीं नसतें, असेंच जणूं ती शिकविते. दुसरी प्रधानकन्या सुलोचना एक क्षणभरच विजयच्या आयुष्यांत आली, पण त्यांतही तिच्या स्त्रीत्वाची चमक दाखविण्यास गुरुजी विसरले नाहींत. दारू पिणारा, वेश्यांकडे जाणारा विजय उघडया डोळ्यांनीं पाहण्यापेक्षां विजय मेला तरी पत्करलें असें तिला वाटतें. पुरुषांचा अधःपात म्हणजे जणूं स्त्रीचें मरण. ‘गोड शेवट’ मधील इन्दू , कावेरी आणि इंदिरा हीं तीन्हीहीं स्त्रीपात्रें दुय्यम दर्जाचीं असलीं, तरी पतीच्या कर्तव्यक्षेत्रांत सुद्धां समरस होणाऱ्या स्त्रीहृदयांचे ते नमुने पाहून गहिंवरून आल्याखेरीज राहत नाहीं. प्रीतीनें जगन्नाथाला जगविणारी, त्याच्या मुशाफरींत कष्ट सहन करूनही उत्साहानें भाग घेणारी करुणरम्य कावेरी, मित्रप्रेमासाठीं विरहावस्था सोसूनही मित्राला शोधायला जाण्याची परवानगी देणारी प्रेमळ इन्दु आणि अतिशय संकटांनीं नि दुःखांनीं त्रस्त झालेल्या जगन्नाथाला पुन्हां शान्तता देणारी क्षमाशील इंदिरा, हीं पात्रें मनावर अनावर परिणाम केल्याखेरीज राहत नाहींत. ‘आस्तिक’ कादंबरींतील स्त्री-पात्रें अतिशय रेंखीव व उत्कृष्ट रेखाटलेलीं आहेत. सुश्रुता म्हणजे एक वयोवृद्ध पण

पोळलेली स्त्री. 'ज्याचं जळतं त्यालाच कळतं' असं म्हणतात. सुश्रुतेच्या 'जीवनाची वेल' या जातिभेदाच्या वणव्यापायींच सुकून वाळून गेलेली. नागजातीला दूर न लोटणाऱ्या किंबहुना त्यांच्या कल्याणाकरितां झटणाऱ्या पतीची ती पत्नी आणि तशाच सहृदय पण शौर्यशाली पुत्राची ती आई. सारें जग जातिभेदानें जळत असतां वृद्ध असूनही पोळलेल्या जीवाच्या काळजीनें ती अतिशय उदारमताची झालेली. स्वतःच्या नातीला सुद्धां नागपुत्राशीं विवाह करण्याची संमति देणारी अन् त्यांच्याच सुखांत गुंगून जाणारी सुश्रुता पाहिली, कीं वत्सलेचा हेवा वाटल्याखेरीज राहत नाहीं. निसर्गतः उदार असणारी स्त्रीच कोणत्याहि उदार तत्त्वांना उदारपणे कवटाळील असें का गुरुजींना म्हणावयाचें ? वत्सला म्हणजे तर प्रेमाच्या अद्वैताची संस्कृति प्रस्थापित करावयास निघालेली ललना आहे. पतीच्या खांद्याला खांदा भिडवून प्रेमाचे साम्राज्य पसरवीत फिरणारी वत्सला नागानंदाच्या मुरलीच्या सांथीनें जें जीवनसंगीत गाते, तें युगायुगांतून दुमदुमत राहील यात शंका नाहीं. मातृसुखाचे सुवर्ण हातांत असूनही ती तें आस्तिकऋषींच्या खजिन्यांत पोंचते करतें व कर्तव्याची ज्योत ती जागती ठेवते. कृष्णी ही नागकन्या आपल्या नेभळ्या प्रियकरालाही निर्भय बनविते. कृष्णी व वत्सला या प्रीतीच्या भक्तिणी असल्या, तरी अतिशय तेजस्वी पण आहेत. प्रियकर वाघाशीं टक्कर घेत असतां वत्सला धीर खचून परमेश्वराचा धांवा करीत बसत नाहीं; तर त्याच्या बरोबरीनें ती शौर्यशाली वत्सला वाघिणीला धैर्यानें तोंड देते व आपल्या पराक्रमी पतीच्या शौर्याला साजेलसा पराक्रम करून विजयी होते. कृष्णी तर राजपुरुषांच्या जुलुमांना प्रतिकार करतांना जळतें कोलीत हातांत घेऊन साऱ्या जनसंमर्दाला तेजाची व त्यागाची शिकवण देते. प्रेम निर्भय असतें; प्रेम पराक्रमी असतें; प्रेम मरणाला भीत नाहीं; या तेजस्वी प्रीतीच्या ज्योति प्रत्येक स्त्रीहृदयांत प्रेमाची अन् तेजाची ज्योत प्रज्वलित केल्याखेरीज राहणार नाहींत. 'क्रांति' म्हणजे तर अमोल स्त्रीरत्नांची खाण. त्यांतील कोणतीही स्त्री म्हणजे तेज, त्याग व प्रेम यांचीच जणूं घडवलेली मूर्ति. या क्रांतीमध्यें क्षणभर देखील सामील झालेल्या स्त्रीनें तो आपला क्षण अमर करून ठेवला आहे. पार्वतीची ती पतीच्या रक्ताचा सौभाग्यतिलक लावलेली, सतीचें वाण घेऊन

निघालेली मूर्ति महाराष्ट्रीयच काय, पण साऱ्या जगतीतलावरच्या स्त्रियांच्या हृदयांत क्रांतीचा ध्वज रोंवल्याखेरीज राहणार नाहीं. खरोखर प्रांताप्रांतांतून अशा पार्वती निर्माण झाल्याखेरीज क्रांति अगदीं अशक्य आहे. य:कश्चित मजुराची बायको म्हणून आजवर जग पार्वतीकडे तुच्छतेनें पाहत असेल; पण अन्यायाविरुद्ध चवताळलेली ही नागीण, ही स्त्री काय करूं शकते याची जाचक जाणीव जगाला खासच करून देईल. अन्यायानें, अवमानानें चिडलेली ही रणरमणी वाचकाना भयचकित केल्याखेरीज राहणार नाहीं. तशीच ती शान्त गीता. मृत्यूच्या दारांतही शांततेनें चाललेलें तिचें गीतावाचन तिच्या नावाला सार्थच करतें. शान्ता–मोहनचे प्राण स्वर्गारोहण करीत असताना जणूं त्या क्षणाचें पावित्र्य गीता गात होती. जें गीतानें केलें, तीच गीतेची शिकवण. ती तिच्या रोमरोमात जणूं भिनलेली होती. मृणालिनी म्हणजे उच्छृंखल, पण शुद्ध भावमय बंगाल. बंगाली भाषेचें कौतुक करताना तिला साऱ्या बंगाली वैभवाची अन् साऱ्या बंगाली त्यागाची आठवण येते. बंगालपुढें तिला सारें जगत् तुच्छ वाटतें. बंगालविषयीं तिला जळजळीत अभिमान. स्वभावानें मात्र अगदीं लहान मुलासारखी. चटकन रुसेल; चटकन हंसेल. बंगालची छोटी आवृत्तिच ती. त्यानंतर क्रांतीचा एक 'गोडबोल्या नि गोड दिश्या' सेवक म्हणजे मीना. मुकुंदरावांच्या पुनर्जन्मांत खऱ्या मीनेचा जन्म झाला. त्यानंतर तिच्या सेवामय जीवनाला प्रारंभ झाला. मुकुंदरावांचा पुनर्जन्म आणि स्वतःचा व मुकुंदरावांचा मृत्यु हे तिच्या आयुष्यांतील अमर क्षण. मुकुंदरावांच्या पुनर्जन्मामुळें ती आनंदमूर्ति बनली. त्यांच्या श्वासोच्छ्वासानें तिच्या हृदयांत पडसाद उमटत. मुकुंदराव दर क्षणाला जो रंग तिच्या जीवनांत भरतील, त्या रंगानें भोंवतालच्या प्रदेशांत रंग भरणें हें तिचें काम.

मीनेनें मुकुंदरावांची केलेली सेवा म्हणजे एक गुप्त दान होतें. इतकें त्यागमय प्रेम त्यांच्यासारख्या त्यागमूर्तींनाच साधणार. मीनेचा मृत्यु !... मृत्यु नव्हेच तो. तिनें आपल्या त्यागानें व सेवेनें मरणालाही जिंकलें; प्रत्यक्ष मरणाच्या क्षणाला, अपार संयमानें, तिनें आपल्या जीवनाचें सार्थक केलें. मायेची ओळख झाल्यानें प्रत्येकाला बंगालची माया लागल्याखेरीज राहत नाहीं. माया म्हणजे अतिगोड आणि अति समजूतदार मुलगी. प्रद्योतच्या

प्रेमाचा तिनें कठोर शब्दांनीं अव्हेर केला नाहीं. एवढेंच काय, पण विवाह झाल्यावरही तिला प्रद्योतच्या आठवणीनें रडूं येई. प्रत्यक्ष पतीच्या प्राणावर संकट आणणाऱ्या प्रद्योतवर ती रागावली नाहीं—एवढेंच नाहीं, तर त्या विक्षिप्त मुलाला भगिनीप्रेमानें तिनें न्हाऊं घातलें. रामदास म्हणजे तर तिचा प्राणच. ती त्याला कधीं लहान लेंकरासारखें जपत असे, तर कधीं अतिशय परायणतेनें त्याची सेवा करी. जनसेवेंत कष्टणाऱ्या रामदासाचे पाय ती चुरीत असे. अतिशय लाघवी मुलगी तशीच अतिशय सुशील आणि चतुर पण. आनंदमोहन बाबूंकडे चतुराईनें केलेल्या मागणीनेंच तिच्यासारख्याच एका स्त्रीच्या–बाबूंच्या पत्नीच्या–आयुष्याचें कल्याण झालें. माया कधीं कुणाला टचकन बोलत नसे. कधीं कुणावर रागावत नसे; फार विचारी. फार शांत. शांता मात्र नांवानें शांति पण अशांतता तिच्या रक्तांत थैमान घाली. ती जरा उच्छृंखल. कामाची अन् सेवेची अपार हौस तिला; पण तिची सेवा म्हणजेच तिच्या हौशीचें काम. अत्यंत उल्हासानें ती कोणतीही गोष्ट करी. तेजस्वीही तशीच होती ती. मोहनच्या प्रेमासाठीं तिनें आईबापांचा त्याग केला. तिनें खादी, साक्षरता वगैरे सर्व चांगल्या गोष्टींची शिवतर गांवाला गोडी लावली. पण–वेडी मोहमयी शांता–क्षणएक घसरली. मोहनचें तिच्यावरचें प्रेम नि मोहननें तिच्यासाठीं केलेला त्याग ती स्वतःच विसरली. पण ही सारी चूक शांताची नव्हती; तिच्यांतील 'अशांतीची' होती. जेव्हां पुन्हां तिच्या जीवनांत शांति आली, तेव्हां तिनें 'क्रांतीला' जन्म दिला आणि मोहनला एक क्षणही दूर न ठेवतां, त्याच्यावरील अचल प्रीतीचा नंदादीप तेवत ठेवण्यासाठीं, मोहनच्या मृत्यूच्या क्षणींच आपल्याही जीवनाची आहुति दिली. मोहनची ती स्फूर्ति. मोहननें जें जें केलें त्याचें श्रेय सारें सारें शांतीला. माया अन् शांता ! ! अविस्मरणीय व्यक्ति ! ! माया म्हणजे जणूं बंगालची शांत संथ गंगा. शांति म्हणजे जीवनाची पर्वा न करतां हजारों फूट खोल निर्भयपणें उडी घेणारा महाराष्ट्राचा धबधबा. मायेंत गंगेची गंभीरता, तर शांतामध्यें झऱ्यांचा नाचरेपणा, अवखळपणा. गंगेनें शांतपणें जीवन देत पृथ्वी सुपीक करावी, तशी माया लीनपणें सेवा करीत प्रीतीची लागवड खेड्यापाड्यांतून करी. उंचावरून पडणाऱ्या धबधब्याप्रमाणें शांता ग्रामीण जीवनांत विद्युल्लतेचें तेज निर्माण करी. माया म्हणजे शीतलता, तर शांता

म्हणजे एक धगधगतें जीवन. शांतानें जमीन तापवावी, तर मायेनें जीवन ओतावें आणि पृथ्वीच्या पोटीं 'शान्ति'मय 'क्रांतीचा' जन्म व्हावा. काय करूं? कसें करूं? या विचारांत जडपणें मग्न राहणाऱ्या तरुण पिढीला माया –शांता ह्याची जोडी खासच अचूक मार्गदर्शन करील. या साऱ्या उत्कृष्ट स्त्रियांशीं गुरुजींचा परिचय असला, त्या स्त्रियाच्या आयुष्यांतील कांही क्षण त्यांनी सत्यसृष्टींत पाहिले असतील तरी अगदीं पूर्ण जवळून जिचें जीवन गुरुजींनीं पाहिलें एवढेंच नव्हे, तर तिच्या जीवनांतून त्यानी आपल्या जीवनाचे अमोल क्षण वेंचले अशी स्त्री म्हणजे आई.

इतर स्त्रियांच्या चित्रणांत गुरुजींनीं क्वचित् अस्पष्ट रंग भरला असेल; क्वचित् नको तेथें त्यांच्याकडून भडक रंग भरला गेला असेल; क्वचित् रंगसंगति कलापूर्ण नसेल; पण एकच एक निर्दोष आणि संपूर्णतया वास्तव अशी एक चित्रकृति गुरुजींनीं निर्माण केली. ती म्हणजे आईची. गुरुजींनी फक्त 'श्यामची आई' हें एकच पुस्तक जरी लिहिलें असतें, तरीही मराठी वाङ्मय सदैव त्यांचें ऋणी राहिलें असतें. त्यांत नायक-नायिकेचा गोड शृंगार नाहीं–छे छे! त्यांत मुळीं अल्लड अन् तरुण नायिकेचा प्रवेशच नाहीं. 'श्यामची आई' हें पुस्तक म्हणजे शृंगाराचा रंगमहाल नाहीं–तें एक अतिपवित्र असें मंदिर आहे आणि भक्तानें परमेश्वरापुढें मोकळेपणानें आपले दोष बोलून दाखवून पश्चात्तापानें शुद्ध झालेल्या मनानें त्या दयाघन प्रभूची करुणा भाकावी तसा श्याम आईच्या मनोमन मूर्तीसमोर आपले गुणदोष उघडपणें सागून जणूं शुद्ध होत आहे. 'श्यामची आई' म्हणजे कोंकणच्या खेडवळ अन् साध्याभोळ्या संस्कृतीच्या पार्श्वभूमीवर रंगविलेलें एक मनोहर आणि अतिशय करुणरम्य चित्र आहे.

आईचा लाडका श्याम मायदेशाचा भक्त आणि मायभाषेचा सेवक झाला याचें सारें श्रेय श्यामच्या आईला आहे. स्त्री–हृदयाचा उत्कृष्ट नमुना कोणता असें जर मला कोणीं विचारलें, तर मी विचार न करतां उत्तर देईन कीं, 'श्यामची आई.' तिच्या स्वभावचित्रांतील रंग इतक्या सुस्पष्टपणें व इतक्या सहृदयतेनें भरले आहेत कीं तें चित्र जणूं बोलून उठत आहे आणि आमच्या सांस्कृतिक जीवनाचीं गोड गीतें गात आहेत असें वाटतें. कोणत्याही प्रसंगांतील श्यामची आई आठवा; ती तुमच्या हृदयाला हात घातल्या-

शिवाय राहणार नाहीं. कुटुंबाच्या कर्जापायीं सारी धनदौलत खर्चून पति झोंपडींत आल्यानंतर त्याच्या मनाला कधींही बोचक जाणीव होऊं न देणारी; हातीं ओंवळणीचे म्हणून आलेल्या पैशाचें 'इकडे चारचौघांत फिरायचें असतें' म्हणून आपल्या फाटक्या वस्त्राकडे डोळेझांक करून पतीसाठीं धोतराचें पान आणून ठेवणारी श्यामची आई आपल्या मनावर उदात्त परिणाम केल्याशिवाय कशी राहील ? पण श्यामची आई अतिप्रेमळ असली, तरी ती क्वचित प्रसंगीं वज्रादपि कठोर आहे. आपल्या प्रेमाच्या खुंट्याला बांधून ठेवून सुद्धां ती श्यामचा विकास खुंटूं देत नाहीं. तिचा श्याम भित्रा होतां कामा नये. तिचा श्याम दुबळा होता कामां नये. तिचा श्याम दुर्गुणी होतां कामा नये. श्याम पोहावयास जाण्यास भ्याला तर ती त्याला मारील; धाकदपटशा दाखवील. श्याम चोरी करील तर तिच्या जिवाचा संताप होईल; श्यामला शिकावयाची हौस असली तर पित्याला मदत न करतां नि त्याच्या मदतीची अपेक्षा न करतां त्यानें स्वश्रमानें विद्यार्जन करावें या गोष्टीला तिची मंजुरी असते. मुलांना प्रेमानें पंखाखालीं क्षणभर घेतलें तरी त्यांनीं आतां घरट्याबाहेर पडावें; पंखांची हालचाल करावी; स्वतःच्या पंखांच्या बळावर गगनाला गवसणी घालण्याची दुर्दम्य आशा मनांत बाळगावी अशी तिला भारी हौस. तिचा श्याम कुठल्याही कामांत लाजला नाहीं. श्रम करण्याची लाज नसावी अशी तिची त्याला शिकवण; पण श्यामनें केलेल्या श्रमाचें चीज ती आपल्या प्रेमानें करी. श्याम सद्गुणी व्हावा म्हणून कोण तिची धडपड ! श्यामनें रामरक्षा लिहून काढावी, सुंदर अक्षरांत लिहावी, पाठ करावी म्हणून तिनें हरतऱ्हेनें प्रयत्न केले. तिचा श्याम केवळ तिचा पुत्र म्हणून नि तो वाढवावयाचा अशा रीतीनें वाढत नव्हता. ती त्याला स्वतःच्या कल्पनेनुसार सद्गुणी व्हावा म्हणून प्रयत्नपूर्वक वाढवीत होती. श्याम म्हणजे जणूं गुलाबाचें रोपटें. तें काय अंगणांतलें झाड होतें कीं तें नुसता वारा पिऊन ऊन खात वाढेल ? तें एक बागेंतलें गुलाबाचें रोपटें. त्याला गुणांचीं फुलें यावयाला हवीं होतीं; सद्गुणांचा गंध पसरावयाचा होता, त्याच्यावर का मग कुशल माळ्याची देखरेख नको होती ? श्यामच्या आईनें हेंच काम केलें. ती स्वतःही अत्यंत कष्ट घेणारी होती. दुसऱ्यासाठीं सुद्धां ती फार झटे. शेजारची वेणू सासरीं जावयाची तर अंगांत ताप अस-

तांनाही वड्या करून देण्यास तत्परतेनें तिच्याकडे गेली. तिचें स्वतःचें जीवन बोलून चालून कष्टमयच आणि मुलांनाही तिनें कष्ट करावयास शिकविलें. दळताना सुद्धा श्याम तिला जात्याला हात लावूं लागत असे. तिनें आपल्या प्रेमळ मार्गदर्शनानें श्यामच्या जीवनाचा विकास केला. जिजामाईनीं शिवाजीला स्वातंत्र्याचा संस्थापक घडविलें. मातेची ही शक्ति आहे. श्यामच्या सेवामय आयुष्याचें, पश्चात्तापशुद्ध चित्ताचें सारें रहस्य श्यामच्या आईच्या कष्टमय व सद्गुणी जीवनात आहे. श्यामची आई जितकी 'वज्रादपि कठोर' होती, तितकीच प्रसंगविशेषीं 'कुसुमादपि मृदु' होती. घरच्या मनीला दूध घातलें कीं नाहीं याची काळजी तिला तिच्या मृत्युशय्येवरही लागली होती. घरच्या मोलकरणीचीही ती अत्यंत आपुलकीनें चौकशी करी. शेजाऱ्यापाजाऱ्यांना, कुत्र्यामांजरांनाही ती प्रेम देई. अवमानित आयुष्यांतही करारीपणें जगणारी, दुसऱ्यांची सेवा तत्परतेनें करणारी, सर्वांना प्रेम देणारी आणि विशेषतः स्वतःच्या मुलांच्या आयुष्याच्या नौका उत्तम खलाशाप्रमाणें सन्मार्गाकडे वळविणारी श्यामची आई कुठल्याही सहृदय माणसाच्या मनांतून जाणार नाहीं. तिनें श्यामला केलेला उपदेश–तिचे ते शब्द—'श्याम, कष्टाला लाजूं नकोस, मोठ्यांना डावलूं नकोस, साऱ्यांना प्रेम दे, शीलाला जप.'—असल्या तऱ्हेचा तिचा तो उपदेश जगांतील कोणत्याही कोपऱ्यांतल्या कोणत्याही काळच्या कोणत्याही मुलानें कोरून ठेवावा असाच आहे. श्यामची आई म्हणजे गुरुजींच्या वाङ्मय वैजयंतीमधील कौस्तुभरत्न आहे. पुस्तकांतील कोंकणी संस्कृतीचें तर तें मनोहर चित्र आहेच, पण त्याच्या पार्श्वभूमीवर रंगविलेलें श्यामच्या आईचें चित्र अतिशयच करुणरम्य आहे यात तिळमात्र संदेह नाहीं. गुरुजींच्या साहित्यांतील स्त्रियांचा मेळावा हा असा आहे. त्यांच्या स्त्रीपात्र-चित्रणांत दोष नाहींच असें छातीठोकपणें सांगतां येणार नाहीं; पण एक गोष्ट खासच कीं, त्यांच्या सहृदयतेची त्यांत इतकी मोहिनी आहे कीं, दोष लक्ष्यांत आले तरी खुपत नाहींत. दुसरा या दोषांचा विशेष हा आहे कीं, जें जें म्हणून व्यंग त्यांत आहे, तें तें सारें त्याच्या अतिसद्गुणी, अतिभावनामय, अतिविशाल अशा हृदयामुळें निर्माण झालेलें आहे व या चित्रणदोषामुळेंच गुरुजी सर्वांना अधिक आवडतात.

त्यांच्या स्त्रीपात्र चित्रणांतील पहिला–ठळकपणें पहिला–दोष म्हणजे स्त्री ही शृंगाराची स्वामिनी असूनही गुरुजींनीं रंगविलेल्या स्त्रीपात्रांनीं केलेला शृंगार वास्तव वाटत नाहीं. हल्लींच्या तरुणींच्या शृंगाराची त्यांत ओझरती पण छाया नाही. त्याचीं स्त्रीपात्रें एकाद्या कॅलेंडरवरच्या चित्राप्रमाणें पतीचे पाय चुरीत बसतात. प्रियकराकडे एकही तिरका कटाक्ष टाकीत नाहींत— बिचारा प्रियकर ! गुरुजींच्या नायिका एकदाही लाडांत येऊन आपल्या प्रियकरास Darling डार्लिंग म्हणत नाहीत. काय हा इंग्रजी शिकणाऱ्या तरुणींच्या शिक्षणाचा अपमान ! ! हे आचरट चाळे सोडले, तरी खरोखरच आधुनिक शृंगार गुरुजींच्या साहित्यातून नाहीं हें खास. त्यांच्या शृंगारावर संस्कृत काव्यांतील शृंगाराची जबर छाप असलेली आढळून येते. पतीला प्राणनाथ म्हणणें; पतीशीं बोलतांना रसपूर्ण व सहजतेचा आभास निर्माण करणारी पण खरोखरीच कृत्रिम व क्वचित अलंकारिक भाषा बोलणें हे प्रकार संस्कृत वाङ्मयांत आढळतात. वास्तव शृंगार निर्माण न करण्याचें नि तसेंच संस्कृत वळणावर शृंगार रंगविण्याचें आणखी एक कारण आहे आणि तें म्हणजे या महान् साधुपुरुषानें शृंगार फक्त वाचलेला आहे आणि तोही संस्कृत भाषेंतूनच. अश्लीलपणा वजा जातां वाचलेला; त्यांनीं आधुनिक अशी एकच गोड गोष्ट शृंगाराचे बाबतींत उचललेली आहे आणि ती म्हणजे प्रेमभरांत पतीला नांवानें हांक मारून 'अरे तुरे' करणें. त्यांची चित्रा त्यांच्या चारूला 'अरे चारू' म्हणते व मुक्ता तिच्या विजयाला 'अरे विजय' म्हणून हांक मारिते. दुसऱ्या कोणत्याही इतर बाबतींत गुरुजींच्या कथावाङ्मयांतील शृंगार वाचकांना न आवडला तरी हल्लींच्या मुलीला ही गोष्ट एकदम पसंत पडेल. ही गुरुजींच्या वाङ्मयांतील शृंगाराची सर्वसाधारण रूपरेषा आहे एवढेंच मला सांगावयाचें आहे. त्यांच्या वाङ्मयांत कांहीं निवडक शृंगाराचे प्रसंग कोणाच्याही लक्ष्यांत–चांगलेच लक्ष्यांत राहावे असे आहेत. त्यांच्या साहित्यांत शृंगार हा कांहीं प्रधान रस नाहीं. आणि तो नाहीं म्हणूनच त्यांचें साहित्य वैशिष्ट्यपूर्ण आहे असें मला वाटतें.

दुसरा दोष त्यांच्या सेवातत्त्वावरील अढळ श्रद्धेंतून निर्माण झाला आहे. सेवा हा त्यांचा सर्वांत परमधर्म. याच सेवातत्त्वाचा प्रसार व्हावा म्हणून त्यांनीं अनेक सेवातत्पर सुंदर पात्रें चितारलीं आहेत; परंतु असें

करतांना त्या सेवातत्त्वावरील श्रद्धेच्या भरांत आपण वास्तवतेला थोडासा धक्का पोंचविला आहे याचें त्यांना भानही राहिलेलें दिसत नाहीं. कांहींही झाले तरी हिंदु स्त्री एक गोष्ट कदापि सुद्धां करणार नाहीं आणि ती म्हणजे परपुरुषाची अनावश्यक शरीरसेवा. एकाद्या अनोळखी माणसाची देखील ऐन संकटप्रसंगी वाटेल ती सेवा हिंदु स्त्री करील. पण ती पतीच्या देख-रेखीखालीं सेवा करताना पडणारे कष्ट ती हिशेबात सुद्धा धरणार नाहीं. त्या वेळी तिच्या हृदयात अन्य विचार येणार नाहींत. आजारी माणसाची शुश्रूषा एवढेच तिला समजतें. त्या वेळी ती फक्त आई असते. पण विशेष आवश्यकता नसताना परपुरुषाची सेवा ती कधींही करणार नाहीं; परन्तु सेवातत्त्वावरील श्रद्धेनें गुरुजींनीं 'पुनर्जन्म' या कादंबरींत आनंदीला परपुरुषाचे 'पाय चेपूं का ?' असें विचारावयास लाविलें आहे. यदाकदाचित् गोविंदरावांनीं 'नको वैनी' म्हटलें नसतें, तर तिनें त्याचे पाय खासच चेपले असते. आनंदीबाई इतकी भोळी कीं, गोविंदरावाचा वाईट हेतु तिच्या लक्ष्यांत पण येत नाहीं. गुरुजींना त्यांच्या विशाल हृदयामुळें त्यांत वावगें वाटत नसेल; पण तें अवास्तव आहे हें खास. खेळून दमलेल्या पांखराच्या चोंचींत माता दाणापाणी घालील, कष्ट करून दमून भागून आलेल्या पतीच्या पायाला ती दूधतूप चोळील, परंतु परपुरुषाचे पाय चुरण्याची कल्पना तिच्या मनांत उद्भवणारही नाहीं; मग ती प्रत्यक्षांत येणेंच अशक्य ! परंतु याचा अर्थ असा नव्हे कीं, गुरुजींना ही अवास्तवता माहित नव्हती; फक्त ती त्यांच्या लक्ष्यांत आली नाहीं किंवा ती जाणून बुजून त्यांनीं पत्करली.

आणखी एक वैशिष्टय त्यांच्या लिखाणांत मला आढळून येतें. तें हें कीं त्यांच्या कादंबरींतील प्रधान स्त्रीपात्रें तरुणांवर प्रथम-भेटींतच प्रेम करूं लागतात. 'यति कीं पति' मधील मुक्ता विजयाला फेटा बांधून देऊं का असें एकदम विचारते. 'क्रांतींतील' माया प्रथमभेटींतच 'मायेला जिंकून घेणारे रामदास' असा त्याच्यापाशीं उल्लेख करते. 'आस्तिक' मध्यें वत्सलाही आपलें जीवन पहिल्या भेटींतच नागानंदाच्या स्वाधीन करते. प्रथमभेटा-तील दृढ प्रेमाचे दाखलेच आहेत ते. प्रीतीचा विकास कसा झाला, तें त्यांनीं रंगविलें नाहीं. याला माझ्या मतें दोन कारणें आहेत. एक तर संस्कृतच्या व इंग्लिशच्या वाचनाचा त्यांच्या मनावर खोल परिणाम झालेला आहे. इंग्रजी

लिखाणांत अन् इंग्रजी समाजांत तर या रोजच्याच गोष्टी आहेत. संस्कृतांतही हरिणावरचें लक्ष उडून हरिणाक्षीच्या सौंदर्यात गुंग होणारा दुष्यंत आहे. बकुलमाला गुंफतांना मालतीच्या सौंदर्यावर मोहित होणारा माधवही आहे. त्यामुळे सहजच विशाल मनाच्या गुरुजींच्या मनात प्रथम भेटींतील प्रेमाबद्दल अनुकूलता असावी. दुसरें असें कीं, दोन जीवांची प्रीति हा त्यांच्या कादंबरीचा अगर कुठल्याही लिखाणाचा मुख्य विषयच नव्हे मुळीं. त्यामुळें गुरुजी या प्रीतीच्या उत्पत्तिस्थितीचा इतिहास कलापूर्ण कुंचलीनें रंगविण्याच्या फारसे भानगडींत पडत नाहींत. अशी प्रीति ही एक नेहमींची न टाळतां येण्याजोगी गोष्ट असून सारें प्रेम विस्तृत कसें करतां येईल, विश्वबंधुता कशी स्थापन करतां येईल, हें त्यांच्या दृष्टीनें जास्त महत्त्वाचें आहे. म्हणूनच गुरुजींच्या कादंबऱ्यांतील दोन प्रेमी जीव स्वतः जितका गोड शृंगार करतात, तितक्याच अगर अधिक गोडीनें व जिव्हाळयानें सत्कार्याविषयीं बोलतात. बऱ्याच कालावधीनंतर परस्परास भेटले, तरी कर्तव्यावर बोलतील; पुढील विधायक कार्यक्रम आंखतील. कांहीं गमती देशभक्त नि देशसेविका तरी देशविषय सोडून प्रेमाचीं भाषणें बोलतील; पण गुरुजींच्या कादंबऱ्यांत प्रेमीं जोडपें अति कळकळीनें स्वदेशावर बोलून शृंगार करतें. केवळ देशहिताची गुरुजींच्या ठायीं असलेली अपार कळकळ त्यांच्या असल्या शृंगारांत गोडी आणते; नाहीं तर कै. वा. म. जोशी ह्यांच्या 'रागिणी' मधील भय्यासाहेबांसारखीं हीं पात्रें अरसिक व कंटाळवाणीं ठरलीं असतीं; आणखी एक गोड विशेष त्या शृंगारांत आहे. आणि तो त्यांनीं संस्कृत वाङ्मयावरून उचलला असावा. तो म्हणजे त्यांचीं पात्रें निसर्गाच्या सान्निध्यात शृंगार करतात. फुलांच्या माला करून प्रियकरणी प्रियकरांच्या गळयांत घालतील, 'संध्याकाळचें सोनें' वेंचता वेचतां त्या प्रियकरांबरोबर बेभान होऊन नाचतील; बागेंतील झोक्यांवर प्रियकरांबरोबर झोके काढतील. किती रम्य आहेत प्रसंग हे ! तें असो. प्रथमभेटींत उत्पन्न होणाऱ्या प्रेमावर त्यांचा विश्वास असल्यानें त्यांच्या कादंबऱ्यांतून ते तसल्या तऱ्हेचे प्रसंग चितारीत असोत, वा अन्य कारणानें ते असें करीत असोत; त्यांतही त्यांचा विशेष हा आहे कीं, प्रीतीसारख्या गोड, नाजुक अन् पवित्र गोष्टींचा उच्चार साधारणतः जो तरुणांकडून व्हावयास

पाहिजे–किंवा होत असतो–तो कार्यभाग गुरुजींच्या साहित्यांत तरुणींनीं उचललेला आहे. शांता मोहननें अश्रु पुसले नाहींत म्हणून तक्रार करते, कृष्णी अचानकपणें कार्तिकाच्या गळयात माळा घालते, चित्रा चारूबरोबर गुलगुल गोष्टी करते. हें असें कां ? त्याचें मात्र नेमकें कारण सांगतां येणें अशक्य आहे. याचें स्पष्टीकरण गुरुजी स्वतःच कदाचित करूं शकतील.

नंतर आणखी एक दोष म्हणजे गुरुजींनीं आपलीं स्त्रीपात्रें स्वभावाच्या दृष्टीनें अधिकांशानें अतिशय निर्दोष व अव्यंग रेखाटलीं आहेत. त्यांचा विजय वडिलांवर रागावेल, भावाचा सूड घ्यावयास निघेल, पण मुक्ता चुकावयाची नाहीं. तीच त्याला प्रेमाची शिकवण देईल. त्यांचा सुमुख मत्सरानें विजयचा सूड घेईल; पण मंजुळा-असहाय लंगडी मंजुळा ऐन मध्यरात्रीं तुरुंगांत पडलेल्या भावाची मुक्तता करावयास धावेल. त्यांचा कार्तिक भित्रा, दुबळा असेल; पण कृष्णी राजपुरुषांशीं लढत घेण्याइतकी धैर्यवान असेल. कांहीं विशिष्ट गुणांचें रसायन म्हणजे स्त्री अशी गुरुजींची कल्पना दिसते. चित्राची सासू, राजापूरच्या भटापासून पतीला लांब ठेवणारी विश्रामची मालती किंवा रमाबाई अशीं निवडक व फारच थोडीं स्त्रीपात्रें त्यांनीं किंचित् पातळीखालीं असलेलीं दाखविलेलीं आहेत अन् तीं पात्रें सुद्धां गुरुजींच्या हृदयपालटाच्या तत्त्वानुसार फिरून चांगल्या मार्गावर आलेलीं आहेत. विशिष्ट गुणांच्या सांच्यामुळें त्यांच्या नायिकांचे चेहरेही एकाच सांच्याचे वाटतात. त्यांची प्रत्येक नायिका प्रेमळ असते; प्रत्येक नायिका अतिशय तेजस्वी असते नि प्रत्येक नायिका सेवेला व त्यागाला केव्हांही तत्पर असते. जणूं स्त्री या सद्गुण धातूंचीच बनविलेली आहे. सर्व स्त्रिया—छे, जगांतील एक-चतुर्थांश स्त्रिया जरी-इतक्या सर्वगुणसंपन्न असत्या, तर जग स्वर्गमोलाचें झालें असतें. आदर्श चित्रित करण्याची दुर्दम्य हौस ह्याच्या मुळाशीं आहे. स्त्री कशी आहे हें गुरुजींनीं फारसें ओळखलें नसेल कदाचित् ; पण स्त्री कशी असावी हें मात्र त्यांनीं आपल्या गोड भाषाशैलीनें व चित्रणशैलीनें दाखविलें आहे.

नंतर त्यांच्या लिखाणांत एक–**दोष म्हणूं का** ?–दोष दिसून येतो. तो म्हणजे ते कोणत्याही स्त्रीपात्राच्या चेहऱ्याचे अगर हालचालींचें रेखीव, कलात्मक वर्णन करीत नाहींत. ते नदीवरच्या प्रत्येक तरंगाचें वर्णन करतील,

आकाशांतील प्रत्येक ताऱ्याचें तेज वर्णितील, पण त्यांच्या लिखाणांत पात्रांच्या चेहऱ्याचें वर्णन फार क्वचित सांपडेल. प्रथमपरिचय करून देतांना थोडेंफार कांहीं सांगावयाचें तर सांगतील एकादीच्या रूपाविषयीं. प्रा. फडके येथें लेखक असते, तर प्रियकराच्या शब्दानुसार प्रियेच्या हृदयांत भावनातरंग तिच्या गालांवरून हेलावत जाऊन डोळयात नाचतांना दाखविला असता त्यानी. नायिकेच्या सरळ नासिकेचें, धनुष्याकृति भुवयांचें, कुंदकळ्यासारख्या दांताचे आणि लाबसडक कुरळ केशकलापांतून अवखळपणें कपाळावर नाचणाऱ्या बटांचें–एवढेंच नव्हे, तर नायिकेच्या पाठमोऱ्या आकृतींतील रम्यपणाचें वर्णन प्रा. फडके अतिशय रसिकपणानें करतात; पण हा प्रकार गुरुजींच्या लिखाणांत दिसून येत नाहीं–येणार नाहीं. त्यांच्या नायिका पदराशीं चाळा करतात कीं नाहीं, खालीं पाहून पायांच्या अंगठयाच्या नखानें जमीन उकरतात कीं नाहीं, किंवा 'इश्श' असला गोड मुरका मारून वल्लभास मोहित करून घायाळ करतात कीं नाहीं याची यत्किंचितही कल्पना वाङ्मयावरून बांधतां येत नाहीं. त्यांच्या नायिका नुसतें गोड गोड बोलतात. जास्तींत जास्त म्हणजे एखादा तरुण नायिकेला पाणी फेंकून मारील; उलट ती त्याला कमळाच्या देंठानें मारील अन् हें सुद्धां गुरुजी नाहीं सांगणार. तिला अगर त्याला स्वतःलाच त्या त्या प्रसंगांचीं वर्णनें करावयास लावतील. हजार गोष्टींचें वर्णन त्यांच्या साहित्यांत असेल. महापुरांत वाहून येणाऱ्या पाळण्याचें, त्याच पुरांत तांडवनृत्य करणाऱ्या सापाचें, महाराष्ट्राचें, बंगालचें, वाटेल त्याचें वर्णन ते करतील. पण एखाद्या व्यक्तीच्या चेहऱ्याकडे आणि हालचालीकडे त्यांचें लक्षच नसतें मुळीं; किंवा 'तुम्ही जें बघावयाला शिकलांत तें नाहीं मी आतां सांगत. तुम्हांला जें बघतां येत नाहीं, तें मी बघावयास शिकवितों; चला!' असेंच जणूं त्यांना म्हणावयाचें आहे. 'तुम्ही स्त्रीचा प्रत्येक कटाक्ष झेलला असेल, आतां जरा सरितेकडे कटाक्ष टाका. तुम्ही स्त्रियांच्या पदक्षेपांतील मनोरमता अनुभवली असेल, आतां या रमणीय मातृभूमीकडे पाहा.' असेंच जणूं त्यांना सुचवावयाचें आहे. गुरुजींच्या स्त्रीपात्रचित्रणांत वास्तवतेच्या दृष्टीनें बरेचसे दोष आहेत खरे; परंतु गुरुजींचें वैशिष्टयच हें कीं, त्या दोषांचा तुम्हांला पत्ताही लागूं नये. ऊंसाचा रस इतका अमृत–मधुरच आहे, कीं

' यांत आलें नाहीं, लिंबूं नाहीं ' अशी तक्रार करावयाचें तुमच्या ध्यानांत सुद्धां येऊं नये. गुरुजींचा भावनौघच इतका वेगवान आहे, कीं आपण त्याच्यांत वाहून गेलों–अगदीं फुलासारखे वाहत गेलों–याचा आपल्याला लवकर थांगपत्ताही लागूं नये.

अशा रीतीनें गुरुजींच्या साहित्यसंसारांतील स्त्रियांचा मेळावा पाहिला तर आपल्याला हिंदु-सांस्कृतिक जीवनाचा गोड चित्रपट पाहावयास सांपडतो. स्त्रीच्या घरकुलांतील तिच्या माणसांशीं तिची वागणूक त्यांनीं अगदीं स्पष्टपणें रेखाटली आहे. कन्या म्हणून ती आपल्या आईवडिलांची, आजोबांची नि सर्व वडिलधाऱ्यांची सेवा करण्यांत तत्पर असते. ' माया 'चे रमेशबाबूंच्या सुखदुःखांत लक्ष फार. ' मुक्ता ' तर आजोबांच्या बरोबर चित्रकलाप्रदर्शन पाहण्यासाठीं मुशाफरी करावयास तयार असते. देशकल्याणासारखें एक उज्ज्वल ध्येयच फक्त तिच्या प्रेमाआड आलें, तर ती पित्याला विरोध करील. मग ती पित्याच्या आश्रयाची देखिल पर्वा करणार नाहीं. ' शान्ता '-सारखी तेजस्वीपणानें घर सोडून जाईल. भगिनी म्हणून सुद्धां ती एक आदर्श स्त्री आहे. विजयची संसारांत पडण्याची फार इच्छा असतांना व घरांतील माणसें त्याला यति करावयाच्या फंदांत असतांना विजयच्या पाठीशीं मंजुळा उभी असते. मंजुळा–एक पंगू स्त्री; पण तिचें आपल्या भावावर फार प्रेम. त्याच्या सुखाची तिला फार काळजी. तो तुरुंगांत असतांना त्यालाही पंगु पण प्रेमळ मंजुळा भर रात्रीं सहाय्य करण्यास निघते. माया तर पतीच्या जीवावर उलटणाऱ्या परंतु पश्चात्तापानें शुद्ध होऊन बंधु म्हणून आलेल्या प्रद्योतच्या सुटकेची न्यायमूर्तीकडे विनवणी करते. शान्ता रामदासच्या पावलांवर पाऊल टाकून देशसेवेचें व्रत घेते. गुरुजींनीं रंगविलेली बहीण ही अशी आहे. स्त्रीचें पत्नी म्हणून रेखाटलेलें चित्र फार कलापूर्ण आहे. 'गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ ।' अशा रघुवंशांतील इंदुमतीप्रमाणें ती रंगविलेली आहे. ती आपल्या पतीचें प्रधानपद पत्करते. श्यामच्या आईसारखा प्रधान प्रत्येक गृहराज्यांत असला, तर त्या घरांत रामराज्य नांदतें असें म्हणावें लागेल. स्त्री ही जगाच्या आरंभापासून अंतापर्यंत पतीची प्रीतीची मैत्रीण असणारच. तेव्हां गुरुजींसारख्या प्रेम-भक्ताच्या साहित्यांत ती त्याही दृष्टीनें सरस वठल्यास आश्चर्य तें काय ?

त्याचप्रमाणें 'ललिते कलाविधौ' त्या पतीच्या प्रियशिष्या आहेतच. रामदासच्या दिलरुब्याच्या तारा ' हलक्या हातानें घट्ट पिळणारी ' माया आणि बांसरी आळवीत फिरणाऱ्या नागानंदाच्या बांसरीच्या सुरावर प्रेमगीत गात फिरणारी वत्सला ह्या ललितकलाबाबत पतींच्या प्रियशिष्याच होत. परंतु इंदुमतीपेक्षां आणखी एक जास्त विशेष आहे त्यांच्यांत. तो म्हणजे त्या केवळ रंगमहालातील मैत्रिणी नव्हत, अगर राजदरबारातील प्रधानच नव्हत, तर रणक्षेत्रावरही त्या खांद्याला खांदा देऊन लढणाऱ्या वीरांगना आहेत. रजपूत रमणी आहेत. मुकुंदरावाच्या तत्त्वांकरितां आत्मबलिदान करणाऱ्या आनंदमूर्ति मीना त्यात आहेत. त्यांच्याजवळ रसिकपणा आहे, मुत्सद्दीपणा आहे, अन् धैर्य, पराक्रम हींसुद्धा आहेत. अद्वितीय तेजाळ रत्नें आहेत तीं.

हें सारें जरी खरें असलें, तरी माता म्हणून रंगविलेली स्त्री कलापूर्ण पात्रचित्रणाच्या दृष्टीनें अनुपमेय आहे. मुलाचे शिक्षण योग्य तऱ्हेनें व्हावें, संपूर्ण शिक्षणानें आपल्या बाळाचें पुढील आयुष्य सुखांत जावें, म्हणून पोटाला चिमटा घेऊन आणि बाळाचें कल्याण व्हावें अशी दिवसाचे चोवीस तास परमेश्वराची प्रार्थना करीत बसणारी बाळाची आई पाहून मनांत कळवळा उत्पन्न होतो. बाळाच्या आठवणीनें तिचा प्रत्येक घास तिच्या घशांत अडकतो. बाळ काय जेवीत असेल , त्याचे हाल होत असतील का, ह्याची तिला सदैव चिंता. विशेषतः वैध्यव्यदशेंत मुलाची मोलकरीण म्हणून राहणाऱ्या त्या वेड्या प्रेमळ आईचें हृदय आपल्या मनावर जबर परिणाम केल्याशिवाय खासच राहत नाहीं.

बाळाची आई बाळाला शिकवण देतांना जें चुकतें तें ती सेवेनें व निष्काम प्रेमानें जिंकून घेते, पण श्यामची आई म्हणजे साऱ्या मातृहृदयाचा शिक्षक, 'माझ्या श्यामला कोणी नांवें ठेवूं नयेत. माझा श्याम कर्तृत्ववान निपजावा.' एवढ्यासाठीं श्यामचें मन सुंदर व सुदृढ घडविण्यासाठीं तिनें इतके श्रम घेतलेले असतात कीं, श्यामच काय, पण कोणीच तिला विसरूं शकत नाहीं आणि या तिच्या कल्याणकारक स्मृति श्यामच्या जीवनांत तर इतक्या खोल रुजलेल्या असतात, कीं त्यासाठींच तिच्या–त्याच्या मायेच्या प्रत्येक क्षणाची स्मृति तो इतरांना सांगून मातेची थोरवी गात गात आपल्या

मातेच्या समाधीची अश्रूंनीं पूजा करून तिच्यावर स्मृतिसुमनें वाहत असतो.

शेवटीं त्यांच्या वाङ्मयीन स्त्रीसृष्टींत असा संचार केल्यानंतर तिच्या विधात्याच्या स्त्री–विषयक कांहीं निवडक कल्पना सांगतां येतील. ह्या सृष्टींतील स्त्रिया भांडखोर नाहींत; बंडखोर आहेत. पतीबरोबर त्या लटका झगडा करणार नाहींत फारशा; इतराशी त्यांचा फारसा मतभेद होणार नाहीं; पण बहुजनसमाजावर होणाऱ्या अन्यायानें चिडून बंड पुकारणाऱ्या त्या तेजस्वी स्त्रिया आहेत. भांडखोरपणा हा रिकामटेकडयांचा (?) गुण; तो गुरुजीच्या ध्येयप्रवण उद्योगी स्त्रियाच्या ठिकाणीं कसला असणार ? पण बंडखोरपणा हा तेजस्विनींचा गुण त्याच्यांत मूळचाच आहे. तसेंच बायका म्हणजे सद्गुणाची खाण हा त्याचा फार विश्वास आणि स्त्री ही जगाची माता असल्याने तिच्या सामर्थ्याबद्दल त्याना फार खात्री आहे. कोठल्याही गोष्टीला चांगलें वळण लावणें स्त्रियांच्या हातीं आहे असें त्याना वाटते. तुम्हाला कोणती सुधारणा पाहिजे ? जातिभेद नष्ट व्हावेत असें वाटतें ? भांडवलशाही नष्ट व्हावी ? येऊं देत तर मग सारे शान्ती–मोहन एकत्र. करूं देत विवाह. एका विवाहानें दोन्ही समाज जवळ येतील. लग्नाचा खरा अर्थ जाणतील ते. प्रांतिक भाडणें नष्ट व्हावींत, प्रांताप्रांतात ऐक्य व्हावे, प्रेम नादावें अशी का तुमची इच्छा आहे ? मग येऊं देत सारे माया–रामदास एकत्र. करूं देत विवाह. एका विवाहानें प्रांताप्रांतांत प्रेमाचे नातें जडेल. प्राताप्रांतांत एकी निर्माण होईल. अशी गुरुजींची विवाहसंस्थेची मीमासा आहे. कुमार्गावर असणाराला सुद्धां स्त्री सन्मार्गावर आणूं शकते असें त्यांना वाटतें. ‘रामाच्या शेल्यांतील’ नायिका आपल्या चारित्र्यानेंच ना गब्बूशेटला सन्मार्गावर आणते ? ती गडकऱ्यांच्या वसुंधरेप्रमाणें चुकलेल्यांची उद्धारदेवता आहे. समाजांत स्त्रियांचें फार उच्च स्थान आहे; कारण जगतांतील सर्व पावित्र्याचा व प्रीतीचा उगम तिच्या ठायीं आहे असे गुरुजी समजतात. स्त्री जागृत झाली, तर ती कोणतें कर्तव्य आणि किती तत्परतेनें पार पाडील याची साक्ष गुरुजींचीं सारीं स्त्री-पात्रें देतील. त्यांच्या माया मृणालिनी, हेमलता बंगालच्या दुष्काळांत दुर्गापूजेचा सण सोडून गरिबांची सेवा करतात, त्यांना कपडे पुरवितात. त्यांची शान्ता

साऱ्या शिवतर गांवाला साक्षर आणि ज्ञानपिपासु करते. त्यांची मीना खादी-प्रचार करते. त्यांच्या पार्वती व गीता किसानसमाजाचें रान पेटवितात. त्यांची वत्सला मुलाला आश्रमांत टाकून ऐक्याचे व प्रेमाचे धडे समाजाला देत फिरते. पण त्यांची जास्त श्रद्धा, जास्त भक्ति मातृहृदयावर आहे. शांता-सारख्या स्त्रिया जागृत झाल्यानंतर त्यांच्याच पोटीं क्रांतीचा जन्म होईल ह्यावर त्याचा अपार विश्वास आहे. त्याचप्रमाणें शांत व सहनशील अशा स्त्रियाच्या पोटीं आलेली क्रांति चिरकाल टिकणारी असेल ही तर त्यांची दृढ श्रद्धा. स्त्री ही क्रांतीची माता! म्हणून हें मातेचें कर्तव्य गुरुजींना अत्यंत श्रेष्ठ दर्जाचें वाटतें. 'जिचे हातीं पाळण्याची दोरी। ती जगातें उद्धारी।' असे त्यांना खरोखर वाटतें. त्यांच्या दृष्टीनें स्त्री म्हणजे एक निष्पाप कन्या, निगर्वी भगिनी, प्रेमळ पत्नी व त्यागमयी माता आहे.

स्त्रीस्वरूपाविषयींच्या गुरुजीच्या या कल्पना त्यांच्या 'भारतीय संस्कृति'-मध्यें त्यांच्याच शब्दांत आपणास गुंफलेल्या आढळून येतील. "भारतीय स्त्रिया म्हणजे त्यागमूर्ति. भारतीय स्त्रिया म्हणजे तपस्या, मूकसेवा; भारतीय स्त्रिया म्हणजे अलोट श्रद्धा व अमर आशावाद. निसर्ग ज्याप्रमाणें गाजावाजा न करितां काम करीत असतो व फुलें फुलवीत असतो, त्याप्रमाणें भारतीय स्त्रिया कुटुंबांत सतत कष्ट करून, निमूटपणें श्रम करून आनंद निर्माण करीत असतात. प्रत्येक कुटुंबांत तुम्ही पाहा. पहांटेपासून रात्रीं अकरा वाजेपर्यंत राबणारी ती कष्टाळू मूर्ति तुम्हाला दिसेल. क्षणाची विश्रांति नाहीं. फारसा आराम नाहीं. भारतीय संस्कृतींत स्त्रीचें जीवन म्हणजे पेटलेलें होमकुंड आहे. ......स्त्री म्हणजे मूर्त कर्मयोग. ती सर्वस्व पतीला अर्पण करते. सर्वस्वानें त्याची पूजा करते......ती सर्वांची प्रेममयी दासी आहे. सारे स्त्री-जीवनाच्या अंगणांत खेळत असतात. तिच्या अंतरंगाच्या अन्तर्गृहांत कोणीही जात नाहीं. स्त्रीहृदय हें सदैव मुकेंच आहे. स्त्रिया मुक्या असतात. त्यांचीं हृदयें फार गूढ व गंभीर असतात. हृदयाला ज्याची तहान आहे तें प्रेम असो, कीं बाहेरची भाजी असो, स्त्री त्याची मागणी करणार नाहीं. जें आणून द्याल तें ती घेईल. स्वतःचे अश्रु, स्वतःचें दुःख ती कोणास दाखविणार नाहीं. किती अल्पसंतोषी भारतीय सती! परंतु हा अल्पसंतोषही त्यांना मिळत नसतो...

घर म्हणजे आधार, घर म्हणजे आशा, घर म्हणजे प्रेम, घर म्हणजे आत्मीयता ! हें घर माझ्या पतीसाठीं, माझ्या मुलासाठीं मी प्रेमानें भरून ठेवीन. पतीला पत्नी म्हणते, घरांत कांहीं करा; परंतु जगांत नीट वागा. आणा सारी घाण घरात. ती घाण काढायला मी समर्थ आहें. ओरडा माझ्यावर, रागवा माझ्यावर. तुमचा कामक्रोध होऊं दे शांत. पशुत्व माझ्या ठायीं होमा. तुमचे पशुत्व होमण्याची मी पवित्र वेदी आहें. बाहेर जाल तें माणूस होऊन जा. पशुपति होऊन जा, शिव होऊन जा. सत्स्वरूपीं पतीला शिवशंकर करणारी स्त्री ही शक्ति आहे. पत्नी पतीला माणसाळविते, शांत करते, स्थिर करते, आळा घालते, संयम घालते, मर्यादा घालते,...स्त्रियांचें प्रेम खोल असतें; परंतु लांबरुंद नसतें. त्यांच्या दृष्टीची मर्यादा फारच संकुचित असते. कुटुंबापलीकडे त्यांचें फारसें लक्ष नसतें...भारतीय स्त्रिया ध्येये पाळणाऱ्या आहेत. समाजात जी जीं नवीन ध्येयें उत्पन्न होतील, ती तीं स्त्रियांपर्यंत गेलीं पाहिजेत, तरच ती अमर होतील. (नेमक्या ह्याच उद्देशानें त्यांनी आपल्या स्त्रीसृष्टींत अशाच तऱ्हेच्या स्त्रिया निर्मिल्या आहेत.) स्त्रिया कदाचित् ध्येयें निर्माण करणार नाहींत; परंतु निर्माण झाली की त्यांना मरूंही देणार नाहींत......माता या दृष्टीनेंच भारतीय स्त्रियांचा अपार महिमा. कारण ईश्वराचे जे हे साभाळण्याचें मुख्य कर्म, सर्वांवर पांघरूण घालण्याचें कर्म, तें या जगात माता करीत असते. ......विठ्ठल म्हणजे आई, भारत म्हणजे आई, गाय म्हणजे आई ! भारतवर्षात सर्वत्र मातेचा महिमा आहे. आईला आधी वंदन. कोणताहि मंगलविधि असो; आधीं आईचा आशीर्वाद. तिला नमस्कार......भारतीय स्त्रियांच्या पावित्र्याची, संयमाची, वैराग्याची धन्य आहे ! भारतांत आज शेंकडों वर्षें ओतलेलें हें वैराग्य व्यर्थ का जाईल ? भारतीयाच्या उज्ज्वल भवितव्यास त्यापासून खत नाहीं का मिळणार ? भारतीय सतींनो ! तुमचा दिव्य महिमा वर्णावयास मला शक्ति नाहीं ! तुमचीं चित्रें माझ्या अंतश्चक्षूंसमोर मी आणतों व तुमचे पाय भक्तीच्या अश्रुजलानें धुतों. दुसरें मी क्षुद्र पामर काय करणार ? ”

गुरुजींची स्त्रियांसंबंधींची ही कळकळ पाहिली, स्त्रियांवरील हा अढळ विश्वास पाहिला, अन् त्यांनीं स्त्रियांना केलेलें अमोल मार्गदर्शन पाहिलें, कीं

गुरुजीच भारतीय समाजाची माता आहे असे म्हणावेंसे वाटते. माता याहून दुसरें काय करते ? चिमुकल्या तान्ह्याला घास भरवावेत तसे गुरुजी आम्हाला ज्ञानाचे घास भरवीत आहेत. चारदोन शितें खालीं सांडली म्हणून आई रागावत नाहीं; गुरुजींनीं सांगितलेल्या दोन चार गोष्टी स्मृतिपटलावरून घरंगळल्या, तरी गुरुजी शांत राहातील. औषध पाजावयाचें म्हणजे आई खडीसाखरेचा डबा पुढें घेऊन बसते, तसेच कटु उपदेश करावयाचा झाला तरी आपल्या गोड बोलांनी त्याचा कटुपणा ते नाहीसा करून टाकतात. आपला मुलगा चांगला निपजावा, आपल्या मुलाचे कल्याण व्हावे ही आईची फार इच्छा; आपल्या देशाचे कल्याण व्हावे हा गुरुजींना ध्यास. मातेच्या हृदयाची तळमळ गुरुजींच्या मनात स्पष्ट दिसते. 'ज्याचे पोटीं जनहितचिंता ! तोच उद्धरील साऱ्या जगता ॥' आणि म्हणूनच त्यांची त्यागमय व प्रेममय मूर्ति आठवली व त्यांना लागलेली देशकल्याणाची तळमळ पाहिली, की ऊर भरून येतो व मस्तक आपोआप नम्र होते !

# पूज्य साने गुरुजींच्या शब्दांत

[ धुळे येथील शारदा मंदिरातर्फे झालेल्या सत्कार-समारंभप्रसंगी प. साने गुरुजींनीं केलेल्या भाषणाचे संकलन. ]

**आत्मनिवेदनपर :**

" माझ्या डोळ्यांसमोर साहित्य नसतें व साहित्यचर्चाहि नसते. मी साहित्यिक नाहीं व माझा तसा अधिकारहि नाहीं. लिहीत बसणें हा माझा धर्म नाहीं. माझें सर्व लेखन तुरुंगांत झालें आहे. काम करून थकलेल्यांना गंमत वाटावी, त्यानीं आपलें आयुष्य निराळ्या वृत्तीत घालवावें, हीच माझी लिखाण करतांना माझी दृष्टि होती. मी ' पत्रीं 'त लिहिल्याप्रमाणें

' हृदयांत सेवा, वदनांत सेवा '

असा माझा वाङ्मयाकडे बघण्याचा दृष्टिकोन आहे.

अनुभवाशिवाय मीं कांहींहि लिहिलें नाहीं. ' पत्रीं 'तील ' आई तूं मजा मार मार' ही कविता मीं ज्या दिवशीं लिहिली, त्या दिवशी तुरुंगांतील एका मुलाला वेताच्या छड्यांनीं मारण्याची शिक्षा झाली होती. छड्या भिजवून तयार होत्या. तुरुंगांत मीं दळत असतांना ही कविता गुणगुणत होतों. मी मनांत म्हणत होतों, " आई, तूं अशीच आम्हांला मार, तुझा मार खाऊनच आम्ही स्वतंत्र होऊं. " अशा रीतीनें, मीं जें अनुभविलें तेंच लिहिलें. लाहोरच्या कॉंग्रेसमध्यें स्वातंत्र्याचा ठराव पास झाला हें ऐकून मी अंमळनेरला नाचत नाचत कविता लिहिली.

' भारत प्यारा, स्वतंत्र झाला-जय बोला जय बोला हो '

मी एकदां आचार्य भागवतांना म्हणालों होतों कीं, ' मी एक परार्धोश

महात्माजींचा, त्याच्याहून एक परार्धांश विवेकानंदांचा, व त्याच्याहून एक परार्धांश रवींद्राचा आहे. रवींद्रनाथ मानवी जीवनाशीं एकरूप होत असत. डॉ. अली या गृहस्थानें त्यांच्याविषयीं म्हटलें आहे. " Ravindra talked poetry, sat poetry, stood poetry. " रवींद्र म्हणजे चालतें बोलतें काव्य होतें. पण हेच रवींद्रनाथ एकदां वादळ आलें असता धुळींत बसले. त्यांनीं आपल्या रेशमी पोषाखाचा विचार केला नाहीं. अशा रीतीनें विश्वाच्या संगीताशीं एकरूप होणारें, गरिबाकडे पोंचणारें, त्याच्या सुखदुःखाना वाचा फोडणारें रवींद्रनाथाचे जीवन व काव्य होतें. समाजातील राजकीय, सामाजिक व धार्मिक विषमता दूर करणारें साहित्य मला स्वतःला हवें आहे. याच माझ्या विचारसरणीचा माझ्या लेखनावरहि परिणाम झालेला आहे.

**जीवन व कला**

मीही जीवनाचा उपासक आहें. जीवन समृद्ध व्हावें, शेंकडों तरुणांचीं अंतःकरणे आनंदानें उचंबळून यावीं, राष्ट्र हंसावें व सामर्थ्यसंपन्न व्हावें, असें मलाहि वाटतें. कला काय आहे हें मला समजत नाहीं. मी इतकेंच रवींद्रापासून शिकलों कीं, कला कलातीताकडे नेणारी असावी. टागोरानीं सूर्यास्तावेळचे आकाशांतील निरनिराळे रंग पाहिले, कीं त्यांना मावळणारें जीवन आठवतें. अशा रीतीनें त्यांची कला कलेच्या पलीकडे जाते. म्हणून मी कलाकारांना विचारतों, " तुमची कला कोठें जात आहे ?" वास्तविक कलेने जीवनाचें मंदिर दाखवावें. पण आहे कोठें त्या मंदिरांत सौंदर्य ? म्हणून, कलाकारांनो, सौंदर्योपासनेपूर्वी सौंदर्य निर्माण करा. श्री. विनोबाजींना एका प्रख्यात चित्रकारानें एक चित्र दाखविलें. तें चित्र त्याना बिलकुल आवडलें नाहीं. तेव्हां तो चित्रकार म्हणाला, 'तुम्ही गांधींचे भक्त असेच अरसिक असतां.' श्री. विनोबाजी म्हणाले, " माझी चित्रकला पाहतोस का ? " चित्रकाराला वाटलें यांची कोठें तरी चित्रशाळा असेल; म्हणून तो त्यांच्याबरोबर गेला. श्री. विनोबाजींनीं त्याला हरिजनांच्या वसतींत नेलें. तेथें त्याला काय दिसलें ? सर्वत्र घाण, रोडकीं मुलें, निःसत्व प्रजा. विनोबाजी म्हणाले, " या माझ्या जिवंत

चित्रांच्या गालावरचे रंग तूं फुलव ; त्यांना थोडेंसें दूध दे, अन्न दे, म्हणजे मग बघ कशी टवटवी येईल ती ! या जिवंत चित्रापेक्षां तुझीं तीं निर्जीव चित्रे काय कामाचीं ?

सगळ्या कलांनीं जीवनाला प्रदक्षिणा घालाव्या. जीवन सूर्य आहे व कला ग्रह आहेत. एकदा एक चित्रकार मृत्युशय्येवर असतां त्याच्या शिष्यांनीं त्याला म्हटलें, " गुरुजी, तुमची किती विकल दशा झाली आहे ! इतके दुःखात तुम्ही कां बरें दिवस घालविलेत ?" चित्रकारानें त्या पट्टशिष्याला त्यानें स्वतः रंगविलेलें हिरव्या गवताचें एक चित्र आपल्या पेटींतून आणावयास सांगितलें. त्या शिष्यानें तें चित्र आणल्यावर तो चित्रकार म्हणाला, " बघ, हें माझें अमर जीवन ! ज्या हिरव्या गवताचें मीं चित्र काढले आहे, ते हिरवें गवत तर केव्हाच सुकून गेलें असेल. त्या गवतावरील रंग केव्हाच मावळला असेल ! परंतु ते रंग मीं या चित्रांत अमर केले आहेत." अशा रीतीनें कलाकारांनीं अमर आनंद जिवंत ठेवला पाहिजे. कलाकारांनो, सौंदर्य पाहाल, तर सौंदर्य रेखा.

### वाङ्मय व जीवन

कांहीं वाङ्मयसेवक म्हणतात, " वाङ्मयानें जीवनांत आनंद द्यावा.. सहा दिवस मजुरांनीं काबाडकष्ट केल्यावर, सातव्या सुट्टीच्या दिवशीं त्याना आनंद देणारें, त्याची करमणूक करणारें वाङ्मय असावें. आठवड्यांतून एक दिवस तरी त्यानीं हंसावें." मी सातव्या दिवशीं घटकाभर त्यांनीं हंसावें या मताचा नाहीं. माझ्याजवळ अशी दुबळी महत्त्वाकांक्षा नाही. मजुरानीं काय किंवा शेतकऱ्यांनीं काय सातही .दिवस हसलें पाहिजे. अशा आनंदासाठीं बलिदान सुद्धां केलें पाहिजे. त्यांना आनंदित करण्यासाठीं, त्यांना हंसविण्यासाठी आर्थिक, सामाजिक, धार्मिक, राजकीय विषमता घालविली पाहिजे.

महात्माजी व रवींद्रनाथ टागोर याचा १९२० साली परदेशी कपड्याच्या होळ्यांबाबत वाद झाला. टागोर महात्माजींना म्हणाले,"महात्माजी, तुम्ही हे कपडे जाळून नवभारताला द्वेष शिकवीत आहां; हा कलेचा विध्वंस आहे. नवभारताच्या चंडोलाला निळ्या निळ्या उंच आकाशांत उड्डाण

करावयाला शिकवा." महात्माजींनीं उत्तर दिलें, "चंडोलानीं निळ्या आकाशात उड्डाण करावें, हें मला मान्य; पण भुकेकंगाल चंडोल कसा उडेल? पोटात त्याच्या एकदोन घास जाऊं द्या." १९२५ सालीं मी गोखल्यांचें चरित्र लिहिलें व ते माझे प्रताप हायस्कुलातील सहाध्यापक गोखले गुरुजींना दाखविलें. मला वाटलें, माझ्या या पहिल्याच पुस्तकाचें ते कौतुक करतील. पण ते म्हणाले, "दोन दिवस चहा होईल या पुस्तकावर." मला अत्यंत वाईट वाटलें. मला त्यांनीं पुन्हां बोलावून सांगितले, "हल्लीं पुष्कळ पुस्तकें निघत आहेत; पण त्यांतील एकहि मला आवडत नाही. पुस्तकें प्रेमाबद्दल; पण जीवनांत कोठें आहे प्रेम? जिकडे तिकडे द्वेष व विषमता!" गोखले गुरुजींना विद्यार्थी जेव्हां एखादा आदर्श निबध लिहून देण्याविषयीं सागत, तेव्हां ते म्हणत, "हें छात्रालय झाडून पुसून स्वच्छ करा. ते स्वच्छ केलेलें छात्रालय म्हणजे माझा निबंध." ही जीवनाकडे बघावयाची दृष्टि गोखले गुरुजींनी मला दिली. मी माझ्या लेखनापूर्वी जीवनांत कितपत आनंद आहे, हे बघतों.

रत्नागिरी साहित्यसंमेलनाहून साहित्यिक परतले तेव्हा ते साहित्यापेक्षां रत्नागिरीच्या कलमी आंब्याची आठवण घेऊन परतले! पण एका तरी साहित्यिकाने तेथला शेतकरी पाहिला का? आपले साधुसंत फिरत असत, म्हणून त्याच्या वाङ्मयात त्या वेळचीं सामाजिक प्रतिबिंबे दिसतात. कोणचाहि लेखक हा त्या काळचा प्रतिनिधि असतो व समाजाचा नेताहि असतो. मी तुरुंगात असताना एका हरिजन कैद्यानें मला त्याच्या पत्नीचें एक पत्र दाखविले. त्यात त्या स्त्रीचा मुलगा तिला मारतो अशी तक्रार होती. त्या हरिजन कैद्यानें माझ्याकडून त्या मुलाला उपदेशपर पत्र लिहून घेतले. मीं मनात विचार केला, "माझ्या 'श्यामच्या आई' मधला श्याम त्याच्या आईवर प्रेम करतो व हा मुलगा आपल्या आईवर का धांवून जातो? थडीचे दिवस असतील, त्या मुलाला पुरेसे पांघरूण नसेल, आई त्याला सकाळी कामावर जायला उठवीत असेल, मुलगा अर्थात् उठायला नाखूष असेल व म्हणून दोघांमध्यें भांडणें होत असतील. अर्थात् यांत आईचा व मुलाचा असा दोघांचाहि दोष नाही. दारिद्र्यांत आनंद वाटूं शकत नाहीं म्हणून मी स्वतःला म्हणतो, "श्याम, तूं आर्थिक विषमता दूर करावयाला

ऊठ. " सामाजिक रचना बदलण्यासाठीं, जीवन तेजस्वी करण्यासाठीं सर्व वाङ्मय व कला आहेत. ठाणें जिल्ह्यांतील दुःखाकडे कोणा साहित्यिकानें पाहिलें आहे काय ? तिथल्या जातींचीं नावें तरी काय आहेत ? दुबळी, पातळी, वारली.— म्हणजे सर्व मेलेले ! कोण बघतो आहे या वारल्यांच्या दुःखाकडे ? ठाण्याला चिक्कूच्या चांगल्या बागा आहेत हें सर्व लोकाना चागलें माहित आहे, पण चिक्कूच्या बागा फुलविणारे हे लोक काय खातात ? त्याच्या झोंपड्यांतून मला गवतांचे ढीग दिसले ! एका झोंपडींत एका वारली जातीच्या स्त्रीला मीं विचारलें, " हे गवत कशासाठीं ?" ती म्हणाली, " हें गवत आम्हीं शिजवून खातों." मी विचारलें, " तुम्हांला कांहीं तांदूळ, कण्या, वगैरे मिळत नाहीं काय ?" तिनें उत्तर दिलें, "तादूळ, कण्या वगैरे सर्व तुम्हां लोकाकरतां " हे शब्द मला झोंबले. कोणी पाला, कोणीं कंद खातात व आपण कलेची चर्चा करतों. साहित्यिकांनो, कलाकारांनों, तुमची शक्ति अन्याय दूर करण्याकरतां उभी करा ! साती दिवस पोटभर खायला कसें मिळेल याची विवंचना करणारें वाङ्मय हवें आहे.

### माझ्या व राष्ट्रीय वाङ्मयावरील आक्षेप

माझ्या व इतर राष्ट्रीय वाङ्मयावर अलीकडे अनेक लोक आक्षेप घेत आहेत. मी कोठें त्यांना उत्तरें देत बसूं ? माझ्याजवळ तशी टीकात्मक दृष्टिहि पण नाहीं; कोणी म्हणतात, "माझ्या लेखनांत पाल्हाळ असतो." पण तो अर्थहीन असतो का हें तुम्ही–वाचकांनीं ठरवावें. महाभारतांत सावित्री व यम यांचा संवाद दिला आहे. त्यांतील प्रत्येक वाक्याच्या आरंभीं 'न कामये' 'न कामये' असे शब्द आहेत. ही पुनरुक्ति का अर्थशून्य आहे ? ते शब्द म्हणजे हृदयांतून निघणारे बाण आहेत ! समुद्राच्या कांठीं बसणाऱ्या एखाद्या अरसिकानें त्याच्या लाटांकडे पाहून म्हटले, "सागरा, काय रे तुझा पाल्हाळ हा !" तर अशा अरसिकाच्या बुद्धीची कींवच करावी लागेल. माझें लिखाण समाजासाठीं आहे. पंडितांना सूत्रें कळतात, परंतु सामान्य माणसाला समजूत देण्याकरतां पुन्हां पुन्हां तेंच तेंच सांगावें लागतें. मीं जें लिहिलें तें एका विशिष्ट तद्रींत ! तीन चार दिवसांत What is art ? या पुस्तकाचें भाषांतर पूर्ण केलें. त्या तीन चार दिवसांत त्या पुस्तकाचा मला इतका ध्यास

लागला होता, कीं जेवण सुद्धां नको वाटे. टीकाकारांनीं माझ्या ग्रंथांवर टीका करावी; त्यांचा तो हक्क आहे. प्रमाण व संयम जीवन कलामय करण्याकरतां आवश्यक आहेत, म्हणून मी म्हणतों कीं, " टीकाकारांनो, तुमची प्रमाणबद्धता, तुमचा संयम, तुमची शक्ति सर्व एकत्र करा व हें निजलेलें राष्ट्र उभें करा."

एका साहित्यिकानें म्हटलें कीं, " कॉंग्रेसच्या लेखकांनीं कला प्रचारकी केली आहे. हे लोक हरिजनांच्या गोष्टी लिहितात. काय लिहितात, "तर एक हरिजन मुलगा पाणी भरावयास गेला होता. तेथें एक ब्राह्मण मुलगा होता. त्यानें त्याच्या घागरीवर दगड फेंकला व त्याची घागर फुटली. झाली भाकडकथा !" मी म्हणतों, "अरे साहित्यिका, तुझ्याजवळ कला आहे ना ? मग तुझ्या त्या कलेनें कर कीं या दलितांचें जीवन संपन्न ! कॉंग्रेस मंत्रिमंडळानें राष्ट्रीय पद्यावलीवरील बंदी उठविली, यावर साहित्यिकाचें म्हणणें असें होतें कीं, हें भिकार काव्य कशाला उजेडात आणलें ? हीं काव्यें म्हणजे वाङ्मयाचा अपमान आहे." या पद्यावलींतील सामर्थ्य या साहित्यिकांना कळलें नाहीं. सारें साम्राज्य त्या पद्यांनीं हालविलें आहे.

भाई लोक म्हणतात, " सानेगुरुजी भावनावश आहेत. " अरे, पण भावना का तुच्छ आहे ? महात्माजी म्हणतात, " Imotion is condensed thought " भावना विचाराचा गाभा आहे. पेटलेल्या विचारांचें तें पुंजीभूत असें स्वरूप आहे. त्या पद्यावलींनीं जसें राष्ट्र उभें केलें तसें कोणत्या साहित्यसम्राटानें केलें ? अरे साहित्यिका, तुझ्या विचाराच्या मागें भावना लाव व पेटव सारे राष्ट्र !

कोणी म्हणतात, " सान्यानीं नेभळट धर्म सांगितला आहे." मला रूढीचा नेभळट धर्म नको आहे. स्वराज्यात धर्म राहील, पण तो शनिमहात्म्याचा नाहीं. शनिमहात्म्याचा धर्म अपूर्व असेल, पण महान् विश्वाशीं एकरूप होणारा शास्त्रीय धर्म स्वराज्यात राहील. महात्माजींना धार्मिक विषमता नको आहे. कोण साहित्यिक येतो आहे ती दूर करायला ? सर्व भेद शिकवितात.

कांहीं साहित्यिक म्हणतात, " माझ्या 'स्त्रीजीवनांत' रडगाणीं आहेत."

स्त्रीवाङ्मय हें पृथ्वीमोलाचें वाङ्मय आहे. कालिदास जिवंत झाला तर हें वाङ्मय वाचून नाचेल ! खान्देशांतील खेडेगांवांत स्त्रिया पहाटे ओव्या म्हणत असतात, " गायीचे कान, जसें नागिलीचे पान " कोणत्या महाकवीला ही महान् उपमा सुचेल ?

माझ्या एका कादंबरींत मी लिहिल्याप्रमाणें माझें लेखन चिमणीची किलबिल आहे. चिमणीच्या किलबिलीला कोणी संगीताचे नियम लावीत नाहीत. तुकाराम महाराज म्हणतात, " विषय तो त्याचा। झाला नारायण. " पण माझा विषय स्वातंत्र्य आहे. त्याच्यासाठी मी एकटाच माझा दिवा घेऊन जाणार. लोक आक्षेप घेवोत, दगड फेकोत, " तूं तो राम स्मर, जग लढवा दे–!"

## साहित्यिकांना विनंति

महाराष्ट्रांतील साहित्यिकांना माझी विनंती की, महाराष्ट्रांत निरनिराळे विचारप्रवाह सुरू झाले आहेत. शास्त्रे वाढली आहेत; पण हे सारें वाचील कोण ? शेकडा नव्वद लोक निरक्षर आहेत; तेव्हा त्याना साक्षर करा. खान्देशांतील साहित्यिकानी भिल्लांची गाणी गोळा करावीं. इतिहासाचार्य राजवाडे म्हणाले त्याप्रमाणे फकीर व्हावें. राजवाड्याना अलीकडचें सर्व लिखाण अलगुजासारखें वाटत होतें. त्याना रणवाद्ये हवी होती. पण येतो आहे कोण रणवाद्यें वाजवायला ? समर्थभक्त शं. श्री. देव जळगाव साहित्यसंमेलनात म्हणाले होते, " तापीच्या दोन्ही तीराना सारा इतिहास भरला आहे." कोण करतो आहे तो इतिहास गोळा ? धुळ्याजवळ नावरानावरी म्हणून एक खेडेगांव आहे. त्या खेडेगावच्या बाहेर दोन डोंगर व मध्ये एक झाड आहे. या दोन डोंगराची व झाडाची एक लोककथा आहे. शेतकरी दुपारच्या न्याहारीची वाट पाहत बसले होते. दुरून एक स्त्री येत असतांना त्यांनीं पाहिली. दोघानाही वाटले की आपली बायको आहे. दोघेहि भांडूं लागले. ती स्त्री जवळ आली. ती बहीण होती. भाऊ शेतावर आल्यावर ती सासरहून माहेरीं आली होती. ती आपल्या वहिनीला म्हणाली, " तूं रोजरोज न्याहारी घेऊन जातेस. आज मीच दादाला न्याहारी नेऊन देणार;" म्हणून ती आली होती. परंतु इकडे दोघांनींहि तिला आपली पत्नी मानली होती.

ज्याची ती बहीण होती त्यानें लगेच या पापाबद्दल एका कोयत्यानें आपला गळा कापून घेतला. दुसऱ्यानेहि तसेंच केले. बहिणीनेहि आतां जिवंत कशाकरता राहावयाचें म्हणून देहत्याग केला. त्या दोन शेतकऱ्याचे ते दोन डोंगर झाले व बहिणीचें रूपांतर झाडांत झालें. किती भव्य आणि दिव्य कल्पना ! किती उदात्त ही संस्कृति ! अशा डोंगरांचे व झाडांचे इतिहास गोळा केले पाहिजेत. अशा लोककथा नष्ट होत चालल्या आहेत. त्या टिकविल्या पाहिजेत.

साहित्यिकांनो, मुक्तेश्वर म्हणाले त्याप्रमाणे 'एकेक अक्षराची भीक' मागून महाराष्ट्र साहित्यमंदिर उभे करा. शास्त्रीय वाङ्मयाची सुद्धां जरूर आहे. रवींद्राना सुद्धां वीणा बाजूला ठेवून 'विश्वग्रंथ' लिहावा लागला. तुम्ही महान् धर्म निर्माण करा. आर्थिक विषमता दूर करा. आर्थिक विषमतेत न्यायही कलुषित होतो. इंग्लंडमधील मोलकरीणसुद्धा सामाजिक प्रतिष्ठेसाठीं झगडते.. आपल्याकडील मापाडी, शेतकरी यांना अशीच प्रतिष्ठेची जाणीव झाली पाहिजे. मी दुसरें काय सांगणार ! ''

—**साने गुरुजी**, १८-११-४५.

[ भाषण ता. ७–८–४५;
संकलन–श्री. न. वा. शिदोरे, एम्. ए., बी. टी.]



## समालोचन

साने गुरुजींच्या रंजक वाङ्मयास मराठी साहित्यांत स्वतंत्र स्थान दिलें पाहिजे. रूढ ललितकृतींहून त्यांचें रंजक वाङ्मय निराळया स्वरूपाचें आहे. 'ललित कृति' ह्या शब्दोच्चाराबरोबर जें चित्र आपल्या अंतर्यामीं प्रकट होतें, त्यापेक्षां त्यांच्या वाङ्मयाचें चित्र अगदींच नवीन आहे. त्या साच्यात त्यांचें वाङ्मय सामावूंच शकत नाहीं.

१९३० साली महात्मा गांधींच्या निःशस्त्र प्रतिकार व सत्याग्रहांच्या रणामुळें सर्व भारताचें वातावरण प्रक्षुब्ध झाले होतें. 'नमकका कायदा तोड दिया' च्या गगनभेदी रणगर्जनेमुळें असंख्य व्यक्तींच्या निष्क्रिय जीवनांत प्रचंड उलथापालथ घडून आली होती. गुलामगिरींतच सौख्य मानणाऱ्या लोकांना स्वातंत्र्याची थोडी तरी जाणीव झाली होती. हजारों तरुण-तरुणी तळहातांवर आपलीं शिरें घेऊन देशाकरता प्राणार्पण करावयास पुढें आले. लाठी, गोळीबारासारख्या क्रूर साधनांनीं युक्त असलेली साम्राज्यशाही चौफेर थैमान घालीत होती. आणि अशा परिस्थितींतहि 'आझाद भारता'च्या घोषणा वातावरणांत सारख्या निनादत होत्या. परंतु हजारों कुटुंबांच्या जीवनात घुमलेला ह्या जगड्व्याळ क्रांतीचा जयघोष मराठी साहित्यमंदिरांत घुमला नाहीं. फार काय, पण त्याचा छोटासा विवाद

कूजनामुळें बेफाम झालेले मराठी साहित्याचे जादुगार दिवाभीतांप्रमाणें कुठें तरी दडून बसले होते. तेंच तें ‘ बाहुल्यांचें ’ जग निर्माण करण्यांत त्यांची प्रतिभा तितक्याच उमेदीने गुंगली होती आणि त्याच नाजुक प्रणय-कूजनांत ते आमलाग्र गढून गेले होते.

तो काल रिझविणाऱ्या साहित्याचा होता. ‘ कलेकरता कला ’ या वादाचे गंभीर पडसाद मराठी सारस्वतात घुमूं लागले होते. परंतु या वादाला अजून अटीतटींचें स्वरूप प्राप्त झालें नव्हतें, हेही तितकेंच खरें. त्यावेळची परिस्थिति मात्र इतकी नाजुक झाली होती, कीं केव्हां ठिणगी पडेल आणि वादाच्या प्रचंड ज्वाला उठतील याचा नियम नव्हता. १९३० ते १९४० ह्या एका दशखंडात ह्या वादाने एकाएकी प्रथितयश साहित्यिकांचें जीवन व्यापून टाकलें व कांहीं काल उलटसुलट विचाराचे वारे वाहूं लागले आणि ह्यां हा म्हणता सारे आकाश धुळीने व्यापिलें गेलें.

ज्या क्रांतीचे नादनिनाद भारतात घुमत होते, त्याचा कसलाच परिणाम आमच्या मराठी साहित्यावर झाला नव्हता. ‘ पुनः प्रत्ययाचा आनंद ’ देणारें आमचें वाङ्मय स्वच्छंदतेचा, स्वातंत्र्याचा, विजिगीषुतेचा आनंद द्यावयास मात्र असमर्थ होतें. वाचकवर्ग नाविन्यासाठीं, खऱ्या सामाजिक चित्राच्या दर्शनासाठीं हपापलेला होता. १९३० च्या स्वातंत्र्ययुद्धामुळें निर्भय बनलेला, साम्राज्यशाहीच्या क्रौर्यामुळें चिडून गेलेला आणि स्वातंत्र्याकरतां वाटेल तो त्याग करावयास तयार झालेला तरुण ‘ त्या ’ पुनःप्रत्ययाच्या आनंद मिळावा म्हणून वाङ्मयाकडे धांवल्यास त्याची निराशाच होई. ‘ आझादभारता ’ चे रम्य चित्र त्यानें मनाशी रेखाटून ठेविलें होतें. त्याचेंच प्रतिबिंब वाङ्मयदर्पणांत पाहावयास तो आतुरला होता. परंतु ‘ नवनवीन जाणीवांचें ’ स्तोम माजविणाऱ्या साहित्यधुरीणांकडून त्याची अपेक्षापूर्ति न झाल्यामुळें तो व त्याच्याबरोबर बहुसंख्य वाचकवर्ग असंतुष्टच राहिला होता.

कालाचा महिमाच असा आहे, कीं कोणत्या तरी क्रांतीची लाट एकदम उफाळून येते व मग सर्व व्यवस्थेंत आमूलाग्र फेरबदल होतात. सामाजिक क्रांतीच्या वेळीं केवळ सामाजिक मूल्येंच बदलतात असें नसून वाङ्मयीन मूल्येंहि बदलतात; जुन्या जाणीवा पूर्णपणें रसातळाला जाऊन नव्या जाणीवा

उत्पन्न होतात आणि मग ह्या नव्या जाणीवाचा पुरस्कार करणारें वाङ्मय-समाजाच्या हृदयाशीं जाऊन भिडतें.

केवळ कलेकरतां लिहिलेल्या वाङ्मयाला त्यांतील अवास्तव चित्रणामुळें समाज उबून गेला. त्याला मध्यमवर्गीय चटकदार, काल्पनिक जीवन चित्रणाऐवजीं बहुजन समाजाचीं सुखदुःखें चित्रणारें वाङ्मय हवेंहवेंसें वाटूं लागलें. आपल्या स्वतःच्या जीवनाचें चित्र ज्या वाङ्मयांत दिसेल तें वाङ्मय त्याला पाहिजे होतें. भारताच्या पारतंत्र्याचें, बहुजनसमाजाच्या दलितावस्थेचे व सामाजिक व आर्थिक विषमतेचें निराकरण करणारें तेजस्वी वाङ्मय त्याला हवें होतें. वाङ्मय कलानुवर्ति असावें का जीवनानुवर्ति असावें हा वाद बहुजनसमाजापुढें नव्हताच मुळीं. परतंत्र देशांत, साम्राज्य-शाहीच्या जोखडात आमूलाग्र शृंखलाबद्ध असलेल्या देशांत एकच वाद प्रभावी होऊं शकतो व तो म्हणजे 'स्वातंत्र्यप्राप्ति.' अशा देशात कलेचें एकच प्रधान कार्य असतें व तें म्हणजे केवळ आनंद देणें नसून, जीवनाचें नुसतें वास्तवदर्शनहि नसून दास्यविमोचनार्थ, उज्ज्वल, त्यागी, रणझुंझार सैन्य तयार करणें हें होय. या तत्त्वाचा प्रचार करणे हाच परतंत्र देशांत कलेचा प्रमुख हेतु ठरूं शकतो. व ह्या तत्वाचे मराठी वाङ्मयातील प्रचारक प्रणेते म्हणून साने गुरुजीचें नांव घेता येईल. आपल्या 'कला म्हणजे काय?' ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत साने गुरुजींनीं हेच विचार विस्तारानें माडले आहेत.

एके ठिकाणीं ते म्हणतातः "महाराष्ट्रांतील कलावानांनो! हा महाराष्ट्र, मुमुर्षु व मरणोन्मुख महाराष्ट्र, जरा येऊन डोळेभर पहा तरी. पहा त्याच्या जखमा, पहा त्याच्या वेदना, पहा त्याचे कष्ट, पहा त्याचे हाल, पहा त्याचें अज्ञान, पहा त्याच्या रुढी, पहा त्याची उपासमार, पहा त्याची पदोपदीं मानखंडना...हें विराट दुःख, ही अपार आपत्ति, याच्या दर्शनानें नाहीं का तुमचे डोळे भरून येत? नाहीं का तुमचें हृदय विरघळत? या अपार दुःखाला वाचा फोडावी असें नाहीं का तुम्हांला वाटत?"

सान्यांच्या ह्या भावनांचें स्वरूप लक्षांत घेतलें, म्हणजे 'कलेचें अंतिम कार्य' काय असावें याचा उलगडा होतो. त्यांच्या मतें कलावंतानें आपली सृजनशक्ति

बहुजनसमाजाला जागृत करण्याकरतांच खर्च केली पाहिजे असें आहे. कला ही बहुजनसमाजांतून उत्पन्न झाली पाहिजे आणि, तिचा अधिकाधिक उपयोग बहुसंख्य जनतेलाच झाला पाहिजे. म्हणूनच बहुजनसंख्येच्या ज्या समस्या असतील, त्यांचें यथामति प्रकटीकरण आणि मार्गदर्शन हेंच कलावंतांचें अंतिम कार्य राहील. आजच्या बहुजनसमाजाला भेडसावणारे प्रश्न म्हणजे गुलामगिरी, दारिद्र्य आणि सामाजिक व आर्थिक विषमता. म्हणून देशप्रेमानें स्फुरलेली रणगीते रचणें हें कवीचें अंतिम कार्य होय. ज्या काव्यामुळें गुलामगिरीबद्दल चीड येऊन स्वातंत्र्याची लालसा उत्पन्न होईल असेंच काव्य कलावतानें निर्मिलें पाहिजे. जी स्थिति काव्याची तीच इतर सृजनशक्तींची. त्या त्या वेळचे सामाजिक प्रश्न म्हणजेच कलावंतांचे जिवंत विषय व त्यानीं त्यावर रचिलेलें वाङ्मय म्हणजेच बहुजनसमाजाचें वाङ्मय. आपले विचार, आपलें सुखदुःख ज्या वाङ्मयांत पूर्णपणें चितारलेलें त्याला दिसेल तेंच त्याचें वाङ्मय. जनता तें वाङ्मय मोठ्या आवडीनें वाचील, पूजील-तें वाङ्मय थोर.

बहुजनसमाजाला कार्योद्युक्त करणें हेंच सान्यांचें अंतिम ध्येय होय. त्यांची कलाहि तेंच जाणते. कला ही जीवनानुवर्ति व्हावयाची असेल तर तिने सामान्यांतील सामान्य माणसांच्या जीवनाच्या सुखदुःखाला वाचा फोडिली पाहिजे. स्वतः साने यांनीहि हेंच केलें आहे. अत्यंत सामान्य माणसाच्याच भावनांचें चित्र त्यांच्या कलेनें रेखाटलें आहे. ते म्हणतातः- "बहुजनसमाज! केवढा अनंत व अपार कलेला विषय! किती विविध अन् किती रसमय!" जेव्हां जेव्हां भारताचें दास्यत्व, दरिद्री नारायणाचें दीनवाणे जीवन, समाजांतील आर्थिक व सामाजिक विषमता ह्या गोष्टी त्यांच्या भावना प्रक्षुब्ध करण्यास कारणीभूत झाल्या तेव्हां तेव्हां त्यानी आपली लेखणी उचलली आहे. सामाजिक दुःखाचें निराकरण करणें, आर्थिक व राजकीय दुःख वेशीवर टांगणें, हेंच त्यांच्या लेखणीचें मोठें कार्य होय.

साने गुरुजींचा जगाकडे पाहावयाचा दृष्टिकोन कलावंताचा नसून उपदेशकाचा आहे. त्यांनीं लेखन केलें तें कलाविलासाकरितां नसून आपल्या ध्येयपूर्तीकरतां. हा प्रिय भारत देश सर्व धर्मांच्या व संस्कृतीच्या मानवांस एकत्र प्रेमानें नांदवून दाखवील अशी सान्यांना थोर आशा आहे.

त्यांच्या लहान जीवनांत हें स्वप्न ते रात्रंदिन खेळवीत असतात. ही महान् कल्पना हाच त्यांचा आनंद. अशा हिंदुस्थानचें मनोहर व मनोरम चित्र त्यांच्या डोळ्यांसमोर सारखें नाचत असतें. एखाद्या महान् तत्वाला उराशीं बाळगून त्याच्या पूर्तीकरतां आपल्या लेखनगुणांचा त्यांनीं उपयोग करून घेतला, आहे हेंच म्हणणें जास्त रास्त होईल. ज्या ध्येयाचीं महान् स्वप्नें रात्रंदिवस त्यांच्या नेत्रासमोर नाचत होतीं, तीं स्वप्नें, तीं ध्येयें वाचकांच्या मनावर बिंबविण्याकरतां यांनीं ही सारी ध्येयसृष्टि निर्माण केली आहे. आणि म्हणूनच मी म्हणतों कीं, साने हे कलावंत नसून उपदेशक होत.

ललितलेखक जेव्हां उपदेशकाच्या भूमिकेवरून जगाकडे बघत असतो तेव्हां आपण कोणी तरी उच्च आहोंत अशा अहंपणाची भावना त्याला बाधते. सुदैवानें साने गुरुजी ह्या अहंकारानें भारले गेलेले नाहींत हा त्यांचा मोठा गुण आहे. परंतु आपलें अवतारकार्य उपदेशकाचें आहे असें जेव्हां सामान्यपणें लेखक समजतो, तेव्हां त्याचें लिखाण नेहमींच सरस उतरेल अशी कोणतीच खात्री देतां येत नाहीं. उपदेशाकरतां हातांत लेखणी घेणें निराळें आणि ललित कृतींतूनच आपला ध्येयवाद मोठ्या रम्यतेनें सूचित करणें हें निराळें. पहिल्या भूमिकेच्या आहारीं जाऊन प्रसूत झालेलें लिखाण हें निव्वळ हरदासी थाटाचें होतें, तर दुसऱ्या भूमिकेवरून लिहिलें गेलेलें लिखाण ललितरम्य व म्हणून आनंदवर्धक ठरतें. सदासर्वदा लोकांना उपदेश करणाऱ्या लेखकाची किंमत क्षणभंगुर ठरते. अशा लेखकांच्या लिखाणांत चिरस्थायित्व असूं शकत नाहीं, येत नाहीं. परंतु कोणतीहि सहेतुक कलाकृति रम्य असेल तरच ती चिरंजीव ठरूं शकते.

आपल्या अलौकिक प्रतिभेच्या जोरावर सुंदर प्रतिसृष्टि निर्माण करणें हें कलावंताचें काम. ह्या फुललेल्या सृष्टींतून जें पाहिजे असेल तें त्यानें खुशाल हुडकून काढावें व तें आत्मसात् करून आपल्या लालित्याला शोभा आणावी. खरा वास्तववादी कलाकार आपल्या कुंचल्याच्या मनोरम कौशल्यानें जें दिसतें त्या जगाचें चित्र रेखाटतो, तर ध्येयवादी कलाकार आपल्या एका विशिष्ट ध्येयाभोंवतीं नवीन सृष्टि निर्माण करतो व त्यांमधून आपल्या ललितवस्तूची गुंफण करून त्यांतून सुंदर तत्त्व विशद करतो.

सानेगुरुजी हे दुसऱ्या प्रकारांतील होत. नवभारताच्या निर्मितीच्या स्वप्नांतून त्यांचा ध्येयवाद स्फुरला आहे. ते म्हणतात, " प्रत्यक्ष सृष्टींत अतृप्त राहिलेल्या शेंकडों हृदयांच्या भुका शांत करण्याचा हा एक मार्ग ( लेखनाचा ) होता. माझ्यासारख्या दुबळ्या वृत्तीच्या माणसाच्या मनांत खूप खळबळ असते, मनांत मनोहर स्वप्नें असतात; मनांत आशा, आकांक्षा, उच्च ध्येयें असतात; परंतु त्यांना कृतींत आणण्याचें धैर्य नसतें. मग दऊत, लेखणी, कागद घेऊन कल्पनांचे घडे कागदावर नाचविणें एवढाच पुरुषार्थ वाटतो व तोच मी तुरुंगांत करीत बसेन—"सान्यांची ध्येयनिष्ठा इतकी उज्ज्वल आणि जाज्ज्वल्य आहे कीं त्या एकुलत्या एक विषयाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याच विषयात त्याना स्वारस्य वाटत नाहीं. ध्येयाच्या उज्ज्वल दीप्तीमुळेंच बहुशः कलेकडे त्याचें दुर्लक्ष झालें. कला आणि ध्येयवाद यांचें बेमालूम संमीलन त्यांना साधलें नाहीं हें नमूद करावयास खेद वाटतो. उत्कृष्ट कलाकृतींत सूचित केलेला ध्येयवाद आणि फक्त ध्येयाकरतांच ललितवाङ्मय प्रसवणारे साने गुरुजी यांत महदंतर आहे. आणि तसें महदंतर पडलें नसतें तरच तें अयुक्तिक दिसलें असतें.

या भूमिकेवरून बघितलें तर साने हे आधीं ध्येयवादी आहेत व नंतर कलावंत आहेत हें म्हणणें स्पष्ट होतें. आधीं ते हिंदमातेचे निष्ठावंत सेवक ठरतात आणि मग कवि ठरतात. प्रथम ते दलितांच्या दुःखानें विकल झालेले महात्मे आहेत आणि मग ते कादंबरीकार आहेत. यामुळेंच त्यांच्या ललितकृतींभोंवतीं एक प्रकारचें ओजस्वी वातावरण निर्माण झालें आहे. पवित्र वातावरणांत उस्फूर्त झालेल्या कोणत्याहि अपत्याबद्दल अपरिमित कौतुक वाटणें अपरिहार्य आहे. ज्याच्या चर्येवर पावित्र्याचें तेज सारखें विलसत असतें, अशा विदेही साधूबद्दल आपल्या अंतःकरणांत उदात्त भावना आपोआप आविर्भूत होतात. साने गुरुजींचें वाङ्मय वाचल्यावर आपल्या मनाची नेमकी हीच स्थिति होते. त्यांच्या वाङ्मयांत वास्तवता व ध्येय यांचें बेमालुम संमीलन आहे. ते जीवनानुवर्ति असल्यामुळें जीवनाचें बरेंवाईट चित्र त्यांत स्पष्ट प्रतिबिंबित झालेलें दिसतें. केवळ वास्तवतेचें चित्र रंगवून समाजाला अधिक भेडसावणें योग्य नसून त्याच-

बरोबर कांहीं तरी ध्येयदर्शन देणें योग्य ठरतें. आणि सान्यांचें असामान्यत्व यांतच आहे. भारताचें दास्यविमोचन, भीषण सत्याग्रहाचें मनोज्ञ चित्रण, हिंदुमुसलमानांचा प्रश्न, दलितांची अन्नान्न दशा वगैरे आधुनिक प्रमेयांची विदारक चित्रें मराठी वाङ्मयांत जागोजाग सांपडतात, नाहीं असें नाहीं. परंतु हीं प्रमेयें कशीं सोडवितां येतील किंवा तीं कशीं हाताळतां येतील याबद्दलची सागोपांग चर्चा कुठल्याच मराठी रंजक वाङ्मयांत आढळून येत नाहीं. तें कार्य सान्यांनीं केलें आहे.

आधुनिक प्रथितयश लेखकांपैकीं श्री. फडके, श्री. माडखोलकर व श्री. खांडेकर यांच्या सुंदर कलाकृतींत भारताच्या दास्याचें त्याचप्रमाणें दलितांच्या दुःखाचें विस्तृत चित्रण आलेलें आहे. श्री. फडक्यांचा गजाभाऊ, त्याचप्रमाणें निरंजन किंवा श्रीनिवास हीं पात्रें काय, किंवा राजकारणाचें एकमेव ध्येय सतत उराशीं बाळगून प्रगत होत गेलेलीं श्री. माडखोलकरांचीं मुक्तात्मा, चंदनवाडीमधील पात्रें काय, किंवा दलितांच्या दुःखामुळें हेलावून गेल्यामुळें त्यांच्याबद्दल सहानुभूति आणि कळकळ बाळगणारीं श्री. खांडेकराचीं पात्रें काय, हीं सर्व वस्तुस्थितिनिदर्शकच आहेत. ह्या पुरोगामी लेखकांच्या वाङ्मयांत भारताच्या दास्यविमोचनाच्या झुंजीचें हृदयाला हेलावून सोडणारें भीषण चित्र असलें, तरी तें त्याकरितां प्रदीप्त करणारें नाहीं. उलट जरी सान्यांच्या कथा किंवा कादंबऱ्या एकाच सांच्यांतल्या असल्या आणि कांहीं विशिष्ट अशा तत्त्वांभोंवतीं त्यांचीं पात्रें भ्रमण करीत असलीं, तरी त्यांत भारताच्या ध्येयवादित्वाचें, त्यागाचें उज्ज्वल चित्र पाहून भारताच्या भविष्यकालाबद्दल संदेह राहत नाहीं. तें प्रदीप्त करणारें आहे. भावनांचा प्रक्षोभ करून त्यांचा योग्य उपयोग कसा करावयाचा याचा मार्ग त्यांत निःसंदेह सांगितलेला आहे. आज ना उद्यां सान्यांचें विराट स्वरूप सत्यसृष्टींत आल्याशिवाय राहील काय ? त्यांच्या नायक, नायिका म्हणजे त्यांच्या अंतःकरणांतील ध्येयें होत. त्यांचीं ध्येयें नायक–नायिकांच्या रूपानें चालतात, बोलतात, कृति करतात. स्वामी ( धडपडणारीं मुलें ), मनोहर ( पुनर्जन्म ), दयाराम भारती ( गोड शेवट ), रामदास ( क्रांति ) हीं पात्रें म्हणजे नवभारताचे मानकरी होत,

नव्हे ते साऱ्यांच्या स्वप्नाळु ध्येयाचे पूर्णावतार होत. आपले मानसपुत्र अगर आपल्या मानसकन्या त्यांनीं ज्या भूमिकेवरून रेखाटल्या, ती भूमिकाच मुळांतली प्रचारकाची आहे. ज्या ध्येयानें साऱ्यांच्या हृदयाला वेड लागलें आहे, त्याच ध्येयानें त्यांचीं पात्रें वेडीं झालेलीं आहेत. " मनुष्य एखाद्या ध्येयानें वेडा झाला म्हणजे तो निराळा होतो. त्या ध्येयाच्या प्रकाशांत त्याचे सर्व व्यवहार सुरू होतात. त्याच्या जीवनांत हेतुमयता येते. त्याच्या सर्व आचार, विचारोच्चारांत एक प्रकारची सूत्रमयता येते. त्या ध्येय-सूर्याभोंवतीं साऱ्या अंतर्बाह्य क्रिया प्रदक्षिणा घालूं लागतात. " ( गोड शेवट पान १६२ ) ही जी स्थिति साऱ्यांनीं रेखाटली आहे, तीच स्थिति खुद्द लेखकाची आहे. ज्या ध्येयसूर्याभोंवतीं त्यांची अंतर्बाह्य क्रिया प्रदक्षिणा घालते, त्या ध्येयामुळें जी हेतुमयता त्यांच्या जीवनांत आली, तीच सुसूत्रता त्यांच्या नायकांत उत्क्रांत होत गेली. ' धडपडणाऱ्या मुलांतील ' स्वामीचें प्रगत स्वरूप म्हणजेच ' क्रांतींतील ' दयाराम; आणि दयारामचें परिणत-स्वरूप म्हणजेच 'गोड शेवट'मधील दयाराम भारती म्हणजे स्वामी. दयाराम व दयाराम भारती हीं एकमेकाचीं पूरक रूपें होत. 'स्वामी'च्या चित्रणानें सुरू झालेली नवभारताची विराट् कल्पना ' क्रांतींतील ' दयारामच्या रूपानें मूर्त होत गेली आणि तिची अखेरी दयाराम भारतींत झाली. 'धडपडणाऱ्या मुलांनीं सुरू केलेलें परंतु अपुरें राहिलेलें कार्य क्रांतिकारक रामदासनें पुरें केलें. म्हणजे ' क्रांति ' हें ' धडपडणाऱ्या मुलाच्या ' अमूर्त आकांक्षांचें मूर्त स्वरूप होय. धडपडणाऱ्या मुलांनीं ज्या कल्पना उराशीं बाळगल्या आणि ज्याच्या साध्याकरितां नुकतीच सुरवात केली, त्या साऱ्या कल्पना वास्तवसृष्टींत आणण्याचें कार्य सारे क्रांतिकारक रामदास, शांता, दयाराम, मुकुंदराव यांनीं केलें. धडपडणारीं मुलें ( १९३७ ), क्रांति ( १९४० ) व गोड शेवट ( १९४३ ) हे त्या कादंबऱ्यांचे लेखनकाल लक्षांत घेतले म्हणजे १९३७ सालीं नवभारताचें जें सानेगुरुजींना चित्रण करावयाचें होतें तें १९४३ त पुष्कळसें पुरें झालें असें दिसतें. सुरवातीस नवभारताच्या वस्त्राचे आडवे धागे काय ते तयार होते ते १९४० व १९४३ त अधिक स्पष्ट झाले.

**वक्तृत्व**

साने गुरुजींच्या वक्तृत्वाबद्दल सांगावयाचें म्हणजे तो त्यांच्या व्यक्तित्वाचा एक प्रमुख भाग आहे. त्यांनीं वक्तृत्वकलेवर कधींच मेहनत घेतलेली नाहीं. असामान्य वक्ता व्हावयाची मेहनत घेतलेली नाहीं. असामान्य वक्ता व्हावयाची महत्त्वाकांक्षाहि त्यांनीं कधीं बाळगली नसावी. मात्र शिक्षक असतांना त्यांच्या या गुणाचा विकास होत गेला व त्यांची एक विशिष्ट शैली बनली गेली.

१९३० सालीं सारीं बंधनें तटातट तोडून ते राजकारणांत शिरले. तेव्हांपासून त्यांच्या वक्तृत्वाला बहर आला. सारखीं भाषणें करून त्यांच्या वाणींत एक प्रकारचा ओज आला आहे. परंतु त्याचबरोबर ओघाओघानें त्यांची भावनोत्कटताहि मधून मधून डोकावते. ते प्रामुख्यानें भावनाजीवि असल्याकारणानें त्यांचें भाषण संपूर्णतः भावनामय असतें. स्वतः अतिशय बुद्धिमान व कल्पक असल्यामुळें ते गुण त्यांच्या भाषणांत प्रकर्षानें न दिसतां भावनाच अधिक दिसते. याच कारणामुळें ते सामान्य जनसमूहाचे वक्ते झाले आहेत. भावना चेतविणें एवढेंच कार्य त्यांची वाणी करीत असल्यामुळें गर्दीला त्यांचें वक्तृत्व पटतें व आवडतें. परंतु बुद्धिजीवी माणसांना त्यांत कस वाटणार नाहीं. आत्यंतिक तळमळ हा त्यांच्या वक्तृत्वाचा आणखी एक विशेष आहे. जीं मतें स्वतःला पटलीं किंवा जीं तत्त्वें अनुकरणीय वाटलीं तींच मतें वा तत्त्वें ते प्रतिपादतात. ते आपल्या व्याख्यानाला सुरवात करतात ती अत्यंत संथपणें व हळू आवाजांत, त्यांच्या ह्या विनयशीलतेनें ते श्रोत्यांचीं मनें चटकन् आपल्याकडे वळवून घेतात, त्यांच्यांत आपुलकीची भावना निर्माण करतात, आणि आपल्यांतलाच व आपल्यासारखाच एक मनुष्य आपलीं सुखदुःखें सांगणार म्हणून श्रोत्यांना व्याख्यानाची अधिक उत्कंठा लागते. अशा तऱ्हेनें निर्माण झालेली आपुलकीची भावना त्यांच्या सहजरम्य वाणीमुळें सारखी प्रगत होत जाते. कसलाहि नाटकी आविर्भाव त्यांच्या भाषणांत नसतो. त्यांची भाषा जितकी साधी, सुटसुटीत तितकीच उपमा अलंकारांच्या खटाटोपापासून पूर्ण अलीप्त असते. शब्दांची चमत्कृति करण्याच्या भानगडींत ते पडत नाहींत. त्यांचप्रमाणें पांडित्यप्रदर्शनाचाहि

त्यांच्या भाषणांत अभाव असतो. अगदीं आंतरिक कळकळीनें ते बोलतात. त्यांच्या मुखावाटें बाहेर पडणारी भाषा म्हणजे त्यांचा प्राण होय असें वाटतें. हां हां म्हणतां तिची पकड श्रोतृवृंदावर बसते व सुरवातीला हळुं हळू वाट काढणारी त्यांची भाषा पुढेंपुढें तुफान वेगानें श्रोतृवृंदांना काबीज करते. त्या त्या भावनांचें स्पष्ट चिन्ह त्यांच्या चर्येवर उमटतें. व तदनुरूप हातांचें चलनवलन सुरू होतें. त्यांची प्रबल वाग्गंगा वेगानें वाहूं लागली म्हणजे श्रोतृवृंद तासचे तास निःशब्द बसून प्रचंड भावनांची खळबळ अनुभवूं लागतो. मायदेशाच्या दास्य-विमोचनाचा प्रश्न उपस्थित झाला म्हणजे त्यांच्या भाषणाला एक प्रकारची धार येते. दलितांचें दैन्य-विमोचन तर त्यांचा जिव्हाळ्याचा विषय. त्यांच्या दुःखाचें चित्र रंगवितांना श्रोत्यांच्या डोळ्यांतून टिपें गळलीं नाहींत तरच नवल. १९४२ च्या चळवळीनंतर त्यांच्या भाषणाला एक प्रकारची प्रखरता आली आहे व ती ध्येय-पूर्ति होईपर्यंत तशीच राहील हें निश्चित.



# साने गुरुजींचें वाङ्मय

## कादंबऱ्या

तीन मुलें
श्यामची आई ( ७ वी आवृत्ति )
श्याम ( ४ थी ,, )
श्याम खंड २ रा ( २ री आवृत्ति )
धडपडणारीं मुलें ( दुसरी आवृत्ति )
क्रांति ,, ,,
पुनर्जन्म ,, ,,
आस्तिक ,, ,,
सती ,, ,,
गोड शेवट ,, ,,
रामाचा शेला
संध्या

## कथा संग्रह

विश्राम ( तिसरी आवृत्ति )
त्रिवेणी
गोड गोष्टी भाग १ (२ री आवृत्ति)
,, ,, २ ,, ,,
फुलांचा प्रयोग ,, ,,
मनुबाबा ,, ,,
दुःखी ,, ,,
गोड गोष्टी भाग ६
बेबी सरोजा
करुणादेवी
यति कीं पति
चित्रा आणि चारु
सोन्या मारुति ( २ री आवृत्ति)
सोन-सांखळी
जीवनप्रकाश

## कथा संग्रह

अमोल गोष्टी
प्रबंध
राष्ट्रधर्म
भारतीय संस्कृति ( ३ री आवृत्ति )
खेडयांत जाऊन काय कराल ?
स्वदेशी समाज (२ री आवृत्ति)
कला व इतर निबंध
संस्कृतीचें भवितव्य
कला म्हणजे काय ?
गीताहृदय ( २ री आवृत्ति )
गोड निबंध भाग १, २, ३
ना खंत ना खेद

## चरित्रें

नामदार गोखले
ईश्वरचंद्र विद्यासागर
गौतम बुद्ध
इतिहासाचार्य राजवाडे
बेंजामिन फ्रँकलिन
शिशिरकुमार घोष
रवींद्रनाथ टागोर

## नाटकें

अस्पृश्योद्धार
निळा पक्षी
तें आपलें घर ( २ री आवृत्ति )

## काव्य

पत्री ( २ री आवृत्ति )
श्रीजीवन भाग १ व २